# खरा उद्धार


लेखक :—

**रा म त न य**

'मोहित्याची मंजुळा' ह्या कादंबरीचे कर्ते

प्रस्तावनालेखक —

**नारायण गोविंद चापेकर,** बी. ए., एल्‌एल्‌. बी.,

साहित्यसंमेलन, बडोदे, १९३४     कार्याध्यक्ष, साहित्यपरिषद्



८५८ ]     **विजयादशमी**     [ सन १९३६

किंमत :—

ांधणी १॥ रु.     ापडी २ रु

# अर्पणपत्रिका

## हा ग्रंथ

श्रीयुत **शेठ परशराम रामनारायण**, व्हाइस प्रेसिडेंट, जिल्हा
लोकलबोर्ड, ठाणे, व माजी प्रेसिडेंट, भिवंडी-निजामपुर
म्युनिसिपॅलिटी, यांच्या अंगच्या ज्ञानलालसा उद्योग-
प्रियता, गुणग्राहकता, गोरगरिबांविषयींचा कळवळा,
सामाजिक कार्याची तळमळ, राष्ट्रीय कार्यातील
चिकाटी सत्कार्यतत्परता औदार्य, इत्यादि
सद्गुणामुळे अत्यादरपूर्वक अर्पण
केला असे

विजयादशमी, शके [illegible]                                        **रामतनय**

# निवेदन.



महाराष्ट्र साहित्य समेलन किंवा अशाच प्रकारच्या दुसऱ्या साहित्यसंस्था ह्यातून खेड्यापाड्यातील जनतेच्या जीवनावर अधिष्ठित असलेलें वाङ्मय निर्माण व्हावे, असे ठराव होत असतात. म्हणून मीं महाराष्ट्रातील खेडया-मध्ये चाललेल्या सामाजिक जागृतीवर " मोहित्याची मजुळा " ही काद-बरी लिहिली. ह्या कादबरीचा गौरव महाराष्ट्रातील विद्वानानीं व नियत-कालिकानीं गुणग्राहकतेने पुष्कळ केला, डेक्कन व्ह. ट्रा. सोसायटीने तिला चाळीस रुपयाचें बक्षीस दिलें, मुंबई व मध्यप्रात सरकारच्या विद्याखात्यानीं ह्या कादबरीस मजुरी दिली, सध्याच्या ग्रामोद्धाराच्या केंद्राकरिता अधिकृत ग्रथ म्हणून हिचा पुरस्कार झाला, ह्या सर्व कारणामुळे मला विशेष उत्तेजन मिळून खेडयातील जीवनावरील माझी " खरा उद्धार " ही दुसरी कादंबरी महाराष्ट्रातील वाचकाच्या हातीं मी नम्रपणे देत आहे.

सध्या खेडयाकडे वळा, असा ध्वनि सर्वत्र दुमदुमत आहे. ग्रामो-द्धाराचे प्रयत्न जिकडे तिकडे चालू आहेत. जेथें दळणवळणाचीं साधनें सुलभ आहेत, व जीं खेडीं शहरापासून नजीक आहेत, तेथील समाज-स्थिति वर वर का होईना पुष्कळ शिक्षिताच्या डोळ्याखालून जाऊं शकते. परतु जीं खेडीं दळणवळणाच्या साधनापासून दूर आहेत अशाचाच भरणा देशात अतिशय आहे. अशा खेडयातील सध्याच्या समाजस्थितीच्या निरीक्षणावर ह्या कादबरीतील कथानकाची उभारणी केलेली आहे. त्यामुळे वाचकाना खेडयाच्या खऱ्याखुऱ्या समाजस्थितीचा बोध होण्यास मदत होईल, अशा ठिकाणच्या अत्यत जरूरीच्या विधायक कार्याची बरीचशी कल्पना येईल, सध्याच्या मतमतातराचा परिणाम अशा ठिकाणीं कोणता

होऊ शकतो, हे स्पष्ट अस्पष्ट का होईना, ध्यानीं येईल, शहरातील नव-शिक्षिताच्या व खेड्यातील निरक्षर जनतेच्या विशिष्ट विचाराची व भावनाची थोडीबहुत तुलना करिता येईल, शिवाय आबालवृद्धाची करमणूक होऊन त्याना सात्विक आनंद वाटेल, अशा प्रकारे ह्या कादबरीची माडणी करण्याचा प्रयत्न केला आहे. व ही साधीसुधी वाङ्मयकृति आज जनतारूपी जनार्दनाच्या सेवेला सादर करीत आहे.

ह्या कादबरीचे हस्तलिखित वाचून बहुमोल सूचना करण्याचे कार्य खेड्यापाड्याचे पुष्कळ वर्षे कळकळीने निरीक्षण करीत असलेले, गोखले एज्युकेशन सोसायटीच्या बोर्डी येथील नमुनेदार हायस्कूलचे प्रिन्सिपल व तेथील शारदाश्रमाचे आचार्य माझे वाङ्मयप्रेमी मित्र श्री. शकर रामचद्र भिसे, बी. ए., यानीं निरलसपणे केलें आहे, ह्याबद्दल मी त्याचा अत्यत आभारी आहे त्याचप्रमाणे आर्यभूषण प्रेसमधील माझे मित्र श्री. सीताराम वासुदेव फडणीस, बी. ए. ह्यानी मुद्रिते तपासण्याच्या कामी आपलेपणानें केलेल्या मदतीबद्दल मी त्याचाही फार आभारी आहें

महाराष्ट्रातील प्रख्यात साहित्यसेवक खेड्यातील समाजस्थितीची शास्त्रीय पद्धतीने छाननी करणारे विख्यात निरीक्षक, महाराष्ट्र साहित्य संमेलन व साहित्य परिषद् ह्यातील प्रमुख कार्यकर्ते, आर्य सस्कृतीचे मूर्तिमंत आदर्श असे बदलापूरचे श्री. रा रा. नानासाहेब चापेकर यानीं ह्याही कादबरीस दिलेल्या प्रस्तावनारूपी आशीर्वादाबद्दल मी त्याचा अत्यत ऋणी आहे

शेवटीं सत्य सकल्पाचा दाता जो भगवान त्याच्या चरणी शतश प्रणाम करून मी हे निवेदन पुरे करितो.

विजयादशमी शके १८५८ रामतनय.

# प्रस्तावना.



श. १८५३ सालीं रामतनयाची "मोहित्याची मंजुळा" प्रसिद्ध झाली. त्यानंतर पांच वर्षांनीं हें त्याचें दुसरें अपत्य जगापुढें येत आहे. "मंजुळे"नें वाङ्मयमयुराकडून प्रशंसेचे मंजुळ आलाप काढविले त्याप्रमाणें "खरा उद्धार" राष्ट्रभक्ताच्या आदराला पात्र होईल अशी मला आशा आहे. मोहित्याच्या मंजुळेप्रमाणें प्रस्तुत कादंबरींतहि खेडे-गांवचें वास्तविक स्वरूप रेखाटलेलें आहे. कादंबरी ध्येयवादी असावी, नाहीं तर विद्यमान परिस्थितीचें यथार्थ स्वरूप जींत प्रतिबिंबित झालें आहे अशी तरी ती असावी. अशाच कादंबऱ्यांचें वाचन बोधप्रद व हितावह होतें. ध्येयहीन व अवास्तव कादंबरीलेखन हें गंगास्नानाच्या ऐवजीं डबक्यांत अवगाहन करण्याइतकेंच निष्फळ व अप्रयोजक आहे. कंगाल स्थितींत दिवस कंठणाऱ्या लोकांचें भेसूर दृश्य पुढें असतांना प्रेमकथालेखनाला जेव्हां ऊत येतो तेव्हां हे प्रेमबहाद्दर ह्या भूमींतील नसून अप्सरालोका-तून अवतीर्ण झाले असावे असें वाटूं लागतें. प्रेमाच्या नावानें ओळखलें जाणारें स्त्रीपुरुषांचें परस्पर नैसर्गिक आकर्षण हें कोणत्याहि परिस्थितींत चित्त वेधण्यासारखें असणार हें खरें. तथापि देशाच्या संपन्नावस्थेंतच ह्या पाशवी आकर्षणांत रसोत्पादन होतें, त्याला पालवी फुटते व तें मोहक बनतें, विपन्नावस्थेंत तें दबलेल्या स्वरूपांत राहतें, मधुर विकास होण्यास त्यास वाव मिळत नाहीं. प्रस्तुत कादंबरींत ह्या आकर्षणाचें चंचलत्व, त्याची धरसोड, त्याचें सात्त्विक, शुद्ध, निर्व्याज स्वरूप वगैरे सर्व प्रकार हळु-वारपणानें चितारले असूनहि प्रेमाला गौण स्थान देण्यांत आलें आहे.

पहिल्या कादंबरींत मंजुळा ही नायिका होती. ह्या कादंबरींत अरविंद

हा नायक आहे. तो एक तरुण सुशिक्षित ब्राह्मणेतर आहे ह्या कादंबरींत विशेष हा आहे की, ह्यातील एकहि पात्र ब्राह्मण नाही. राष्ट्रोद्धाराची तळमळ लागलेल्या तरुणाच्या कपाळीं कारागृहवास हा लिहिलेलाच असावयाचा. त्याप्रमाणे अरविंद तुरुंगात असताना तेथे त्याच्या महत्त्वाकांक्षेने निश्चित स्वरूप धारण केले "अज्ञ जनतेच कल्याण साधून तिचा विकास करण, दारिद्र्य, दुःख, यातना याचा नाश करून सर्वांना सुखात आयुष्य घालविण्याची संधि मिळवून देण हे आपल साध्य नव्हे का?" असा प्रश्न तो आपला मित्र मधुकर ह्यास तुरुंगात विचारतो. तुरुंगामुळे राजबंद्याचे चारित्र्य कलंकित न होता राजबंद्यामुळे तुरुंगालाच थोरपणा प्राप्त झाला कादंबरीकारानी तुरुंगाला जवाहिऱ्याने वेचक, तेजस्वी रत्ने भरून ठेवलेल्या पेटीची उपमा दिली आहे ती अत्यंत समर्पक आहे.

योगायोग असा की, कैदेतून सुटताच एका खेडेगावीं जाण्याचा प्रसंग अरविंदाला प्राप्त झाला त्या खेड्यातच त्याचे मन रमले खेडयातील जनतेची सेवा करणे, तिच्या उपयोगी पडणे, हे त्याने आपल्या भावी आयुष्याचे ध्येय ठरविले सध्याहि ग्रामोद्धार सर्वांच्या जिव्हाग्रीं नाचत आहे. परंतु त्यापैकी बहुतेकांचे ध्येय जनसेवा नसून कीर्ति, नावलौकिक हे असते. अरविंदाची स्थिति तशी नव्हती गोरगरिबाची तळमळ त्याला कार्यप्रवृत्त करीत होती कीर्तीच्या आशेने तो ह्या फंदात पडला नव्हता खरा स्वार्थत्याग केला म्हणजे कीर्तीचे भरपूर माप आपोआप पदरात पडतें, त्याकरता निराळी खटपट करावी लागत नाही. परंतु प्रसिद्धीकरता आतुर झालेल्या माणसास हें समजत नाही कामातुर माणसाप्रमाणे त्याची अवस्था होते असो. निःस्पृह, परोपकारी, नीतिमान्, सौम्य अशा अरविंदा सारख्या देवमाणसाला सुद्धा आपले कार्य किती अवघड आहे ह्याची जाणीव थोड्याच काळात झाली. "खेडयापाडयात स्वार्थ, लबाडी, अत्याचार इत्यादि दुर्गुणानी सज्जनाना नाहक छळण्याकरता आपले साम्राज्य चालविले आहे" हे अरविंदाचा स्नेही मधुकर ह्याचे उद्गार अक्षरशः

खरे आहेत. म्लेच्छ देशात राहू नये म्हणून शास्त्रकारानी जसा नियम घालून दिला आहे तसाच आज खेडेगावात शाहण्याने राहूं नये असा नियम करण्याची वेळ आली आहे. खेडयातील लोकात माणुसकीचा रेसहि उरला नाही, त्याना प्रथम माणूस बनवावयाचे आहे, मनुष्यपणा आल्यावर मग सुधारणेच्या गोष्टी, पशूच्या वसाहतीत गुराचा डॉक्टर पाहिजे, तेथे मनुष्याचा डॉक्टर पाठवून पशु रोगमुक्त कसे होणार ? सध्या चालू असलेले उपाय ह्याच मासल्याचे आहेत खेडेगावातील माणसात एकहि सद्गुण राहिला नाही, उलट सर्व दुर्गुणाचें माहेरघर खेडें बनले आहे. हा सर्व खेळ भयानक दारिद्र्याचा आहे. अहिंसातत्त्वात मुरलेला आणि अज्ञानात रुतलेला हिंदुसमाज सरकारला उपद्रव देऊं शकत नाही, तो उत्तरोत्तर दुर्गुणाच्या गर्तेत सापडून आपल्या हातानेच आपली मूठमाती घेणार अशीं चिन्हे दिसूं लागलीं आहेत. खावयास अन्न नाहि, बायकाना नेसावयास वस्त्र नाही अशा स्थितीतील माणसाना आरोग्य-शास्त्राचे, ज्ञानाचे अथवा उद्योगाचे पाढे देऊन भारीच रुचणार आहेत ! उद्योगाचे फळ त्याच्या हातात राहात नाही, आरोग्यशास्त्राचे पाढे त्याला शिकविले तरी तदनुसार वागण्याचे साधन त्याच्यापाशी नाही. बरे स्वच्छतेचे धडे देणाराना तरी स्वच्छ वागणुकीची सवय कोठे असते ! स्टेशनच्या प्लॅटफॉर्मवर स्टेशन मास्तरासमक्ष वाटेल त्याने थुकावे ! कोणी शास्ता नाही. कित्येक मोठे अधिकारी आपल्या कचेरीच्या जागीसुद्धा बिनधोक थुकून घाण करीत असतात ! घरातली घाण रस्त्यावर टाकताना सुशिक्षितानाहि काही दिक्कत वाटत नाही ! मग बिचाऱ्या शेतकऱ्यालाच ह्या कर्माबद्दल दोष कसा लावता येईल ! इंग्रजी शिक्षणापूर्वी स्वच्छतेने वागण्याची लोकाना जितकी सवय होती तितकीहि इंग्रजी शिक्षणानतर राहिली नाही. शाळेत स्वच्छतेचे धडे वाचले जातील परंतु अस्वच्छ वाग-णुकीकडे कोणीहि लक्ष देणार नाही. नाटकी शिक्षणाचा हा परिणाम आहे. वेश्यांचीं घरे धुंडाळणारा रामाची बतावणी नाटकात करतोच कीं नाही !

आजाऱ्याची किंवा बाळतिणीची खोली स्वच्छ, मोकळी, हवाशीर पाहिजे ह्याची कल्पना खेड्यातील ब्राह्मणांसहि नाही, मग गरीब अज्ञ कुळव्यास नसल्यास त्यात आश्चर्यकारक असे काहीच नाही परंतु विशेष हे की, अज्ञानापुढे ज्ञानाला पाय मागे काढावा लागतो पाटलिणीच्या बाळत-खोलीचे भेसूर स्वरूप पाहून विमल जेव्हा त्या जुन्यापुराण्या सुईणीवर रागावली तेव्हा ती तिला उलट काय म्हणते पाहा—" अग बया, लई शानी हैस तू बर ! इतच सात बाळातपणं जाली की इचीं ! माज्याच हातान म्या केलीं की ! पन् तुज्यासारखी शानी आमाला सिकवाया नवती नर बया ! " खेड्यात शहाणपणा शिकविणाराची अशीच बोळवण होते बदलापुरात ग्रामपंचायतीचे काम करीत असताना मला पदोपदीं हाच अनुभव येत होता. 'आम्ही आजपर्यंत ह्या घाणीतच लहानाचे मोठे झालों ना !' हे ठराविक उत्तर स्त्री-पुरुषांचे असावयाचें ! आम्ही मनुष्य असून पशु बनलो आहो. ह्या कादंबरीतले युरोपचा प्रवास करून आलेले भय्यासाहेब म्हणतात त्याप्रमाणे युरोपियन समाजातील अगदी खालच्या दर्जाचा मनुष्य व आपल्यातील शेवटच्या पायरीचा माणूस यांत जमीन अस्मानाचे अंतर आहे हे अंतर नाहीसे केल्याशिवाय सुधारणेच्या गोष्टी बोलणे निरुपयोगी आहे.

खेड्यातील लोक दारिद्र्यामुळे लबाड झाले आहेत ह्यात संशय नाही. त्यात आणखी लबाड बनण्याचा मोह कोर्टामुळे अनावर होतो. योग्य कर्जाचीहि हमेबंदी आणि तीसुद्धा बिनव्याजी कोर्ट करू लागले म्हणजे सावकाराचे कर्ज आपण होऊन न फेडण्याचा मनाचा कल होतो. कर्जाची रक्कम दिली नाही म्हणजे सावकाराला फिर्याद करणें भाग आहे. कोर्टाच्या हुकूमनाम्याने आपला फायदा होईल अशा आशेने कूळ सावकाराशीं बेइमानपणाने वागते. इकडे सावकारहि -कुळाला व कोर्टाला फसविण्या-करता खोटे कागद व खोटे जमाखर्च तयार करून ठेवतो. शेटजी अर-विंदाला म्हणतो :—"वह्या चोख असल्या म्हणजे त्या कोर्टात टिकतात.

म्हणून आम्ही सवडीने तशा वह्या लिहून ठेवितो. आणखी पुष्कळ पुष्कळ सावधगिरी ठेवावी लागते, रावसाहेब ! न करावी तर चालाव कसं ! कोर्टात देण्याचे लहान लहान हप्ते ठरवितात. आणि इतकेहि करून ते वसूल होण्याची पुनः दगदग !"

'ठकाला सवा ठक' ह्या न्यायाने अप्रामाणिक खेडवळाला लुबाडण्यास गावातील पाटील, तलाठी व सावकार ही ग्रामकटक त्रयी सज्ज असते ह्या तिघाची परस्परसाहाय्यक कपनी असते. उलट्या काळजाचे, खाटकी वृत्तीचे, भावनाहीन असे हे राक्षस लोकाच्या वित्ताचा अपहार करण्यात गर्क झालेले असतात सरकारी अधिकाऱ्याची सरबराई करून हे लोक आपले कार्य निर्विघ्नपणे चालवीत असतात मुलकी अमलदाराची पाटील-तलाठ्यावर करडी नजर नसत, ह्यामुळे त्यास चागलेच फावत. दहा पाच रुपयाच्या मिळकतीच्या लोभाने दुसऱ्याचे शेकडो रुपयाचे नुकसान करण्यास ते माघार घेणार नाहीत. 'क' पत्रकाला तिसऱ्याचेच नाव दाखल कर, वहिवाट अगर कबजा याची नोंद कबजा नसलेल्याच्या नावाने कर, ह्या गोष्टीत पाटील-तलाठी वाकबगार असतात. वरिष्ठ अधिकाऱ्याच्या हलगर्जीपणामुळे अरविंदासारख्या माणसालाहि त्राहि भगवान् करून सोडण्यास हे ग्रामकंटक समर्थ होतात. हल्लाच्या अधिकारी वर्गाकडून ग्रामोद्धार होईल असे मला वाटत नाही. बाळासाहेबासारखे सुशिक्षित ध्येयवादी तरुण सरकारी नोकरीत शिरतील तरच खेड्यातील लोकास काही सुख लाभेल. तलाठ्यापासून तो अगदी वरिष्ठ दर्जाच्या हिंदी अधिकाऱ्यापर्यंत पैसा मिळविणे हेच प्रत्येकाचे ध्येय असते. रयतेच कल्याण ही दुय्यम बाब होय. पैसे मिळवावयास नोकरीहि केली पाहिजे. म्हणून ती टिकविण्याकरता नोकराच्या जीवाचे पाणी होत असते. नोकरी टिकविण्याकरता ग्रामोद्धारादि सत्कृत्य सहज घडेल तितकेच.

दुर्गुणाच्या आगमनाने सद्गुणाचा लोप झालाच पाहिजे. म्हणून खेड्यातील माणसात सहानुभूतीचा पूर्ण अभाव असता. त्याच्यातून कृत-

ज्ञताबुद्धि साफ नष्ट झालेली असते. सहृदयतेला तेथे थारा मिळत नाही. अस्पृश्य बाई पाणोठ्यावर कितीहि वेळ तिष्ठत बसली तरी तिची कीव कोणाला येणार नाही. "दादा, मला पानी वाडा. घरीं कच्ची बच्चीं पान्यायिन तडफडत्यात" असे काकुळतीने त्या गरीब बाईने म्हटलें तर त्याला उत्तर काय येते ते पाहा :— "जा, जा! इथ कोणाला वेळ आहे? अद्याप पोटात घास गेला नाही माझ्या. खाताची गाडी येईल परत माझी. मला तुकडा खाऊन कामाला लागल पाहिजे." अशी त्याची अन्तःकरणे राठ बनलेली असतात.

दारिद्र्यामुळे लोकाना कशातच उत्साह राहिला नाही. त्याचे औदासीन्य विकोपाला गेले आहे आपण त्याना शिकवावयाला तयार असलो तरी त्याना त्याची परवा नसते. ते येतच नाहीत. त्यानी शिकावे असें आपणाला वाटते, पण त्याना शिकण्याची हौस मुळीच नाही अरविंदाला तोच अनुभव आला. प्रथम प्रथम एक नवीन गमत म्हणून ते उत्साहाने जमत पुढे तो उत्साह ओसरला. शिवाय गावातील गप्पाष्टकाच्या चव्हाट्यावरील अरविंदासबधीचे तर्ककुतर्क त्याच्या कानी पडत त्याचाहि परिणाम त्याच्या हजेरीवर झाला. अशा रीतीने शिक्षणाच्या कामात खळ पडू लागला. खेड्यात गैरसमज फार लवकर फैलावतो निरपेक्ष बुद्धीने कोणी काम करीत असेल असे खेड्यातील लोकास केव्हाहि वाटत नाही स्त्रीपुरुषाचा सबध व प्रेम बहिणीभावाचे असणे शक्य आहे ही कल्पनाहि त्याना करता येत नाही. अरविंद आणि जिजा ह्याच्यात शुद्ध सात्त्विक बधुभगिनीचे प्रेम होते ह्याचें आकलन त्याच्या कल्पनाशक्तीच्या पलीकडे असल्यामुळे अरविंदाविषयी कुत्सित टीका गावात होऊं लागली. ह्यात आणखी तो अस्पृश्यात मिसळतो ह्या गोष्टीची भर पडल्यावर मग खेड्यात त्याची किंमत काय राहणार! हा अनुभव घेतल्यावर अरविंदासारख्या देवमाणसावरहि निराशेचे पटल क्षणभर पडल्यास त्यात नवल नाही. इतके असूनहि अरविंदाचा धीर शेवटपर्यंत खचला नाही असे चित्र

कादबरीकारानी रगविले आहे ते युक्तच होय. "अज्ञानाचा अगोदर निरास केल्याशिवाय त्याना काही कळावयाचे नाही" हा अरविंदाचा निष्कर्ष ग्रामोद्धारकाना मार्गदर्शक होण्यासारखा आहे. ह्याला सध्याच्या शाळात आमूलाग्र सुधारणा करून अगदी नवीन धर्तीवर अरविंदासारख्याच्या देखरेखीखाली नवीन व्यावहारिक शिक्षणक्रम आखणे हाच उपाय योजिणे अवश्य आहे पण हे कोण करणार ह्या विचाराने मन बुचकळ्यात पडतें!

निशाणीच्या आगल्याने लोकाचा घात केला आहे लोकाना लिहिता वाचता येऊ लागले म्हणजे लोकाचा उद्धार होण्यास पुष्कळशी मदत होईल हे प्रस्तुत कादबरीचे सार आहे. ही ह्या भानगडीच्या प्रश्नाची एक बाजू झाली रामतनय आपल्या पुढल्या कादंबरींतून दुसऱ्या उपायाचाहि ऊहापोह करतील ह्यात शका नाही. लोकाना लिहिता वाचता येत नाही ह्या गोष्टीचा फायदा सावकार पुरेपूर घेतात ह्यात सशय नाही. पूर्वी पिढीजाद खानदानीचे सावकार होते तेव्हा असा प्रकार फारसा होत नसे शेतकरी कायद्याने ही सावकारी उपटसुळाच्या हातीं गेली, आणि आता शेतकरी आणि सावकार दोघेहि एकमेकास फसवण्याचा प्रयत्न करीत असतात कुळाच्या अज्ञानामुळे अखेरीस ह्या कामात सावकार यशस्वी होतो एवढेंच आज वस्तुस्थिति अशी आहे की, प्रामाणिकपणे सावकारी करणें अशक्य झाले आहे. सावकारी करावयाची तर लबाडीचा व्यवहार करून ठेविल्याशिवाय गत्यतर नाही. कोणताहि प्रामाणिक व चोख व्यवहार करणारास सावकारी करणे परवडणारच नाही. या पापाचा बराचसा वाटा न्यायपद्धतीकडे गेल्याशिवाय राहणार नाही.

"खरा उद्धार" ही एक साधी सरळ गोष्ट आहे. ह्यात अद्भुतता नाही रोमाचकारक प्रसंग नाहीत. गुंतागुतीच्या घडामोडी नाहीत. तथापि सर्व गोष्ट मनोवेधक आहे. चित्त वेधेल अशा रीतीने तिची माडणी केलेली आहे. मनुष्यस्वभावाच्या सूक्ष्म छटा सफाईदार रीतीने रेखाटल्या आहेत. सहज घडलेल्या गोष्टींनी स्त्रीपुरुषविषयक गैरसमज कसे फलावतात हें

गा रविण्याच्या हेतूने निर्मिलेले प्रसंग यथायुक्त आहेत. भय्यासाहेबा-सारखे पात्र निर्माण करून विमलसारख्या पूर्वप्रेमबद्ध व सुशिक्षित मुलीहि छानछोकीला भुलून कशा क्षणभर चकतात ह्याचें प्रत्यंतर ग्रंथ-कारानी कुशलतेने आणून दिले आहे. अरविंद, जिजा व श्रीपती ही नमुनेदार पात्रे होत. वाचकाच्या मनावर त्यांच्या उदात्त व निष्कलंक चारित्र्याचा परिणाम झाल्यावाचून राहणार नाही. परमेश्वराला जे साधले नाही ते कादंबरीकार करून दाखवितो! असो. समाजापुढे जो सध्या प्रश्न आहे त्याचे आंशिक उत्तर ह्या कादंबरीने दिले आहे. आजकाल अशाच कादंबऱ्याची गरज आहे. परंतु खेड्यातील निरक्षर व द्रव्यहीन माणसानी ह्या कादंबरीचा उपयोग कसा करून घ्यावयाचा हा मात्र बिकट प्रश्न आहे. याचे उत्तर कोण देईल ?

मराठी ट्रेनिंग कॉलेजात अवश्य विषयात ह्या कादंबरीचे वाचन ठेवल्यास भावी शिक्षकाच्या मध्यस्थीने ग्रामोद्धार करण्याचे श्रेय मिळण्या-सारखे आहे तसेच प्रस्तुत कादंबरीची भाषा प्रौढ, समयोचित व परिणाम-कारक असल्याकारणाने हायस्कुलातील विद्यार्थ्यांकडून वाचून घेण्याला ही कादंबरी सर्वथैव पात्र आहे ह्याशिवाय ग्रामोद्धाराच्या अभ्यासाला अत्यंत उपयुक्त व मानसशास्त्रानुसार स्वभाववर्णनाचा नमुना म्हणून कॉलेजा-तील वरील वर्गातहि "खरा उद्धार" लावण्यास हरकत नाही असे मला वाटते.

बदलापूर, ७।२४।१८५८. ना. गो. चापेकर.

# खरा उद्धार.

## अनुक्रमणिका.


| | | प्रकरणाचे नांव | पृष्ठ. |
|---|---|---|---|
| प्रकरण | पहिले | असहाय तरुणी | १ |
| ,, | दुसरे | करागृहातील भेट. | १९ |
| ,, | तिसरे | लंगडा गोप्या ! .. | २५ |
| ,, | चौथे | सखाराम कैदेत कसा पडला ? . | ३५ |
| ,, | पाचवे | पाटलाचा चरफडाट | ४८ |
| ,, | सहावे | किती चमत्कारिक पत्र हे ! | ६० |
| ,, | सातवे | रामगुफेत केशरी पातळ ! | ६८ |
| ,, | आठवे | पति पत्नी मूर्च्छित ! ... | ८१ |
| ,, | नववे | शेटजींच्या घरीं ! | ९२ |
| ,, | दहावे | बबी बेशुद्ध झाली ... | १०४ |
| ,, | अकरावे | खेड्यातील सावकारी ! ... | ११६ |
| ,, | बारावें | गुफेतील भुताटकी ! .. ... | १२८ |
| ,, | तेरावे | "आना कागद करतु आगट !" | १३७ |
| ,, | चौदावे | भाई भय्यासाहेब ! | १४७ |
| ,, | पधरावे | सशयाचे जाळे ... . | १६३ |
| ,, | सोळावें | विविध दृश्ये. .. | १७५ |
| ,, | सतरावे | नवी नवरी ! .. .. | १८८ |
| ,, | अठरावें | "तू ये माझ्याबरोबर" . | १९८ |

| | | | |
|---|---|---|---|
| ,, | एकोणिसावे | कड्यावरून तोल गेला तर–! | २०६ |
| ,, | विसावे | दुष्ट खलबतें. ... . | २१७ |
| ,, | एकविसावे | कडू गोळी. ... ... | २२६ |
| ,, | बावीसावे | "साबाळा आपल्या जीवाला." | २३७ |
| ,, | तेविसावें | सर्वत्र हाहाकार ! ... | २४४ |
| ,, | चोविसावे | अनपेक्षित ताटातूट ! .. | २५३ |
| ,, | पञ्चविसावे | घोटाळ्यात घोटाळा ! . | २६० |
| ,, | सव्विसावे | प्रणयभग. .. .. | २६७ |
| ,, | सत्ताविसावें | नवी नीति ! .. . | २८१ |
| ,, | अठ्ठाविसावे | हृदयभेदी किंकाळी. . | २९२ |
| ,, | एकूणतिसावे | निशाणी आंगठा. .. | ३०३ |
| ,, | तिसावे | त्यागी अरविंद. . | ३११ |
| ,, | एकतिसावे | अरविंदाचा निश्चय. . . | ३२२ |
| ,, | बत्तिसावे | खरा उद्धार . .. | ३३४ |



**शेठ परशराम रामनारायण,**

व्हाइस प्रेसिडेंट, जिल्हा लोकलबोर्ड, ठाणें.

# खरा उद्धार.

## प्रकरण पहिले.

## असहाय तरुणी.

त्या वेळीं ठाण्याच्या कारागृहात आर्यावर्तातील सत्याग्रही राजबंदी ठेवीत असत. तेथे असा एक विलक्षण योग जमून आला होता कीं, ठिक-ठिकाणचे विद्वान् व जनसेवेची कळकळ असणारे राजबंदी एका प्रशस्त खोलींत एके ठिकाणींच ठेवलेले होते त्यामुळे रात्रीच्या प्रशांत वेळीं त्यांना एकमेकांत विचारविनिमय करण्याची संधि आपोआप मिळे.

त्या राजबंद्यांची कारागृहवास कंठण्याची मुदत कोणाची सहा महिने, कोणाची वर्ष, कोणाची दोन वर्षे अशी भिन्न भिन्न होती. त्यांतील सहा महिन्याच्या मुदतीचा अरविंद या नांवाचा एक मुंबईचा राजबंदी अनेकांशीं विचारविनिमय करण्यांत नेहमीं गढलेला असे.

भरीव जनसेवा करावी, असे त्याच्या मनाला फार वाटे. पण हें करावे का तें करावें, अशा गोंधळांत नेहमी त्याचे मन हेलकावे खात असे. मुंबईस असतांना त्यानें त्या वावटळींत मेडिकल कॉलेजला रामराम ठोकला व तो चरखा घेऊन बसला. पुढे चरख्याचा त्याला अल्पकाळांतच कंटाळा आला. पुन्हा आपला अभ्यासक्रम पुरा करावा, असेंही त्याच्या मनानें घेतलें. पण तोही विचार बदलून मजुरांच्या हिताचीं कामें करण्यांत तो गुंतला. त्यांना शिक्षण देण्याच्या रात्रीच्या शाळा काढण्यांत कांहीं काळ त्यानें घालविला. शेवटीं मजुरांच्या मुलांमुलींच्या एका मोठ्या शाळेंत तो शिरला आणि तिला आपल्या मताप्रमाणें नवीन वळण लावण्याचा तो शिकस्तीचे प्रयत्न करूं लागला. अनेक संस्थांचा तो सभासद झाला होता

व त्यात मधून मधून तो झळकेही! वर्ष सहा महिन्याच्या काळात त्याने आपल्या मताप्रमाणे अशी अनेक कामे हातीं घेतलीं, पण एकाही कामात त्याचे मन एकसारखे गुतून राहिले नाही.

कारागृहातही ती त्याची अस्थिर वृत्ति कायम होती संधि सापडेल त्या वेळीं तो राजबद्यांखेरीज इतर गुन्हेगाराशीही बोलत असे. त्याच्या गुन्ह्याची तो विचारपूस करी. त्याच्या मूळच्या स्थितीचीही तो माहिती मिळवी त्यापैकी काहींच्या दुःखाच्या कहाणीने तर त्याला कित्येक वेळा भडभडूनही येई!

रात्रीं आपल्या खोलीत आला कीं, त्या हकिकती तो राजबद्याना मोठ्या कळवळ्याने सागे.

त्याची ती चचल वृत्ति तेथील एका थोर राजबद्याच्या लक्षात आली. त्याने स्वतः अनुभवलेला, मनाची अस्थिरता घालविण्यारा, प्राणायामाचा उपाय अरविंदास सुचविला. त्याला तो पटून त्याने प्राणायामाचे प्राथमिक धडेही त्याच्यापासून घेण्यास सुरुवात केली.

त्याच्या शिक्षेची मुदत आता सपत आली होती. प्राणायामाचा मार्ग त्याच्या अगवळणी पडू लागला होता. कोठे तरी एकातवासात जाऊन राहावे आणि चित्त स्थिर करावे, नतर मनाचा पक्का निश्चय करून धडाडीने कोणत्या तरी एकाच जनसेवेच्या कार्यास जन्मभर वाहून घ्यावें, असें तो आपल्या मनाशीं ठरवीत होता.

एके दिवशी अशाच विचारतद्रीत असता, त्याच्या नावचें एक पत्र सखाराम वॉर्डरनें त्याच्या हातीं आणून दिलें. ते पत्र त्याने फोडलें. तो तें उत्सुकतेने वाचूं लागला.

मुंबई.

प्रिय अरविंद,

**इतक्या दिवसानीं मी आज तुला पत्र लिहीत आहें. खरें म्हणशील, तर ह्यापूर्वी पत्र लिहावें, असें मला वाटत नव्हतें, असें नव्हे. माझें मन**

तसें करण्यास किती पण धाव घेत होते म्हणून सागू ! पण पत्रात काय मजकूर लिहावा, हेच मला कळत नव्हते मुळी ! त्यातून तुझे पत्र येते, तर त्याचें उत्तर म्हणून मला चार ओळी लिहाव्या लागल्या असत्या, नाहीं का ? मी दादाला पत्र लिहीत होते, त्यामुळे आमची घरगुती हकिकत तुझ्या कानावर येत होतीच.

तुला कारागृहात नेत असल्या वेळचा तो प्रसग माझ्या डोळ्यापुढे एकसारखा उभा राहात असतो अरविंद ! महिलासमाजाचा हार तुझ्या गळ्यात घालण्याची कामगिरी मजकडेच आली होती खरी ! पण ती पार पाडताना माझ्या मनाची झालेली स्थिति, अरविंद, तुलाच जाणता आली असेल ! त्या वेळीं माझे शरीर लटलट कापत होते ! हात थरथरत होते ! अतःकरण भरून आल्यानें तोंडातून शब्दच बाहेर पडत नव्हता !

अशा स्थितींत मी तो हार तुझ्या गळ्यात घातला. डोळे भरून तुला पाहीन म्हटलें, पण मेले अश्रूंनीं डबडबलेले डोळे हातरुमालानें पुसून वर पाहातें, तों तू पुढे होतास कुठे ? तुला घेऊन ती निर्घृण मोटार तेव्हाच निघून गेली देखील !

पुढे काही दिवस माझे कसे गेले, हें मी पत्रात कसें लिहू अरविंद ! मी तुला चंचल म्हणत होतें, पण खरे सागूं का ? माझें मन देखील भारींच चंचल ! ते कोणत्याच कामात स्थिर होईना ! त्यानतर मात्र मी मनाचा निश्चय केला. तुझ्याकडे धाव घेत असलेले मन तुझ्या कार्याकडे नेलें, तुझे ते गिरणींतील मुलामुलींच्या शिक्षणाचे काम महिलासमाजाला हातीं घ्यावयास लाविलें, आणि त्याची गेल्या पाच सहा महिन्यातील प्रगति तुझी सुटका झाल्यावर तूं पाहशील, तेव्हाच मी तुला डोळे भरून पाहीन म्हणतें !

नाहीं ! नाहीं ! आता मला पुढे जास्त लिहिता येतच नाहीं मुळीं !

तुझीच

**विमल.**

त्या पत्रावर एक दोन ठिकाणीं डागही पडलेले त्याच्या नजरेस आले. ते तिच्या अश्रूंचेच होत, हे तेव्हाच त्याच्या ध्यानीं आले त्यामुळे तिच्या खऱ्या प्रेमाची कल्पना त्याच्या मनात उभी राहिली. शिक्षेचे उरलेले पंधरा दिवस सपतात केव्हा व आपण मुबईस जातो केव्हा, असे त्याला होऊन गेलें !

त्याच्या मनातील ती खळबळ त्याच्या चेहऱ्यावर उमटलेली होती जवळच सखाराम वॉर्डर उभा होता त्याला काय वाटले कोणास ठाऊक ! सहज त्याने त्यास म्हटलें,

" दादा, आटपदरा दिसात तुमी ममईला जानार, तरीबी कागुद आला कीं, तुमचा जीव इतका लई तुटतुया ! आमी सा वर्स हत काड-तुया, दादा ! "

सखारामाला पुढें बोलवेना. त्याच्या त्या केविलवाण्या मुद्रेकडे पाहून अरविंदाचे मन द्रवले व तो त्याला म्हणाला,

" तुझीं बायकापोर तुझ्या गावी असतीलच की ! त्याचं पत्र तुला कधी येत नाहीं का ? "

" हायती तत, " सखाराम दु.खित अतःकरणाने म्हणाला. " पन रामराय त्येचा सबाळ करनार ! कागुद कोन लिवतोय मला ? लिवायला तरी तत कोन मिळनार त्येना ! तुमासारकी गरिबावर माया करनारी मानसं हायती कुठ तत ? "

सखारामाला जास्त बोलवेना. त्याचे डोळे भरून आले. इतक्यात त्याला जेलरने बोलाविले. तो डोळे पुसून झटपट तेथून निघून गेला

अरविंदाने त्यानतर सधि सापडताच सखारामाच्या घरची हकिकत त्याच्या अपराधाची कारणें, वगैरे माहिती त्याला विचारिली. तशाच प्रकारची हकिकत तो इतर कैद्यानाही विचारीत असे. तेही त्याला ती मोकळे-पणानें सागत असत. त्याना आपलेपणाने विचारणारे कोणी भेटतच नसत. त्यामुळें अरविंदावर ते खेड्यापाड्यातील कैदी मनापासून प्रेम करीत.

सुटकेच्या आदल्या दिवशींचीच गोष्ट. त्या खोलीतील पन्नास साठ राजबंदी झोंपी गेलेले होते. दिवसभर झालेल्या श्रमामुळें त्याना गाढ निद्रा लागलेली होती त्याच्यावरील देखरेख ठेवणारा वॉर्डर उभा असला, तरी त्यालाही झोपेनें घेरलेले होते. बाहेरील बाजूस रक्षकाची गस्त चालू होती. पटांगणातील विजेच्या दिव्याचा प्रकाश त्या खोलीतही प्रवेश करून त्या राजबंद्याच्या हसऱ्या मुखावरील तेज विकसित करीत होता. ते वेंचक वेंचक कार्यप्रेमी एकत्र पाहून असे वाटे की, एकाद्या कुशल जवाहिऱ्यानें तेजस्वी रत्ने निवडून काढली, पण ती एका ओबडधोबड पेटींतच भरून ठेवलीं आहेत कीं काय !

त्या खोलीच्या कोपऱ्यातील दोन राजबंद्यानामात्र झोप आलेली नव्हती. त्या दोघाचें एकमेकात अथरुणावर पडून बोलणे चाललेलें होते. त्यापैकी एक दुसऱ्यास म्हणाला,

" उद्या आपली सुटका झाल्यानतर चार महिने मुंबईस विश्राति घेऊ, मग पुढ काय करायच ते ठरवू अरविंद ! "

" आपल्याला विश्राति भरपूर मिळाली नाही का ? " अरविद झटकन् म्हणाला. " स्वतत्र विचार करण्यास कारागृहासारख योग्य स्थळ आपल्यास मिळाल होतच की मधुकर ! "

" मला नवल वाटत तुझ्या बोलण्याच ! " मधुकर आश्चर्यानें म्हणाला. " ह्या कष्टमय जीवनात स्वतत्रपणे विचार करता येतो म्हणतोस ! "

" खर म्हणशील तर माझ्या विचाराला येथे खूप चालना मिळाली !" अरविंद म्हणाला. " येथे न पाहिलेल्या व न ऐकलेल्या अशा अनेक चमत्कारिक गोष्टीच निरीक्षण करावयास मला तरी सापडल, मग तू काहींही म्हण, मधुकर ! "

" मी काय म्हणणार ? " मधुकर लागट स्वरात म्हणाला. " हे आपले लोक सोडून देऊ. पण ज्याच्या हकिकती तू त्याच्या मनात शिरून

समजून घेत होतास, त्या चोर, दरोडेखोर, खुनी. भामटे याच्यापासून तुझ्या विचाराला चालना मिळाली म्हणतोस ? नवल आहे ! तुझं सारच विचित्र ! ”

“ विचित्रपणा सर्वत्र आहे. ” अरविद शातपणे म्हणाला. “ न्यायाच्या कसोटीनं हे सर्व अपराधी खरे, पण खेड्यापाड्यातील गुन्हेगार आपल्या गुन्ह्याचीं जीं कारण सागतात, त्यावरून मुबई निराळी व ती खेडेगावं अगदींच वेगळीं, अस मला तरी वाटतं मधुकर ! मुबई सोडून आपण अशा गावी राहिलो नसल्यामुळ ह्या हकिकती आपल्याला नवलाच्या नव्हत का ?”

“ तू मजुरात मिसळत असतोस,” मधुकर म्हणाला “ ते तर खेड्या-पाड्यातून आलेले असतात मग त्याच्या गावची स्थिति तुझ्या कानावर पडतच असेल नाही ? मग ह्या समाजघातकी लोकाच्या कहाणीनं तुला नवे विचार ते कसले सुचणार ? ”

“ कारागृहवासी सर्वच दुष्ट असतात अस तरी कस म्हणता येईल मधुकर ? ” अरविद म्हणाला “ त्या सखाराम वॉर्डराची कथा काय सागते ? बिचारा किती सालस व पापभीरू ! पण तो तुरुगात खितपत पडला ना ? त्याचा अपराध तरी कोणता, याचच कोड मला उलगडता येत नाही. इतकी त्याची कथा आश्चर्यकारक दिसते ! ”

“ जाऊं दे रे ” मधुकर म्हणाला. “ असं चालायचच ! ह्याला आपण काय करणार ? आणि इतक खोलात शिरा तरी कशाला ? राज्य-घटना मनाजोगी झाली, की सर्व काहीं सुरळीत चालेल, असं नाहीं का अरविंद ! ”

“ ते काहीस खर आहे, अस जरी मानल, तरी तें साध्य नव्हे, ते फक्त साधन होईल. ” अरविंद अथरुणावर कोपर टेकून जोराने म्हणाला. “ अज्ञ जनतेचं कल्याण साधून तिचा विकास करण, दारिद्र्य, दुःख यातना याचा नाश करून सर्वांना सुखात आयुष्य घालविण्याची संधि मिळवून देणं, हें आपल साध्य नव्हे का ? ”

" वा रे अरविंद ! " मधुकरही जोराने म्हणाला. " तुझ्या विचाराची दिशा कुणीकडे झुकू लागली आहे ? अशीं मत तुझीं केव्हापासून झालीं आहेत ! मीतर तुझे असे विचार आजच ऐकत आहे ! "

" मीनवीन ते काय बोलतों आहें ? " अरविंद म्हणाला. " जे मला पटू लागल, ते मी स्पष्ट म्हटल एवढच ! अस पाहा कीं, मुबईचे तुमच्या-आमच्यासारखे लोक म्हणजे खरी जनता नव्हे. खरी जनता अफाट प्रदेशातील खेड्यापाड्यात विखुरलेली आहे. तिची उन्नति म्हणचे देशाची खरी उन्नति नव्हे का ? "

" नाही कोण म्हणतो ? " मधुकर म्हणाला. " आम्ही ज्या चळवळी चालवितो, त्या त्याच्या कल्याणाकरिताच. "

" तुम्ही ! " अरविंद घोंगडीवर मूठ आपटून म्हणाला " म्हणजेच सधन लोक आपल्याकरिता उठाठेवी करिता. गोरगरिबाकरिता तुम्हीं काय केलें आहे, साग मला ! "

" खादीची निपज गोरगरिबाकरिताच नव्हे का ? " मधुकराने जोरानें उत्तर दिले.

" आजपर्यंत गोरगरीब जाडेभरडेच कपडे वापरीत होते. तुम्ही लक्ष्मीपुत्र तसले कपडे दिखाऊपणापुरते वापरता तुमच्या मोटारी, तुमचे बंगले, तुमची उधळपट्टी, चैन हीं सारी गरिबाचच हित साधीत असतील नाहीं ! " अरविंद मोठ्या आवेशाने बोलला.

अरविंदाचा तो त्या वेळचा आवेश पाहून मधुकर चकित झाला. तोही जोराने उत्तर देण्याच्या विचारात होता. पण त्या वेळी वॉर्डर डुलकींतून जागा झाला. बाहेरूनही रक्षकाचे ताकिदीचे शब्द कानी आले. त्यामुळे मधुकर बिछान्यावर डोके टेकीत टेकीत हलकेच म्हणाला,

" स्वस्थ पड अरविंद. नाहीं तर, आपल्या सुटकेचे एक दोन दिवस लाबतीलही ! तुझ्या अंगात आज ते भय्यासाहेबच शिरले आहेत असं वाटतं ! "

दोघेही बिछान्यावर स्वस्थ पडले. थोड्या वेळात मधुकराचा डोळा लागला. अरविंदास मुळी झोपच येईना. तो ह्या कुशीवरून त्या कुशीवर सारखा तळमळत पडला होता !

त्या वेळीं त्याच्या मनात अनेक विचाराचे काहूर उठले होतें. त्यात मधुकराने केलेल्या भय्यासाहेबाच्या उल्लेखामुळे त्याच्या मागील आठवणी जागृत झाल्या, आणि त्या तशा जागृत का होऊ नयेत बरे !

कारण, भय्यासाहेब जहागिरदाराचे नाव तशाच एका नाजूक बाबतींत त्याच्या कानावर आले होते. त्यामुळे त्याची व अरविंदाची प्रत्यक्ष गाठ पडली नसली, तरी ते नाव त्याच्या कायमचे लक्षात राहिले होते !

अरविंद व मधुकर हे दोघे मराठा तरुण अगदी बालपणापासूनचे स्नेही होते. मधुकर गर्भश्रीमंत व्यापारी होता. त्याच्या वडिलानी भरपूर संपत्ति संपादन केली होती. त्याची साक्ष मुंबईस चौपटीवर डौलाने वर तोंड काढणारी सुंदरशी बंगली कोणासही देत होती. अरविंदाचे वडील सरकारी नोकर होते. त्याचा व मधुकराच्या वडिलाचा चागला स्नेह होता. त्यानी आपल्या मुलाकरिता पुरेशी पुंजी राखून ठेविली होती. मधुकराचे वडील व अरविंदाचे वडील ह्याची जोडी नेहमी एकत्र असावयाची. आणि गमत अशी की, ते दोघेही थोड्या दिवसाच्या अतरानेच आपापल्या लहान मुलाबाळाना मागे ठेवून स्वर्गस्थ झाले !

अरविंदाचा साभाळ करणारे दुसरे कोणीच नव्हते. मधुकराच्या आईनेच आपल्या मुलाप्रमाणें त्याला मानले. मधुकर व अरविंद ह्याच्यापेक्षा वयाने पाचसहा वर्षांनी लहान अशी मधुकराची विमल नावाची बहीण होती.

लहानपणापासूनच अरविंदाचे व तिचे दिवस खेळीमेळीत जात. पुढे ती कॉलेजात जाऊ लागली, तेव्हापासून त्या खेळीमेळीचे रूपातर प्रेमात झाले. ही गोष्ट बरेच दिवस आईसाहेबाच्या लक्षात आली नव्हती !

त्याच्या समजुतीप्रमाणे विमल मोठी होऊ लागल्यानतर त्यानीं तिच्या-करिता स्थळें पाहण्यास सुरुवात केली. त्यात भय्यासाहेब जहागिरदाराचें

नाव बरेच पुढें आले. इतकेच नव्हे, तर त्याकरिता त्याचा ठाव ठिकाण शोधण्याचा त्यानीं पुष्कळ प्रयत्न केला. परतु तो मात्र त्याना लागला नाहीं. भय्यासाहेबानीतर तो कोणासच लागूं दिला नव्हता! ह्यामुळे व अरविंद व विमल याचे प्रेम आहे, हे कळल्यामुळे आईसाहेबानीं तो नाद सोडून दिला होता.

ह्या कारणाने अरविंदाच्या लक्षात ते नाव चागले होते. शिवाय भाड-वलशाहीवर हल्ला करणाऱ्या चळवळयातही अलीकडे भय्यासाहेब चमकू लागले होते. त्यामुळे मधुकराने अरविंदाशी बोलताना त्याचा मुद्दाम उल्लेख केला होता!

अरविंदाने झोपेचा प्रयत्न पुष्कळ केला, पण व्यर्थ एकदा त्याने आपल्या घोगडीवरील चादर काढून ती पाघरली, पुन्हा त्या चादरीत आपले कपडे घालून त्याने तिची उशी केली व तो उघडा पडला, पण झोप येईना! नतर पुन्हा चादर घोगडीवर घालून उलट दिशेस डोके करून तो पडला, तरीही त्याला कसलीती झोप येईना अशा धडपडीत ठण्ण, ठण्ण, ठण्ण असे ठोके पडलेले त्याने ऐकिले ह्यापूर्वी ठोके पडले होतेच व प्रत्येक अर्ध्या अर्ध्या तासाने गस्तीचे ठराविक शब्दही होत होते, परतु त्याची त्याला दादच नव्हती! आता मद वारा सुटू लागला होता. त्याचे मनही पुष्कळ वेळ झालेल्या विचाराचा परिणाम होऊन शात होऊ लागले होते. तो बिछान्या-वर उठून बसला त्याने आपले मस्तक पाण्याने थोडे थड केले व तो पुन्हा लवडणार, इतक्यात मधुकर त्याच्या हालचालीने जागा झाला व म्हणाला,

"काय अरविंद! अद्यापही तू जागाच!"

"अरे, मीं झोप येण्याचा पुष्कळ प्रयत्न केला, पण ती येईनाच मुळी! मी तरी काय करूं!" अरविंदाने उत्तर दिलें

"वेड्या, नीज आता! किती वेळ जागत बसणार? मनातले विचार काढून टाक, म्हणजे तुझा डोळा लागेल," मधुकराने सागितले.

" मनातले माझे नवे विचार काढून टाकण्याची गोष्टच बोलू नकोस मधुकर! आता तर त्याची पाळेमुळे माझ्या मनात अगदीं खोल जाऊन बसली आहेत!" अरविंद म्हणाला.

" काय! तुझ्या डोक्यातील वेड अद्यापही जात नाहीं?" मधुकर कळकळीने बोलला

" उद्या मुंबईस जाऊ नये, असं माझ्या मनानं घेतलं आहे मधुकर! चित्ताची स्थिरता संपादण्याकरिता मी एकांतस्थळीं कांहीं काळ घालविणार व तसं स्थळ शोधण्याकरिता मी कुठं तरी गिरिकंदरांत भटकत फिरणार!" अरविंद म्हणाला

" वा! छान बेत चालला आहे तुझा!" मधुकर म्हणाला. " उद्या आनंदानं तुला भेटण्याकरिता विमल येईल. तिला तुझं म्हणणं पटवून दे, म्हणजे तुझा मार्ग तुला मोकळा होईल "

अरविंद ह्यावर कांहींतरी बोलण्याच्या बेतात होता परंतु न बोलताच तो बिछान्यावर कलंडला. मधुकराला वाटले कीं, आपण विमलची आठवण करून दिल्यामुळे तो निरुत्तर झाला असावा. मधुकराला थोड्याच वेळात पुन्हा झोप लागली. अरविंद बिछान्यावर पडला असला, तरी विचार-तंद्रीतून त्याची सुटका झाली नव्हती. तो मनात म्हणू लागला, " मुंबईस जाऊ नये, असं आपल्यास वाटतं, ह्याचं तरी कारण काय? विमलच्या प्रेमातच आपण गुरफटू, हेच की नाही? पण आपण तिकडे न गेल्यानं तिचीही निराशा होणार नाही का? तिची समजूत घालून मग आपण एकांतस्थळीं गेलो, तरीही काय हरकत आहे? तीही सुज्ञ आहे. तिला आपण आपले विचार पटवूं. मगच काय करावयाचं तें ठरवूं." पण पुन्हा त्याला असे वाटे कीं, " तिची संमति मिळाली नाही तर? मनाची असंतुष्टता जन्मभर जाणार नाहीं, आणि मग संसारसुख नाहीं व जनसेवा तर नाहींच नाही!"

असे त्याचे विचार चालले असता अरुणोदय झाला. कारागृहातील

याखळदडाचे खळखळ आवाज कानी येऊ लागले. कैद्याना सुटत असलेले हुकूम ऐकू येऊ लागले. कोठडयाचीं कुलपे निघाल्याचे आवाज कानीं पडू लागले. थोड्याच वेळात कारागृहात जिकडे तिकडे धादलच धादल सुरू झाली.

कारागृहातून सुटका होण्याचे त्याचे सर्व विधि यथासाग पार पडले. ते बदीखान्याच्या प्रवेशद्वारातून बाहेर आले. मधुकराच्या स्वागतार्थ प्रचड जनसमुदाय तेथे जमला होता मुबईहून स्वयसेवक मुद्दाम आले होते. अनेक सस्थानीं त्या उभयताना सुताचे हार अर्पण करून त्याचा मोठा गौरव केला, मधुकर नको नको म्हणत असता, त्याची मिरवणूक लोकानीं काढली !

मधुकरासारख्या लक्ष्मीपुत्राचा इतका सन्मान जनतेने चालविला होता, ह्याचें कारण त्याच्या तेजस्वी वक्तृत्वाने अनेक श्रीमंत तरुण त्याना वाटणाऱ्या त्या राष्ट्रीय यज्ञात भाग घेऊ लागले होते. तो काळच असा होता कीं, थोड्या स्वार्थत्यागानें कीर्तीचे भरपूर माप पदरात पडे. अरविद कार्यप्रेमी होता. त्याचा मुख्य भर विधायक कार्य करण्याकडे असे. कीर्तीच्या आशेने तो ते करीत नसे. त्याच्या अतःकरणातील गोरगरिबाविषयींची तळमळ त्याला कार्यप्रवृत्त करी. आपल्या मुलाना दु:खी पाहताच मातेला जसा प्रेमाचा उमाळा येतो, तशी स्थिति गोरगरिबाना पाहून त्याची होत असे.

मिरवणुकीच्या सोहळ्यात मधुकर रंगून गेला होता, पण अरविंदाचें चित्त ठिकाणावर नव्हते. त्याला कोणत्यातरी कारणाने चुकल्या चुकल्यासारखे वाटत होते ! इतक्यात एका स्वयसेवकाने एक पाकीट मधुकराच्या हाती दिले. त्याने त्यावरील हस्ताक्षर तेव्हाच ओळखले. सस्मित होऊन त्याने एकवार अरविंदाकडे पाहिले. पाकीट उघडून आतील पत्र तो वाचूं लागला. अरविदाची नजर त्या पत्राकडे होतीच. इतक्यात त्याने अधीरपणें त्यास विचारले,

" पत्र कोणाचं आहे ! "

" अरे, जी येथे न आल्यामुळं तूं दुःखी दिसतोस त्या विमलचंच हें पत्र बर ! " मधुकर हंसत हंसत म्हणाला.

कोमेजूं लागलेली मोगऱ्याची फुले जलसिंचनाने जशी टवटवीत दिसूं लागतात, तशी स्थिति अरविंदाची झाली.

मधुकराने ते पत्र अरविंदाच्या हाती दिलें. त्याने ते छोटे पत्र वाचून काढले. ते पत्र असे होते '— मुंबई

" प्रिय बंधु मधुकर,

सोबत एक जाहीर पत्रक पाठविले आहे तुझ्याच हस्ते आजच्या देशी वस्तूंच्या प्रदर्शनाचा उद्‌घाटनसमारंभ करण्याचे आमच्या महिला-समाजाने ठरविले आहे निमंत्रित स्त्री-पुरुषांचे स्वागत करण्याची व सर्व व्यवस्थेवर देखरेख ठेवण्याची कामगिरी मजकडे दिलेली आहे. त्यामुळे मला ठाण्यास येता आले नाहीं. बोरीबंदरवर साडेनऊ वाजता येणारी लोकल चुकूं देऊं नका. तेथे प्रथम आमच्या मंडळातर्फे आपल्या स्वागताचा लहानसा समारंभ होईल. बरोबर अरविंद येत आहेच, त्याला येवढेच सांग की, मी येथे असले, तरी माझे मन ठाण्यास केव्हाच निघून गेले आहे !

तुझी नम्र भगिनी

विमल. "

पत्र वाचल्यावर अरविंद आनंदित झाला. तिच्या कार्यप्रियतेचे कौतुक त्याला जास्त वाटले. त्यामुळे मुंबईस जावे, असा त्याच्या मनाचा कल होऊं लागला !

मिरवणूक स्टेशनपर्यंत आली. बोरीबंदरवर ठरलेल्या वेळेला पोहोंचण्याच्या घाईमुळे आगगाडीकडे सर्व मंडळी तडक चालली. अरविंद व मधुकर पहिल्या वर्गाच्या डब्यासमोर उभे होते. गाडी सुटण्यास थोडा अवधि होता. तेवढ्या वेळात समोरील प्लॅटफॉर्मवर एक गाडी येऊन उभी

राहिली. तिकडे त्याची सहज नजर गेली. त्या गाडीतील एका डब्यातून केशरी रंगाचें पातळ परिधान केलेली एक सतरा अठरा वर्षांची तरुणी खालीं उतरत होती. पण गाडींत बसलेली एक व्यक्ति तिचा पदर धरून तिला उतरू देत नव्हती. तें दृश्य अरविंदानें पाहिलें. झटकन तो त्या डब्याकडे धावला त्याच्या मागोमाग मधुकरही तिकडे गेला.

अचानकपणे अरविंदास पाहून ती तरुणी जरा गोंधळली, पण क्षणार्धांत ती करुणपूर्ण स्वरात म्हणाली,

" अरविंददादा, मला याच्या हातून सोडवा हो ! मी बाबाच्या भेटीकरिता इथं उतरत आहे. पण मला उतरूच देत नाही मुळीं हा मेला ! "

त्या स्त्रीचे सर्वांग थरथरत होते. नेत्र अश्रूंनीं डबडबले होते. तिची सुंदर व करुण मुद्रा अवलोकन करून कोणाही सहृदय माणसास भडभडून येण्यासारखी ती स्थिति होती. प्लॅटफार्मवरील लोक तेथें गोळा झाले. त्यामुळे घाबरून जाऊन त्या व्यक्तीनें तिचा पदर सोडला. सर्व सामान घेऊन ती व्यक्ति खाली उतरत असता तिला म्हणाली,

" मलाही सखारामाला भेटावयाच आहे. पण आमच्यासारख्या खेडवळाना त्याची भेट कशी होणार ? म्हणून मी म्हणत होतो, आपण आपल्या गावींच जाऊ. पण तुझा हट्टच भारी ! तर मीही इथच उतरतो ! "

भयभीत झाल्यामुळे बोलत असता ती व्यक्ति कापत होती ! ती तरुणी पुढे म्हणाली,

" अरविंददादा, माझ्या बाबाची भेट तुम्ही करून द्याल का हो ! "

तिचा कंठ दाटून आला व तिला पुढे बोलवेना. मधुकर अरविंदाकडे पाहून आश्चर्यानें उद्गारला,

" काय ! तुला ही ओळखते आहे ? "

" होय, आमच्या शाळेत ही एक चलाख मुलगी होती हे खर. " अरविंदानें उत्तर दिले.

दोघे इंग्रजींत बोलत होते. त्यामुळे त्याचा बोध त्या व्यक्तीस झाला नाहीं.

" तुझे वडील ठाण्यास कोठ आहेत, म्हणतेस ! " मधुकराने तिला विचारले

" तो कुत्र्याचा सत्यानाशी ठाण्याच्या तुरुंगात खितपत पडला आहे ! " ती खालीं उतरलेली व्यक्ति कुत्सितपणें मध्येच बोलली.

हे शब्द ऐकून त्या तरुणीने क्रुद्धतेने त्या व्यक्तीकडे पाहिले. त्या वेळीं तिचा चेहरा रागाने लाल झाला होता

इतक्यात ती गाडी सुटली मुंबईची लोकलही सुटण्याच्या बेतात आली होती. त्या तरुणीचे अप्रतिम लावण्य व तिची ती करुण स्थिति पाहून मधुकराचे पाय गाडी गाठण्याकडे जाईनात त्या स्त्रीचा पिच्छा पुरविणारा तो राकट प्राणी त्यास सैतानासारखा वाटला पण ही गाडी चुकल्यास विमलने ठरविलेल्या कार्यक्रमात गोंधळ उत्पन्न होईल, ह्याची जाणीव त्याला झाली.

त्यावेळी अरविंदाच्या मनाची ओढ मुंबईस जाण्याकडे होती, परंतु ह्या अचानक उद्भवलेल्या प्रसंगाचा गंभीरपणा त्याच्या लक्षात आला. तो मधुकरास कांहीं बोलणार, इतक्यात तोच अरविंदास इंग्रजीत म्हणाला,

" अरविंद, ही तरुणी तुझ्या माहितीची दिसते. हा लांडगा तर तिच्या मागे लागलेला आहे, म्हणून पूर्णपणे तपास करून तू तिला मुंबईस घेऊन ये. हिच्या केशरी साडीवरून ही विमलच्या महिलासंघापैकीं कदाचित् असेलही !"

" ठीक आहे, " अरविंद उद्गारला.

इतक्यात गाडी चालू झाली.

मधुकर धादलीने गाडींत चढला व ' अरविंद, लवकर मुंबईस ये ' असे बोलला.

अरविंद कांहीं बोलणार, तों गाडी निघून गेली.

अरविंदाने एकवार त्या असहाय तरुणीकडे कारुण्यपूर्ण नजरेने पाहिले, व लगेच त्या राकट, चाळिशी उलटलेल्या, अंगावर रेशीमकाठी उपरणें असलेल्या, डोक्यास चदेरी पगडी तिरपी घातलेल्या, काळसर वर्णाच्या व्यक्तीकडे अशा तीक्ष्ण नजरेने पाहिले की, त्यामुळे तिची गाळणच उडाली !

ती व्यक्ति गोंधळली ! तिचा चेहरा अधिकच काळवंडला ! ती कंपित स्वरात बोलण्याचा प्रयत्न करू लागली ! पण तोंडातून शब्दच बाहेर पडेनात !

---

## प्रकरण दुसरें.

# कारागृहांतील भेट.



सखाराम बदीखान्यात पडला होता खरा, परतु दुसऱ्या कित्येक बदमाष कैद्याप्रमाणें तो नव्हता. त्याचें बदीखान्यातील वर्तन उत्तम प्रतीचे होतें. त्यामुळे तेथील अधिकारीही त्याच्यावर खूष असत आपल्याला दिलेले काम तो बिनबोभाट पार पाडी. कोणतेही काम करीत असता, त्याचा तोंडा-तल्या तोंडात रामनामाचा जप चालू असे. पूर्वजन्मींच्या पापाचे फळ ह्या जन्मीं भोगावे लागत आहे, अशी त्याची दृढ समजूत होती. त्याला वॉर्डर केल्यानतर त्याची नेमणूक ज्या कैद्यावर होत असे, ते कैदीही बिनतक्रार आपआपली कामे करीत. तो आरभी येरवड्याच्या तुरुगात होता. तेथे राजबद्याची गर्दी झाल्यामुळे त्याला ठाण्याच्या कारागृहात आणले होतें. तेथे तो राजबद्यावर वॉर्डर होता. त्याचे शुद्धाचरण पाहून अरविंद म्हणत असे की, सखाराम म्हणजे काटेरी वनराजींत यदृच्छेने उत्पन्न झालेला चंदनतरुच होय!

गेल्या सहा वर्षांत कारागृहात त्याची भेट घेण्यास कोणींही आले नव्हते. येणार तरी कोण? त्याच्या सोनगावीं त्याची पत्नी व अकरा बारा वर्षांची एक कन्या एवढींच काय तीं त्याच्या प्रेमाचीं खरीं माणसे होती. कारागृहातून तीन तीन महिन्यानीं पत्र पाठविण्याची सवलत असे, पण ती कित्येक दिवस त्याला माहीतही नव्हती. पुढे ती त्याला कळल्यावरही त्याने तिचा उपयोग आजपर्यंत घेतला नव्हता. सोनगावचे पत्र त्याला येईल म्हणावें, पण अज्ञानामुळें तसेही होणे शक्य नव्हतें!

त्या दिवशीं चार वाजण्याच्या सुमारास त्याला जेलरनें बोलाविलें. तो तावडतोब त्याच्या कचेरींत गेला. " सखाराम, इतक्या दिवसात तुला

कोणी भेटण्यास आले नाहीं, पण आज तुझी मुलगी तुला भेटण्यास आली आहे, बघ. " जेलर सहानुभूतीच्या स्वरात म्हणाला.

सखाराम आश्चर्यानें थक्कच झाला. आपली मुलगी आपल्यास भेटण्यास आल्याचे त्यास खरेच वाटेना. आपल्या दूरच्या सोनगावाहून ' आपल्याकडे ती कशी आली, तिला कोण घेऊन आलं असाव, ' असें मनात म्हणत म्हणत, तो भेटीच्या खोलींत आला. समोरील जाळीच्या पलीकडे आजच सुटलेल्या अरविंदाजवळ एक सुदर तरुणी त्याला दिसली.

तिच्याकडे तो पाहूं लागला. तिचे ते केशरी रगाचे पातळ व शहरातील पांढरपेशा स्त्रियाप्रमाणे तिची ती नीटनेटकी केशरचना पाहून ती आपली मुलगी असेल, अशी त्याला प्रथम कल्पना करवेना ! अरविंदाकडे पाहून तर तो जास्तच भांबावला !

आपले वडील आपणास केव्हा भेटतील, याची तीही आतुरतेने वाट पाहात होती. इतक्यात समोरील जाळीच्या आतील बाजूस एक इसम आला व तो तिच्यासमोर उभा राहिला. त्याची ती पिवळी पगडी, लाडी विजार व कमरेचा पट्टा पाहून, क्षणभर तिला मुबईच्या पोलीसची आठवण झाली. ह्या इसमाचे केस बहुतेक पांढरे झाले होते. त्यामुळे तर, ते आपले वडील असतील, असे तिलाही प्रथम वाटेना !

सखाराम एकसारखा तिच्याकडे टक लावून पाहात होता. तीसुद्धा त्याच्याकडे त्याप्रमाणेच पाहात होती. अशा स्थितीत काही वेळ गेला. पुढे तिची ती मनोहर, निर्व्याज मुद्रा व तेजस्वी नेत्र ह्यांचा त्याच्या मनावर परिणाम झाला. ती आपलीच मुलगी आहे, अशी त्याच्या मनाची खातरी पटल्याबरोबर त्याचे डोळे अश्रूंनी डबडबले. पुढे तर जसा एखादा बधारा फुटून पाण्याचा प्रवाह वाहूं लागावा, तसे त्याच्या नेत्रातून घळघळ अश्रु वाहू लागले. त्यातच वरचेवर कठ दाटून आला. त्याला उभेच राहवेना. तो मटकन् जवळच्या बाकावर बसला. त्याने आपले मस्तक गुडघ्यात खुपसलें !

त्या तरुणीचाही कंठ दाटून आला. तिच्या तोंडून प्रथम शब्द निघेनात. ती त्या जाळीवर डोके टेकून रडू लागली. लहानपणीं कोठून तरी धावत धावत येऊन, आपल्या वडिलांच्या कंठास मिठी मारून, ती त्याच्या मांडीवर बसे. तसें आता करावें, असेंही तिला त्या वेळीं वाटल्याशिवाय राहिलें नाही. आपल्या मुलीस पुष्कळ दिवसांनी पाहिल्यामुळे सखारामाचें अपत्य-प्रेम उचंबळलें होतें ह्या देखाव्याने जेलरचेंही अंतःकरण द्रवलें.

अरविंद हा सर्व प्रकार पाहात होता. त्याचीही मनःस्थिति तिचें सांत्वन करण्यासारखी नव्हती. तो आपल्या डोळ्यास हातरुमाल लावून उभा होता. अशा स्थितींत कांहीं वेळ गेला.

जेलरला जास्त वेळ देणे शक्य नव्हतें. त्याला असे देखावे पाहण्याचा सराव पुष्कळ होता. त्यामुळें तो सखारामास अधिकारयुक्त वाणीने म्हणाला,

"सखाराम, रडून काय होणार आहे? पुष्कळ दिवसांनीं तुझी मुलगी तुला भेटावयास आली आहे तरी तिच्याबरोबर चार शब्द बोल. उगीच वेळ घालवू नकोस."

सखाराम चटकन् भानावर आला तिनेही ते शब्द ऐकले. भेटीला फार थोडा वेळ मिळतो, असे पूर्वी अरविंदाने तिला सांगितलें होतें. म्हणून ती डोळे पुसून आपल्या वडिलांकडे पाहू लागली.

"जिजा, तू इकडे आलीस कशी ग?" सखारामाच्या तोंडून कसेतरी शब्द बाहेर पडले.

"मी पांच सहा वर्षं मुंबईस चिमा मावशीकडे आहे. दोन तीन दिवस झाले, आपले बळी पाटील मावशीकडे आले तुमची भेट घेऊन नंतर आपण सोनगावीं जाऊं असे ठरवून मुंबईहून तो मला घेऊन निघाला, पण मेला ठाणे स्टेशनवर उतरेना! मलाहि उतरू देईना! तिथे अरविंददादा होते, म्हणून तुमची भेट तरी झाली बाबा!"

जिजा अडखळत अडखळत बोलली.

बळी पाटलाचें नांव कानीं पडल्याबरोबर सखारामाचा चेहरा लाल

झाला व तो म्हणाला,

" तो बळ्या कुट गेला ? माज्याकडं तो कसचा येतोय ?"

सखाराम मानेला खालवर हिसके देत बोलला व थोडा थाबला.

बापाचा त्या वेळचा तो आविर्भाव व त्याची संतप्त मुद्रा पाहून जिजा घाबरली तिला काय बोलावे हेच सुचेना.

" सखाराम, तुमच्या गावचे पाटील स्टेशनवरच बसले आहेत मी इकडे चलण्यास त्याना पुष्कळ आग्रह केला, पण ते येईनातच," अरविंद मध्येंच म्हणाला

अरविंदाच्या या बोलण्यान जिजाला थोडा धीर आला तिने ठाणें स्टेशनवर घडलेली सर्व हकिकत त्याना थोडक्यात सागितली व ती म्हणाली,

" बाबा, मला हो काय ठाऊक बळिवा पाटील असे असतीलसे ! "

सखारामाने आता उसळ्या घेत असलेला मनातील राग आवरला व तो कविलवाण्या स्वरात म्हणाला,

" बाळ, तुला काय ठाव असनार ! पन चिमीला संमद ठाव है ! तिन त्येच्याबराबर तुला धाडायची नाई ! अरविंददादा म्हंजे तुला देवच भेटलाया म्हनायचा ! "

" मी यात काय केल ? " अरविंद म्हणाला. " सहज स्टेशनवर गडबड दिसली, म्हणून मी तिकडे गेलों. जिजा आमच्या शाळेंत शिकत होती. ती मोठी हुशार आहे बर सखाराम ! "

अरविंदाने मुलीची केलेली ती स्तुति ऐकून सखारामाला मूठभर मास चढल्यासारखे झाले. त्याने समाधानाचा एक सुस्कारा टाकला व तो पुढें म्हणाला,

" आता तू कुट जानार म्हनत्येस ? "

" अरविंददादा पोंचवतील तिकड जाणार ! मी पाच सहा वर्षात मुंबई सोडली नाहीं. चिमा मावशी मला सोनगावीं पोचविण्यास तयारच नव्हती मुळीं ! मलाही पण शाळा बुडवू नये, असंच वाटत होत. मी शाळेंत

जाऊन पुष्कळ शिकले बाबा ! अलीकडे मात्र मला आईकडे जावं जावं असं सारख वाटतय ! ”

जिजा थाबली. तिचे डोळे भरून आले. मुलीची ती अवस्था पाहून सखारामाच्या डाळ्यापुढे त्याच्या पत्नीची मूर्ति दिसू लागली त्याचा कठ सद्गदित झाला. त्याने एक मोठा उसासा टाकला.

“ सखाराम, वेळ सपत आला आटप लवकर ! ” जेलर म्हणाला.

“ बाबा, मी घरी गेले तर आईला काय सागू ? ” जिजाने बोलण्याची गडबड केली

“ पन, अश्शी एकटी कुटं जाऊ नग बाळ ! अजून तुज लगीन झालल नाई ग ! ”

सखाराम एवढे बालला व थोडा थाबला नतर मोठ्या काकुळतीस येऊन अरविदास म्हणाला,

“ दादा, आता इला तुमी धरमाची भण माना. इला आता त्या चिमी-कड नेऊं नगा ! काय न्याम मागावा ? ती काइबी करील ! म्हनून पाया पडूनशानी सागतुया, दादा, अदुगर इला सोनगावला इच्या आईकड न्या ! ”

सखाराम थोडा थाबला. पुन्हा वेळ संपल्याची ताकीद आली, तेव्हा तो पुढे म्हणाला,

“ आमच्या सोनगावच्या जगलात सीतामाईचा डोंगर है. तत पानीबी नामी है ! लाबलाबच साधू तत येऊन राहात्याती. ततल ठिकान तुमास्नी पाहिज तसच है ! म्हनून मी पुना हात जोडून सागतुया अरविंददादा, माज्या जिजीला तुमीच सोनगावला न्या. नाईतर तिची धडगत नाई बगा ! ती चिमा आन त्यो बळ्या, माज्या पोरीचं वाटुळ करत्याल दादा ! ”

जास्त बोलण्याची मुळीं सोयच नव्हती. जेलरने सखारामास आत चलण्याचा हुकूम केला. त्या वेळीं त्याने जाळींतून हात घालून मुलीच्या तोंडावरून हात फिरवला. उभयताच्या डोळ्यातून अश्रु वाहत होते. अरविंदास तो तिला घरीं पोचविण्याची विनति आपल्या घोगऱ्या आवाजात

करीत होताच. इतक्यात जेलर सखारामावर कडाडला, त्यामुळें अरविंदास पुन्हा त्याच्याबरोबर बोलण्याची संधिही मिळाली नाहीं. त्यानें हाताच्या खुणेनें सखारामास काळजी करूं नको म्हणून सुचविलें. जिजा एकसारखी वडिलाकडे पाहात होती. ते दिसेनासे झाल्याबरोबर तिचा मनावरील ताबा सुटला. ती तेथेंच मटकन् खाली बसली व मनमुराद रडूं लागली ! अरविंदाचें अंतःकरणही हळुवार होतें. तशांत जिजाच्या अश्रूंनीं त्याचें मन अधिकच द्रवलें.

पुढें काय करावें, ह्या विचारांत अरविंद पडला कारागृहाबाहेरील एका बाजूच्या वृक्षाखाली येऊन, तो तेथील एका शिळेवर बसला. दुसऱ्या एका शिळेवर जिजाही बसली ती अद्याप रडतच होती मुंबईस जाऊं नये, असा जरी सकाळीं कारागृहांतून सुटण्याच्या अगोदर त्याचा बेत चालला होता, तरी विमलच्या पत्रानंतर मुंबईसच प्रथम जावें, असें त्याला वाटूं लागलें होतें ! स्टेशनवरील घडलेल्या प्रकारामुळें त्याला मुंबईस जातां आलें नाहीं आतां तर सखाराम वॉर्डरनें कळवळून सांगितल्याप्रमाणें प्रथम जिजाला तिच्या घरीं पोंहोंचविणें जरूर झालें. पण तिच्यासह प्रथम मुंबईस जाऊन नंतर तिला तिच्या आईकडे पोंहोंचविण्यास काय हरकत आहे ? फार तर सखारामानें सांगितल्याप्रमाणें तिच्या मावशीकडे तिला नेऊं नये म्हणजे झालें, असा मनांत विचार करून तो तिला म्हणाला,

" जिजाताई, प्रथम आपण मुंबईस जाऊं. नंतर तुला गांवीं नेऊन पोंहोंचवीन मी ! "

ती प्रथम कांहीं बोलेचना. पण पुन्हा अरविंदानें तोच प्रश्न विचारल्यानंतर ती रडत रडत म्हणाली,

" दादा, असं नका करूं मला प्रथम घरीं आईकडं नेऊन पोंचवा. मुंबईस मी चिमा मावशीकडे आतां जाणार नाहीं. आणि जर का दुसरीकडं राहिलें, तर माझी मावशी मला दोष लावील व माझ्या जन्माचं वाटोळं करील. म्हणून दादा, मला सोनगांवालाच न्या ! "

तिच्या बोलण्यातील मर्म त्याच्या लक्षात आले. सखारामाने सांगितलेली कामगिरी महत्त्वाची होती. तरी पण प्रथम काय करावे, ह्याविषयीं त्याच्या मनाचा निश्चय होईना. त्यानें थोडा विचार केला व तो जिजास म्हणाला,

"महिलासमाजातील विमल म्हणून कोणी स्वयंसेविका तुझ्या माहितीची आहे का?"

तिने मानेनें नकार दर्शविला

"तू केशरी रंगाचें पातळ नेसली आहेस, तेव्हां तुला महिलासमाज माहीत असेल नाहीं?"

"आपण गेल्यावर आम्हाला शिकवायला मास्तरणीच येत होत्या. त्या महिलासमाजातील होत्या खऱ्या. त्यांची केशरी रंगाचीं पातळ मला आवडली, म्हणून मावशीनं मलाही तसलीं पातळ घेऊन दिलीं!"

"मास्तरणींपैकीं कोणाचेंच नाव तुला माहीत नाहीं?"

"आम्ही मास्तरणीच म्हणत असू. त्या मोटारींतून येत व जात, त्यामुळ त्यांची विशेष माहिती आम्हाला होत नसे!"

"अशा एखाद्या मास्तरणीकडे मुंबईस चलतेस?"

"मला आईकडे अगोदर न्या दादा मला आता मुंबई नको."

जिजा कांहीं बोलेना ती एकसारखी रडूं लागली. अरविंदास तिची समजूत करितां येईना. त्यामुळे मुंबईस चलण्याविषयीं तिचें मन वळविण्याचे त्याचे सर्व यत्न फोल ठरले!

त्याने ठाण्याच्या एका पेढीतून खर्चाकरिता पैसे घेतले. तात्पुरते कपडे खरेदी केले. तसेंच मधुकरास घाईनें एक पत्र टाकलें.

नंतर त्यांनी स्टेशन गाठलें. बळी पाटलास जेथें बसविलें होते, तेथें त्यांनीं त्याचा शोध केला, पण त्याचा पत्ता लागेना. जिजाचें सामान तिच्याबरोबरच होतें. अरविंदास आतां बळी पाटलाविषयीं जास्तच आश्चर्य वाटूं लागले! सोनगावास जाणारी गाडी सुटण्याची वेळ येऊन ठेपली होती. जिजाला तिच्या वडिलांची भेट झाली होती. आतां आपली आईही आप-

त्याला भेटेल, असें तिला वाटून तिचा आनंद द्विगुणित झाला होता.

अरविंदानें तिला बायकांच्या डब्यातील एका कोपऱ्यात बसविले. तो त्या डब्याला लागूनच असलेल्या डब्यात बसला. ती मोकळेपणाने डब्याच्या बाहेर तोंड काढून स्टेशनवरील धावपळ पाहात होती. भुरभुर उडणारे आपले केस एका हातानें ती सावरीत होती.

अस्तास जाणाऱ्या दिनराजाच्या किरणानीं तिचा मुखचंद्रमा मनोहर दिसत होता. अल्लडपणाने इकडे तिकडे पाहात असता तिची नजर दुरूनच गाडीकडे धावत येत असलेल्या दोघा व्यक्तीकडे गेली. त्यामुळे तिचा तो आनंदी चेहरा एकदम उतरला!

जिजाला आता गुपचूप पडून राहावे, असे वाटू लागले. इतक्यात धावपळ करीत डबे शोधीत हिंडणाऱ्या एका स्त्रीची नजर तिच्याकडे गेली. ती स्त्री तडक तिच्या डब्याकडे धावत आली.

'मावशी, मी आईकड चालले आहे," जिजा अडखळत अडखळत बोलली.

" कार्टे, उतर खाली! कुनाचा हात धरून चाललीस? सगळी लाजबीज काढून ठेवलीस वाटत?" मावशी कर्कश स्वरात गरजली.

इतक्यात तिच्या मागोमाग बळी पाटीलही आले. अरविंदाचे लक्ष त्या दोघाकडे गेले. बळी पाटलाना त्याच्याकडे पाहाण्याचे धैर्य होईना! ते चिमामावशीजवळ आले. तिच्या कानात थोडे कुजबुजून त्यानीं अरविंदाकडे बोट केले. तिने त्याच्याकडे झटकन् पाहिले. अरविंद त्याच्याशी बोलणार, इतक्यात गाडी हालली. त्या वेळी चिमाचा राग अनावर झाला होता. तिनें बेफामपणें जिजाचा गालगुच्चा घेण्याकरिता हात पुढे केला. त्या वेळी बळी पाटलानीं तिला मागे खेचलें नसते, तर चिमाचा चेंदामेंदाच झाला असता!

गाडी निघून गेल्यावर तिने खाली बसून एक दीर्घ सुस्कारा टाकला व ती आपल्याशींच पुटपुटली,

" कार्टी लइ शिकली, म्हनून मलाबी बदना! पन तो गिरिस्त वगाळ

नाई. रादेकड नेईल तिला ! ”

पुढं तिच्या डोळ्यात अश्रु उभे राहिले. बळी पाटील मात्र गाडीकडे तोंड करून आ पसरून उभे होते. गाडी दूर निघून गेल्यावर ते चिमाला धीर देऊन ऐटीने म्हणाले,

“ मी पोलीस पाटील आहे ! आता पोलीसना वर्दी देतों व त्या भामट्याच्यामागं भुगा लावतो बघ चिमा ! घाबरू नकोस तू ! ”

---

## प्रकरण ३ रें

## लंगडा गोऱ्या !

दुसऱ्या दिवशी पहाटेस पाच वाजण्याच्या सुमारास आगगाडीचा प्रवास संपला. लवकरच मोटार पण मिळाली. सूर्योदयाच्या सुमारास सडक सोडून पायवाटेने अरविंद व जिजा सोनगावच्या मार्गास लागली सोनगाव तेथून चांगले चार पाच मल अंतरावर होते. ज्वारीच्या पिकातून ती पाऊलवाट होती अरविंद दोन्ही बाजूस नजर टाकीत चालला होता. ज्वारीच्या भर-दार कणसातील दाणे सूर्यप्रकाशामुळे मोत्याप्रमाणे तकाकत होते व पिवळ-सर हिरव्या रंगाची पाने तरवारीच्या पात्याप्रमाणे चकाकत होती हरभऱ्याच्या रोपट्यावरील दहिवराचे जलबिंदु भूमातेवर टिप टिप गळत होते. जणू काय जिजाच्या मनातील आनंद ते आपल्या आनंदाश्रूंनीं व्यक्त करीत आहेत की काय, असा भास होत होता !

जिजा पुढे व अरविंद मागे अशी ती जोडी झपाझप पावले टाकीत चालली होती. जिजाची चाल इतकी झपाट्याची होती की, अरविंदाला तिच्याबरोबर चालणे कठिण पडू लागले उंच उंच वाढलेल्या ज्वारीच्या पिकातून वळणे घेत जात असता, अरविंद वाट चुकेल, अशा समजुतीने मध्येंच ती थोडा वेळ थांबे, त्यास पाहिल्याबरोबर प्रसन्न स्मित करी, नंतर ती झटकन् तोंड फिरवून चालू लागे. तिला पदर सावरण्याची देखील शुद्ध नव्हती. कुरळे केस मात्र इतस्ततः मुखावरून बागडू लागले, म्हणजे तिला त्यांना आवरणे भाग पडे.

वाटेंत मध्येच एका बोरीच्या झुडपाजवळून अरविंद चालला असता, त्याला लगटूनच त्याचे पाऊल पडले परंतु त्या स्वाभिमानी झुडपाला असा अपमान झालेला सहन झाला नाही. त्याने आपल्या कंटकरूपी करानीं त्याचे धोतर पकडून ठेविले. आपले ठिकाण अगदी नजीक येत चाललेले

पाहून जिजाला परमावधीचा आनंद झाला होता. आपल्या मळ्याच्या सन्निध असलेल्या झोंपडींत आपण जातो केव्हा, व आपल्या आईस भेटतो केव्हा, असे तिला होऊन गेले होते पण मध्येच तिने मागे वळून पाहिले, तेव्हा तिला अरविंद दिसेना त्यामुळे ती त्याच्या शोधार्थ परत आली. त्या बोरीचा तिला फार राग आला झटकन् पुढे होऊन, अरविंदाची सुटका करण्याकरिता धोतरात गुतलेला बोरीचा एक एक काटा ती मोकळा करू लागली. तिचे शरीरसौष्ठव व अप्रतिम लावण्य याकडे त्याची सात्त्विक नजर गेली. त्याला लाजल्यासारखे वाटू लागले त्या चतुर बालिकेच्या लक्षात त्याची मनस्थिति झटकन् आली काटे सोडविण्याचे काम निर्वेध चालावे म्हणून ती म्हणाली,

"दादा, ही बोर अशी खड्याळ आहे, पण हिची फळ मात्र अगदी मधुर असतात!"

जिजाचे काम चालूच होते

'तुझे घर आता कितीस दूर आहे?' अरविंद म्हणाला

मागे वळून बोटाने एक बकुळीचा वृक्ष दाखवीत ती म्हणाली,

"ती बकुळी आमच्या मळ्यात आहे. तिथे जवळच आमचे घर आहे"

त्या वेळीं जोंधळ्याचे शेतातून होणारा सळसळ असा आवाज ऐकू येऊ लागला. अरविंदाचे लक्ष तिकडे गेले जिजाचे कामही संपले होते. इतक्यात त्या शेतातून मुळासह उपटून काढलेली कोंवळ्या कणसाची एक ज्वारीची पेंढी काखेत घेतलेला एक तरुण पुढे आला. त्याची नजर जिजाकडे जाताच ती पदर डोक्यावरून घेऊन खालीं मान घालून मंद गतीने चालू लागली! अरविंदाने त्याकडे पाहिले. तो तरुण लंगोट कसलेला होता. त्याचे सर्व स्नायु प्रमाणबद्ध व पीळदार होते. सर्वांगावर आरोग्याचें तेज विलसत होते. त्याची मुद्रा प्रसन्न होती.

जिजाचे लक्ष त्या तरुणाकडे असलें, तरी दोघानाही तोंडातून शब्द

काढण्याचा संकोच वाटू लागला. पण त्या तरुणाची उत्सुकता अनावर होऊन त्यानेंच तिला विचारले,

" जिजा, तू आताच आलीस ? चिमा मावशी कुठं दिसत नाहीं ! एकटीच कशी बरं आलीस ? "

त्याला आणखीही विचारावयाचे होते, पण कसे बोलावे हे लवकर सुचेना !

" दादा बरोबर आहेत त्यामुळं सोबतीची अडचण पडली नाहीं. " जिजा मृदु स्वरात म्हणाली

त्या तरुणाने अरविंदाकडे पाहिले व त्याला त्याने लवून रामराम केला.

" आई घरात आहे ना ? "

जिजाने उत्सुकतेने विचारले व तिने आपली गति वाढविली.

" काकू घर सोडून कुठं जाणार जिजा ! दम, मी माळ्यावरून तिला हाक मारतो ! "

त्या तरुणाचे नेत्र भरून आले !

" नको. नको मी आता घरीं जातेच "

जिजा झपाट्याने पाय उचलू लागली

" पाहुण्याना कोवळा हुरडा आणतो. आता शेटजीही शेतात येताल. चल पुढं. मीही आलोच. "

तो तरुण चपळाईने शेतात शिरला. अंगात पैरण घालून, कमरेस धोतर गुंडाळून, पळत पळत जिजा तेथे पोहोचण्यापूर्वीच तो तिच्या घरापुढे म्हणजे झोपडीपुढे जाऊन पोहोचला ! त्याने झोपडीच्या दारापुढे घोंगडें टाकले आणि काकूना जिजा आल्याचे सांगितले

इतक्यात जिजा व अरविंद यांनी तेथे प्रवेश केला. त्या वेळीं जिजाची आई भाकरी भाजीत बसली होती. जिजा आल्याचे कळल्याबरोबर ती आश्चर्यचकित झाली ! कसेबसे हात धुऊन ती तिच्यावरून तुकडा ओवाळून टाकण्याकरिता छपराबाहेर आली. तिच्या डोळ्यातून घळघळा अश्रु वाहात होते. जणूं काय, इतक्या दिवसाच्या विरहाग्नीला ते शांत करीत होते !

अरविंदाची कनवाळू दृष्टि तिजकडे वेधली. राधाबाईचे वस्त्र फक्त लाज-रक्षणापुरतेच होते व तेही अनेक ठिगळांचे होते. तिची गौरवर्ण व कृश अशी देहयष्टि म्हणजे जणू काय सुकलेली केळच आहे, असे भासत होते!

झोपडीपुढील जागा सारविलेली होती. सर्व आवार अगदी स्वच्छ होते. मध्यभागी एक तुळशीवृंदावन असून त्यातील तुळशी मंजरीच्या भाराने विनम्र झाल्या होत्या. त्याच्यासभोवतीं लालभडक मिरच्या, चवळी-च्या पिवळ्या शेंगा, ज्वारीचीं पांढरी कणसे, निरनिराळे चौक करून वाळत घातलेली होती. त्यामुळे सुंदर रंगीबेरंगी रांगोळीच त्या वृंदावनासभोवती घातली आहे की काय, असा भास होत होता! सभोवताली आम्रवृक्ष असून त्यांचा डौलदारपणा एखाद्या राजवाड्याच्या घुमटाची आठवण करून देत होता.

झोपडीच्या आतील भाग स्वच्छ होता भिंतीला चिकटून मडक्यांच्या उतरडी ओळीने होत्या भांडीकुंडी त्या झोपडीत कितीशी असणार! बहुतेक सरगा मातीच्या घागरी-लोटक्यांचा! भाकरी करण्याची काठवट मात्र लाकडी नाही म्हणायला जेवणाच्या पितळ्या मात्र पितळेच्या होत्या. अरविंदाची नजर ह्या झोपडीतील संसाराकडे गेली, त्या वेळी त्याच्या मनात विचारांचा गोंधळ माजून राहिला

दुसऱ्या एका छपरात एक कपिला गाय होती. जवळ असलेल्या बाळसे-दार पाडसास ती चाटीत होती. मधून मधून हुंकारून ती इकडे तिकडे नजर टाकीत होती. नवख्या माणसाच्या चाहुलीने ती थोडी बावरल्या-सारखी दिसत होती.

त्याला लागून असलेल्या भागात एक नवजवानीचा खोंड मधून मधून डरकाळ्या फोडीत उभा होता. त्या पळत आलेल्या तरुणाने कोवळे बाटूक खोंडाच्या व गाईच्यापुढे टाकल्याबरोबर आनंदाने मुसमुसत व ताडान हुंकार देत, त्यांनी त्याचा फन्ना उडविण्यास सुरुवात केली. स्वच्छ चरवी घेऊन गाईचे दूध काढण्याची सुरुवात तो तरुण करू लागला.

आदल्या दिवशीं जिजाला वडिलाची भेट झाली होती. आज आई भेटली. त्यामुळे तिच्या आनंदास सीमा राहिली नाही. मायलेकी छपरात जाऊन बसल्या राधाबाईच्या अंतःकरणाची कालवाकालव इतकी झालेली होती की, तिच्या मुखातून लवकर शब्द उमटेना.

थोडा वेळ गेला नाही तोंच, त्या छपरीवरून जाणाऱ्या वाटेवर उमद्या घोड्यावर बसलेला एक पोक्त वयाचा गृहस्थ आला. तो ' शिरप्या ' ' शिरप्या ' अशा हाका मारू लागला तो तरुण धार काढण्याच्या नादात होता. पाहुण्याना दूध द्यावे, म्हणून तो आज त्या गाईचे दूध काढीत होता. तें दूध पाहुण्याच्या पोटात जावे, अशी त्याची तीव्र इच्छा होती मध्येच उठल्याने ती कपिला गाय पुन्हा दूध काढू देणार नाही, व एकदा वासरू सोडल्यावर ते नेहमीप्रमाणे आईच्या कासेतील सर्व दूध पिऊन टाकील, ह्या भीतीने तो तरुण तसाच धार काढीत बसला होता परतु घोड्यावरील गृहस्थतर जोराने हाका मारू लागला पुढे पुढे तर अद्वातद्वा बडबडण्यासही त्याने सुरुवात केली.

त्या तरुणाने धार काढण्याचे काम पुरे केले " आलो हो, शेटजी, " असे म्हणत, चरवी छपरांत ठेवून तो रस्त्याकडे धावला.

" शिरप्या, तू फार माजला आहेस ! किती वेळ तुला हाका मारतोय, आणि तू ओ देखील देत नाहीस ? " शेटजी तावातावाने म्हणाले.

" छपरात झाडलोट करीत होतो मी ! मला हाका ऐकू आल्या बरोबर धावलो शेटजी ! "

श्रीपती अदबीने बोलला व घोड्याचा लगाम धरून त्याना फाटकाच्या आत आणूं लागला.

" नको, नको. मला काम आहे. फार माजला आहेस ! आज पैसे देणार होतास ना ? काल म्हैस विकून पैसे आणलेच असशील ! म्हणूनच मी आल्याबरोबर तुला माझ्या हाका ऐकू आल्या नाहींत ! बेगुमान माणस ! पैसे बुडविण्याचा विचार आहे वाटतं ? " शेटजीचा रागाचा पारा

जास्तच चढला.

श्रीपती रागाने लाल झाला, पण विशेष कांहीं न बोलता त्यानें घाड्या-सकट शेटजींना फाटकाच्या आत आणले.

" मी खाली उतरत नाही पैशाच काय केलस, ते साग आधीं ! म्हशीचे पैसे आता देणार का ? "

" पैसे काकूजवळ दिलेत उगीच गरम होऊ नका शेटजी ! मला पैस बुडवायच नाहीत. उगाच तोंड सोडाल, तर हा नावाचा शिरप्या आहे ! "

" बर बर ! मग पैस काकूजवळून आणून देतो म्हणतोस ? अरे श्रीपती, आम्हालाही आता माल घ्यावयाचा आहे. मोसम आहे पैशाशिवाय गूळ, हळद आम्ही कशी घेणार ? " शेटजी एकदर रग पाहून नरमाईने बोलले, व खाली उतरले.

श्रीपतीने घोडा बांधला व त्याच्यापुढे बाटूक टाकलें

ते हिरवेगार बाटूक घोड्यापुढे जात असलेले पाहून, खोंड डरकाळी फोडू लागला गायही हबरू लागली गरिबाच्या तोंडचा घासही त्याच्या पोटात जाईपर्यंत त्याचा नसतो, हेच खरें.

" मग काय पैसे देतोस ना ? काकूकडून मागून घे पाहू ! "

पैसे मिळतील अशा आशेने शेटजी अगदीं नरमाईने बोलू लागले.

" जरा थांबाल की नाहीं ? आत्ताच जिजी आली आहे व ती काकूच्या-जवळ बसली आहे. मायलेकीस्नी जरा बोलू द्या तरी ! पैस बुडविण्या-करिता म्हैस हकली नाही शेटजी ! शिरप्या कुणाच पैस बुडविणार नाहीं. आणि कोणी कमजास्त बोललेल त्याला खपणारबी नाहीं ! "

श्रीपतीचा राग जरा ओसरलेला होता.

" जिजा म्हणजे सखारामाची मुलगीच काय रे ! मग तो बळी पाटील आलाच असल ! "

" नाव काढू नका माझ्यापुढ शेटजी, बळया पाटलाच ! तुमचा तो पुष्कळ दोस्त असल, पण आमचा दुष्मान् तोच ! " श्रीपती रागानें बोलला.

शेटजींनी रागरंग जाणला व म्हणाले,

" बर, हो. विसरलों. तू लवकर ओ दिली नाहीस म्हणून मी थोडा रागावलो बर, ते जाऊ दे. श्रीपती तू आम्हाला पैसे मग दे पण हुरडा तर भाजशील की नाही ? "

" शेटजी, असं जरा बेतानं घ्या हुरड्याची तयारी आहे पाहुण्याना मी तिकडेच आणतो चला, जाऊ या शेतात तिथं बकुळीच्या झाडाखाली आगटीबी पेटवून आलाय मी ! "

शेटजी तेथून दुसऱ्या कुळाकडे गेले व थोड्या वेळाने परत ते त्या बकुळीखाली आले. त्या वेळीं पक्ष्यांचे थवेच्या थवे ज्वारीच्या कणसावर झडप घालू लागले होते. राधाबाई आपली कामे आटोपून माळ्यावरून पाखरे हाकीत होत्या. श्रीपती ऊन ऊन कणसे चाळून शेटजींना ताजा हुरडा देत होता. शेटजी अगदीं खुषात होते. ते श्रीपतीस म्हणाले,

" शिऱ्या, हुरडा तर छान आहे. मग ह्यावर आता दूध रे कोठलें देणार ! "

" शेटजी, म्हैस तर इकली. तुमची चिकाटीच भारी ! नाहीं तर दुधाला हो काय तोटा होता ! "

" अरे, मी खोंड वीक म्हणत होतो आणि तूं म्हैस विकलीस ! तू मष्टच भारी ! "

" बळ्या पाटलाच्या खोंडासारखा खोंड आहे माझा शेटजी ! तो इकून मी शेताची मेहनत कशी करणार ? म्हणून मी म्हैसच इकली ! काकूबी फार रागावल्या पण तुम्हीं पैशाचा लकडा लाविला, मग मी तरी काय करू ! "

" अरे, ह्या सुगीच्या दिवसातच जनावराना किंमत येते माझं व्याजच किती झालं आहे ! मागचंही व्याज थकलय. मग यंदाच्या एवढ्या पिकानं माझं व्याज कसं भागणार ! चावडी चोहोऱ्यासही आणखी तू उचल करणारच. मग देणं कसं फेडणार ! म्हणून एखादं जनावर काढून टाक म्हटलं,

तर तू म्हैसच विकलीस. मोठा शहाणा दिसतोस झाल!"

"शेटजी, मागच व्याज मी दिल होत ना! आणखी तेंवी राहिल म्हणता! हा कर्जाचा डोंगर कसा फिटणार?"

"शिरप्या, मागच व्याज दिलस, ते तू नेलेल्या रकमेच. पण, तुझ्या बापाचं कर्ज किती आहे, तुला ठाऊक आहे का? त्याच्या लग्नापासूनच कर्ज त्याला जन्मभर फेडता आल नाही, ते नाहीं, आणि सखारामाकरिता त्यान पैसा किती उधळला, तुला ठाऊक आहे? उगीच या फंदात तुझा बाप पडला. अरे, माझच कर्ज आहे, म्हणून तुझ्याकड हे शेत आहे. त्या वेळी पाटलाला सखारामाची व तुझी ह्या दोघाच्याही जमिनी पाहिजे आहेत. त्याचा डाव काही निराळा आहे पण मी आहे तुझा, म्हणून तुला काळजी नको!"

अरविंद ह्या वेळीं जवळच्या विहिरीत स्नान करून वर आला होता. तो हा संवाद ऐकत होता. इतक्यात शेटजींचे लक्ष त्याकडे गेले. तेव्हा ते म्हणाले,

"हा रे कोण गृहस्थ?"

"हेच पाहुण जिजाला पोचविण्यास आल आहेत" श्रीपती म्हणाला.

अरविंदाची मुद्रा व त्याने अंगात घातलेला खादीचा स्वच्छ शर्ट पाहून शेटजींच्या मनावर चांगला परिणाम झाला ते श्रीपतीस म्हणाले,

"हे कोण आहेत, तुला माहीत आहेत का?"

"मला कसं माहीत असणार? ते आज सकाळी तुमच्यापुढ नुकतेच आलेल आहेत गिरणी बिरणीत कामगार असतील झाल!"

शेटजी पुढे काही बोलणार, तोंच शेटजींचा घोडा जोराने खिकाळू लागला. बैलाच्याही प्रचंड डरकाळ्या ऐकू आल्या. श्रीपतीचे लक्ष छपरीकडे गेले. तो उभा राहून पाहूं लागला. झोपडीच्या आवारात एक खोंड शिरलेला त्याच्या नजरेस पडला. त्याबरोबर तो हातात सोटा घेऊन जोराने धावत गेला. जिजा लाबून त्या खोंडास आवरण्याचा प्रयत्न करीत

होती. दुसरा खोंड आवारात आल्याबरोबर श्रीपतीच्या खोंडानें दावें तोडलें. दोन्ही खोंडाची झुंज सुरू झाली. शेटजींचा घोडा त्या गडबडीनें दावें तोडून पळाला. पहिल्या खोंडास आवरणारा गडी लंगडा होता, त्याला तो खोंड आवरेना. ती बलिष्ठ बलाची झुंज सोडविणें कठीण होतें. ती जोडी खिल्लारी जातीची असल्यामुळे त्यांचीं शिंगे अणकुचिदार होतीं. त्यामुळें श्रीपतीसही एकदम ती झुंज सोडविणें जड जाऊं लागलें. सभोंवतालचे चार दोन शेतकरी जमल्यानंतर श्रीपतीनें आपल्या सोट्यानें त्यांच्या शिंगाच्यामधील मार्गीं जोरानें चार रट्टे दिल्याबरोबर ती जोडी फुटली व चौफेर उधळत बाहेर पडली. त्याच सधीस त्या लंगड्या गड्यास एका खोंडानें शिंगावर घेऊन दूर फेकून दिलें. त्यामुळें तो रक्तबंबाळ होऊन एका बाजूस पडला !

श्रीपती आपल्या खोंडाच्या मागें धावला. शेटजींचा घोडा धरून आणण्यास दुसरे शेतकरी गेले. अरविंद तेथें गडबडीनें आला. त्याचें लक्ष त्या पडलेल्या गड्याकडे वेधलें. श्रीपती आपल्या खोंडास चापीत चोपीत त्याला परत घेऊन आला.

हा हा म्हणता ही बातमी सभोंवतालच्या शेतकऱ्यात पसरली. जो तो तिकडे धावत आला. शेटजींनाही तो प्रकार चमत्कारिक वाटला. परंतु त्या ठिकाणीं उभे राहणें बरें नाहीं, असें वाटून, ते हुरड्याचीं कणसें, मिरच्या व श्रीपतीनें पूर्वींच आणून ठेविलेली ताजी भाजी, आपल्या पडशींत भरून रस्ता सुधारूं लागले ! श्रीपतीचें तोंड उतरलेलें होतें. लंगड्या गड्याची ती अवस्था पाहून त्याला भीति वाटली व मागील प्रकार आठवला. शेटजींनीं ती त्याची मनःस्थिति जाणली व ते म्हणाले,

" शिरप्या ! कांहीं काळजी करूं नकोस. मी आहें म्हणून बचावशील. खोंड विकून टाक म्हणत होतों तें यासाठींच ! संध्याकाळीं म्हशीचे रुपये घेऊन घरीं ये. बळीबा पाटील गावीं नाहींत हें एकपरी बर आहे ! " असें म्हणून शेटजी निघून गेले.

दहा पांच लोक त्या लंगड्याभोंवतीं जमले. पण त्याच्या मदतीस कोणी जाईना. अरविंद पुढे गेला. जिजाईही आली. प्रथम कित्येक जण त्या लंगड्याला शिवण्यास धजेनात, तथापि वेळ प्रसंग जाणून श्रीपतीनें एक दोन शेतकऱ्यांच्या मदतीनें त्यास आंब्याच्या झाडाखालीं आणून निजविलें.

अरविंदानें प्रथमोपचारास सुरुवात केली. मिळेल तें साहित्य जमा करून, आपलें धोतर फाडून, तो जखमा बांधूं लागला. अरविंद मेडिकल कॉलेजांतून बाहेर पडलेला तरुण होता. परंतु त्याला पाहिजेत ती औषधें तेथे कशीं मिळणार! खेड्यांत मिळूं शकणाऱ्या वनस्पतींचा उपयोग कसा करावा, याची माहिती त्याला असती तर त्या ठिकाणीं उपयोग होता. परंतु वैद्यकीय शिक्षणांत अशी माहिती मिळूं शकत नाहीं, ही शिक्षणांतील उणीव त्याच्या ध्यानांत आली. अनुभविक लोकांनीं आणून दिलेल्या वनस्पतींचा उपयोग त्यानें केला व जखमा नीट बांधल्या. त्या ठिकाणच्या आम्रवृक्षाच्या शीतल छायेंत पालापाचोळ्याच्या मऊ बिछान्यावर घोंगडीची चादर घालून त्या लंगड्यास त्यांनीं निजविलें. नंतर एक एक शेतकरी तेथून जाऊं लागला.

जातांना एक वृद्ध शेतकरी रागानें उसासा टाकून दुसऱ्या शेतकऱ्यास म्हणाला,

"या गोऱ्यामुळंच सखाराम कैदेंत पडला! याचा पाय मोडला पन कुनी तोडला देव जान! सखारामावर मातर उगा आळ आला! बिचाऱ्याच्या जल्माला उगाच डाग लागलाया! देवाची करनी त्येला कोन काय करनार? माग शिरप्या बळीबाच्या तावडींतन सुटलाय! त्येचा वचपा आता पाटील काढनार! ह्यो गोऱ्या कुनाकुनाला खड्यामंदी टाकतुया कुनाला ठाव?"

## प्रकरण चौथें.

# सखाराम कैदेंत कसा पडला ?

तो लंगडा गडी म्हणजे गोप्या महार हा बळी पाटलाचा नोकर होता. बळी पाटील सोनगावच्या तालमीचा पुढारी होता. त्याने आपल्या ज्वानींत अनेक मोठमोठ्या पहिलवानाना चीत केलें होतें. त्यामुळें आसपासच्या दहापाच गावात त्याचा चचक फार होता. शिवाय त्याच्याकडे पाटिलकी असल्यामुळें सोनगावात त्याचें वजनही चांगलें होतें. शेटजींचा व त्याचा स्नेह होता. शेटजींची त्या गावीं ही दुसरी पिढी चालू होती. त्यांच्या वडिलांनीं नम्रपणानें वागून आपलें आयुष्य त्या गावीं घालविलें होतें. ते तेथें आले त्या वेळीं निष्कांचन होते, तरी अखेरीस त्यांच्याजवळ चांगलीच माया जमलेली होती. अर्थात् ह्या शेटजींना तिच्या जोरावर आपला पुढचा जम चांगला बसविता आला. गावचा पाटील वश असला म्हणजे खेड्यातील आपले व्यवहार निर्वेध चालतात हें त्यांनीं पक्के जाणिलें होतें. लोकांच्या अडचणीच्या वेळीं त्याना जिकिरीस आणून पैसे द्यावयाचे व सुगीच्या वेळीं त्यांचा माल विकत घेऊन ते पैसे फेडून घ्यावयाचे, असा त्यांचा व्यवहार असे. या योगाने त्याना त्यांच्या कर्जाऊ दिलेल्या रकमाचें व्याज बिनधोक वसूल करता येई व मालही किफायती किंमतींत पदरात पडे. असा त्यांचा दुहेरी फायदा होता.

बळी पाटलाला साधारण लिहिता वाचता येत असे. पाटलाचा पगार तो कितीसा असणार ? जो पगार हातीं येई, तो खिरापतीवारीं निघून जाई. अर्थात् त्याची सांपत्तिक स्थिति सुधारण्यास त्याचा उपयोग यथातथाच होई. संपत्ति उत्पादनाचे नवे धंदे सध्या खेड्यात नाहींत म्हटलें तरी चालेल. धंदा काय तो एक शेतीचा. पण अनेक वाटण्या होऊन एका शेताचे तुकडे

तुकडे झालेले असावयाचे! गल्या तीस चाळीस वर्षांत लोकसंख्या दुप्पट झाली असली, तरी त्या मानाने जमिनींची वाढ होणें शक्य नव्हते फार तर एकाची जमीन दुसऱ्याच्या पदरीं पडून त्याची स्थिति सुधारावयाची, पण पहिला मात्र भुकेकंगाल बनावयाचा असा क्रम खेड्यांत चालू असतो. सोनगाव तरी त्याला अपवाद कसे असणार?

शेटजी माटे पूर्वी होते ते शेतकऱ्याची जमीन खरेदी करण्याच्या फंदात फारसे पडत नसत. बाण्या उदम्याची जमीन ते मालकीची करीत नव्हते असे नाहीं, पण तिला योग्य पैसा असा त्यांना मोजावा लागत नसे त्याच्या वडिलांनीं कर्जाऊ दिलेल्या रकमेचे एकाचे दोन, दोहोंचे चार असे होत होत फिर्यादी होऊन ती जमीन जेव्हा लिलावात निघे, तेव्हा तो लिलाव घेण्यास कोणी न मिळाल्याने त्यांनाच ती घ्यावी लागे! कारण अगोदर ती रक्कम शेताच्या किंमतीबाहेर कितीतरी असे व तवढा पैसा देण्यास दुसरा कोणी तयार नसे. दुसऱ्यांना तितकी रक्कम कर्जाऊ देण्याचें आमीष दाखवून, त्यांना लिलाव बोलण्यास ते उत्तेजन देण्यास कमी करीत नसत. अशा वेळी एखादा मासा गळात सापडेही. परंतु त्याच्या वर झालेल्या कर्जाच्या बोजाने त्याच्या त्या व स्वतःच्या मालकीच्या जमिनींतील उत्पन्न व्याजापायीं शेटजींच्या घरीं जाई व त्याची स्थिति दीनवाणी होई.

बळी पाटलासारख्याची गोष्ट जरा निराळी असते. त्याच्याजवळ सावकारी करण्यास पैसा नसतो पण दुसरे अनेक मार्ग मोकळे असतात. सावकार व गावकामगार यांची जूट असली म्हणजे सुखाने कालक्रमणा करणाऱ्या गोरगरिबांची दैना सहज होऊं शकते! तलाटी व शेटजी ह्यांच्या मदतीने बळी पाटलांनीं गोरगरीब व सच्छील जातभाईंना जाळ्यात अडकविण्यास सुरुवात बरेच दिवसापासून केली होती.

× × ×

अरविंदाच्या शुश्रूषेनें गोप्याच्या प्रकृतीस आराम वाटूं लागला. गोप्याची

सोय सखारामाच्या झोपडीलगतच्या आवारातील एका आंब्याखाली केलेली होती. रात्रीची जेवणें आटोपल्यावर शेतकरी त्या ठिकाणीं शेकोटी-भोंवतीं गप्पा मारण्यास जमत असत. अरविंद हा तेथील परिस्थितीचें बारकाईनें निरीक्षण करीत असे. कारागृहातील अन्नाची त्याला सवय झालेली होती, त्यामुळे राधाबाईनें प्रेमानें रांधलेला डाळभात किंवा भाकरी आमटी त्याला अमृततुल्य वाटे. त्याची चालचलणूक व गोऱ्याविषयींची कळकळ पाहून हा कोणीतरी देवमाणूस येथे आला आहे असें त्या लोकांना वाटूं लागलें. तो कोणाशीं फारसें बोलत नसे. परंतु बोलण्याचा प्रसंग आला म्हणजे त्याच्या मधुर वाणीनें त्याची कोणावरही तेव्हांच छाप पडे. त्याचा सहवास सर्वांना गोड वाटूं लागला.

आठ दहा दिवसांत गोऱ्याची प्रकृति चांगलीच सुधारली. आपला अपमृत्यु अरविंद व जिजा यांच्या शुश्रूषेमुळेच टळला, त्यांच्या उपकाराचें ऋण सात जन्म जरी त्यांची सेवा केली तरी फिटणार नाहीं, आपल्या सारख्या हीन जातींत जन्मलेल्याची सेवाचाकरी करणारीं हीं माणसं खरोखरच देवमाणसें आहेत, असें त्याच्या मनाला वाटे. त्यामुळें अरविंद व जिजा हीं त्याच्या शुश्रूषेस आलीं कीं, तो भक्तिभावानें त्यांच्या पायांवर मस्तक ठेवी व त्यांचे पाय आपल्या अश्रूंनीं न्हाणी. ह्या त्याच्या कृतीनें अरविंदाच्या मृदु अंतःकरणावर जड ओझें पडल्यासारखें होई व त्याचेंही अंतःकरण भरून येई.

सखारामाच्या शेताजवळ रायबा नावाच्या शेतकऱ्याचें शेत होतें. त्याच्या जमिनीच्या पट्टीला लागून बळी पाटलाची जमीन होती. तिला लागून सखारामाची जमीन व तिच्या पलीकडे श्रीपतीच्या जमिनीची पट्टी अशा त्यांच्या वडिलार्जित जमिनी होत्या. सखारामानें स्वकष्टानें आपल्या जमिनींत विहीर खणलेली होती. परमेश्वरकृपेनें तिला भरपूर पाणी लागलें होतें. रायबानें सुद्धां विहीर खणली, पण तिला पाणी बिलकूल लागलें नाहीं. बळी पाटलाची विहीरच नव्हती. श्रीपतीच्या वडिलांनीं काढलेल्या

विहिरीस शेताचे पाणी असे. सखाराम व श्रीपतीचे वडील हे जीवश्च कंठश्च स्नेही होते रायबाचा मुलगा बच्चा हा शेटजींच्या येथें नोकर होता. तो त्याची पडतील ती कामें करीत असे. त्याच्या नोकरीमुळें रायबाला कोणाचें कर्ज नव्हतं.

सखारामाविषयी सर्वांना आदर वाटत असे. तो कैदेत पडलेला पाहून लोक हळहळत सखारामाचा अपराध नव्हता ह्याची खात्री सर्वांना होती.

एके दिवशीं रात्रीचीं जेवणें आटोपून शेतकरी आपापल्या शेतांत शेकोटीभोवतीं निरनिराळ्या गप्पा मारीत बसले होते. सखारामाच्या झोंपडीवरून हा देखावा मोठा सुंदर दिसत होता. शीतल चंद्रप्रभेनें सर्व वातावरण प्रसन्न झालें होतें शिवारांतील शेकोट्या आपल्या सौम्य अग्निज्वालांनी शेतकऱ्यांच्या अंगातील हुडहुडी धुडकावून लावीत होत्या, त्यामुळें त्यांना उत्साह वाटून पिकाच्या अंदाजाच्या मनोराज्यानें ते उल्हसित झाले होते. आकाशांतील लुकलुकणाऱ्या तारकांशीं हास्यविनोद करण्याकरितां कीं काय त्या ज्वाला मधून मधून डोलत होत्या.

सखारामाच्या झोंपडीपुढील जागेंत राधाबाई व जिजा ह्या मायलेकी आपल्या सुखदुःखाच्या गोष्टी बोलत तुळशीवृंदावनाजवळ बसल्या होत्या. आंब्याखालील शेकोटीभोवतीं अरविंद, श्रीपती, रायबा, गोप्या व रायबाचा जावई ठकोजी हे बसले होते ठकोजी हा नुकताच तलाठ्याच्या कामावरून कमी झाला होता. अरविंद त्या मंडळींत समरस झालेला होता. तो त्या वेळीं सहज म्हणाला,

" तुम्ही मंडळी सज्जन दिसतां त्याप्रमाणे सखाराम असावा, मग बिचाऱ्याच्या दैवीं तुरुंगवास कां बरं आला ? "

कांहीं वेळ कोणीच बोलेना.

थोड्या वेळानें ठकोजी म्हणाला,

" दादा, तुम्हांला खेड्याची माहिती बेताची दिसते. आम्ही माणसं गरीब दिसतो, पण सारींच तशीं असत नाहींत. ' दिसतं तसं नसतं '. पण

सखाराम मात्र प्रामाणिक व गरीब खरा. त्याला आमच्यासारख्यांनी गोत्यात घातलं ! त्या बिचाऱ्याचा काहींही अपराध नव्हता. ”

रायबानें जावयास डोळा घातला, तेव्हा तो त्याच्याकडे पाहून म्हणाला, “ मामा, आता तर माझी नोकरी गली आहेच. मग खऱ्या गोष्टी सागण्यास काय हरकत आहे ? ही कांहीं कोर्टापुढील जबानी नव्हे ! मग खोट कशाला बोला ! ”

रायबाला वाटलें, जावयाला आपल्यापेक्षा पुष्कळ अधिक माहिती दिसते. पण गोप्या हा वळी पाटलाचा नोकर तेव्हा तो पाटलाकडे जाऊन पुन्हा वणवा पेटवील, म्हणून तो जावयास टाचीत होता. तो मधून मधून गोप्याकडे पाहात होता. गोप्याच्या लक्षात ही स्थिति आली, तो रायबाला म्हणाला,

“ पाटील, भिऊं नगा असं ! ह्यो गोप्या असा हरामजादा नाई ! माजा पाय तुटुनशान गेलाय. मी जलमाचा अदू झालोय ! माज नशीब थ्वार म्हनून आताची मरता मरता वाचलुया या दादामुळं ! आता मी कवाबी खवाट बोलनार नाई आन् चाडीबी करनार नाई ! ”

गोप्याचे डोळे भरून आले. त्याला पुढें बोलवेना

श्रीपती त्याच्याकडे संशयी मुद्रेने पाहात होता. त्याचाही संशय गेला पुढें सर्वजण मोकळ्या मनानें बोलू लागले, त्या वेळीं ठकोजी जोरानें म्हणाला,

“ दादा, सखाराम कैदेत पडला, त्याला कारण त्याचा प्रामाणिकपणा व त्याचा आगटा ! ”

या वेळी ठकोजीनें आपला डाव्या हाताचा आगटा दाखविला. अरविंदाला ते जरा चमत्कारिक वाटलें. तो संशयी दृष्टीनें त्याच्याकडे पाहूं लागला.

ठकोजी—दादा, मी चेष्टा करीत नाही. त्याचा आगटा त्याला पुष्कळ नडला हें अगदीं खरं आहे. मी चारदोन रुपयाच्या आशेन त्या पापाचा भागीदारही झालों ! आता वाईट वाटून काय उपयोग ? अशा एका कामात

माझी सान्यासारखी चाकरी गेली. कैदेत पडलो नाही हे माझ नशीब! पण पापान मिळविलेल धन मात्र त्या तडाख्यात खलास झाल !

त्याने एक सुस्कारा टाकला.

अरविंद–मघा तुम्ही आगठा दाखविला त्याचा बोध मला होत नाही. मग खरी हकिकत सागाना? थोडी करमणूक होईल झाल !

ठकोजी–खेड्यातील लोकाना जीव की प्राण म्हणजे त्याची मालकीची जमीन तिच्याकरिता ते आपल्या जिवाचीही पर्वा करणार नाहीत. तीवर कर्जाचा डोंगर उभारतील, पण तिची मालकी उघड्या डोळ्यानीं दुसऱ्या-कडे गेल्याच त्याना पाहवणार नाही. जन्मदात्या आईवरील त्याच प्रेम कमी होऊ शकेल, पण जन्माची भीठभाकरी देणाऱ्या ह्या भूमातेवरील अस्सल शेतकऱ्याच प्रेम कधीही कमी होणार नाही. तिच्यातील झाड-झाडोरा कोणी अनधिकाराने तोडला की त्याचा जीव तुटू लागेल ! त्याच्या शेतातील विहिरीच्या पाण्याचा कोणी अपहार करील, तर त्याच्या जिवाच पाणी पाणी होईल !

“ माझ्या हे लक्षात आल. पण सखारामाच्या कैदेचा यात कोणता सबध येतो हे तर तुम्ही सागतच नाही ! ” अरविंद अधिरपणे म्हणाला.

रायबा–जरा ऐका दादा, ह्या सागतुया ते समद खर हे. सखारामाच्या हिरीला देव दयेन लई पानी है, म्हणून तर त्येला तरास झालाय !

अरविंद–पाणी भरपूर आहे हे खर. अस जिवत व स्वच्छ पाणी पिणारे तुम्ही भाग्यवान् आहात. पाणी पाहिल्याबरोबर दृष्टीला अगदी समा-धान वाटतं.

रायबा–दादा, तुमासारक्याच्या नदरला समादान वाटत असल, पन आमासारक्या शेजाऱ्याना लई वगाळ वाटतया ना ? शेजारच्या हिरींना पान्याचा खनखनाट, पन त्याची हीर मार तुडुंब भरल्याली. शेजाऱ्याचीं पिक उनान करापल्याली, आन त्याच्या जिमिनींत हिरवंगार पीक ! आमच्या पापी नदरला बघवत नाई दादा, आमी खरींच दुस्ट मानसं ! ”

ठकोजी–ह्या दुष्टपणाला आमच्यासारखे साथीदार असल्यावर मग गोरगरिबाच्या सुखात माती पडण्यास अवकाश कोणता !

अरविंद–अशी कोणती दुष्ट कृति तुमच्या हातून घडली, म्हणून तुम्हांला पश्चाताप वाटतो? सागण्यासारखं असल्यास सागून टाकाना? त्यामुळें तुमच्या मनातील मळमळ तरी निघून जाईल !

ठकोजी–त्याच अस झाल दादा, सखारामबाबाच्या जमिनीला लागून बळिया पाटलाची जमीन आहे त्या जमिनींत आता उसाच पीक कस भरदार आहे पाहा !

अरविंद–हो ! ऊस तर जोमात आलेला दिसतो. मीं श्रीपतीला म्हटल होतं, एखादा ऊस आणीनास चार पैसे द्यावे लागले तर देऊ. पण तो म्हणाला, " मी त्या उसाकडे पाहणार नाही, दुसऱ्याच्या मळ्यातन मोळीभर आणून देतों पाहिजे तर !

रायबा–शिरप्या तकड ढुकून सुदा पाहानार नाई ! त्येचा व पाटलाचा उभा दावा !

श्रीपती–तुमच नी त्याच जमतय ना ?

अरविंद–तलाठीसाहेब, तुम्ही सागा आपली हकिकत. कशाला दुसऱ्याच्या उखाळ्या पाखाळ्या काटा !

ठकोजी–सखारामबाबा भोळा, त्याच्या विहिरीच पाणी बळी पाटलानीं आपल्या शेतातील वाळत चाललेल्या पिकाकरिता मागितलं. विहिरीला अपरपार पाणी. गावचा पाटील पाणी द्या म्हणतो, तर द्यावं एक साल; अस वाटून त्यानं पाणी दिल !

अरविंद–दिल असेल पाणी ! पण आजही त्या शेताला ह्या विहिरीचे पाणी मिळते हें कसे !

ठकोजी–ह्याला कारण आमची दुष्ट कृति आणि सखारामान दिलला निशाणी आगठा, दादा !

अरविंद–याची फोड करून सांगाल का ?

ठकोजी–गावातील जमिनीच्या हक्कनोंदणीचे कागद पाटील तलाठ्याच्या ताब्यांत असतात. त्याला क व ड पत्रक म्हणतात. त्यात बळी पाटलानीं ही विहीर समाईक म्हणून लावण्यास मला सांगितलं. पाटलानीं मलाही खूप केलं ! मी तशी नोंद करताना बळी पाटलाचा व सखाराम बाबाचा जबाब लिहून व त्यानंतर सखारामबाबाचा निशाणी आंगठा घेतला. एकदोन वर्षे पीकपहाणीच्या पत्रकात बळी पाटलाचं बागाईत पीक नोंदीत आलें त्यामुळे त्या विहिरींत बळी पाटलाचा फुकटात निम्मा हिस्सा चालू केला.

अरविंद–सखारामबाबाना ह्याचा सुगावा कांहींच लागला नाहीं !

ठकोजी–त्याना लागेल तर आम्ही चित्रगुप्त कसले ! कोणी अधिकारी आला, की त्याची सरबराई खूप ठेविली कीं झालं ! तो अशा कागदावर सह्या करिताना विचारतो कशाला ? कोणाची तक्रार असल्यास तो तरी चौकशी करणार ! पण ह्या आंगठेवाल्या गोरगरिबाना ह्यातलं समजून येतं कशाला ? शिवाय असे लोक त्या वेळीं शेतात असावयाचे. आम्ही त्याना रुजवातीकरिता चावडींत अधिकाऱ्यासमोर बोलावितों तरी कशाला ? सारा आपल्या कोनिगिरीचा खेळ हा दादा !

अरविंद–पण ह्यामुळें सखारामाला कैद कशी ?

राघबा–दादा आमाला पाटील तलाठ्याच्या हिकमती समजल्या नाहीती, तरी आमी आपल्या जिमिनीत रोज असतोय. हकडची तनसडी तकड गेली कीं आमाला खपत नाई. बळिबा पाटलाचं आन् सकारामाचं असचं त्येढ आलं दादा ! म्हाट सुटल्यावर सकारामाचा योक बैल एकदा बळिबा पाटलाच्या जिमिनींत धावला आन् बांदावरल्या गवतावर चरूं लागला. पन ह्या गोऱ्यानचं रट्टा देऊनशान त्येला पिटाळलं. इतक्यात बळिबा तत आला. त्येन सकारामावर त्वाड लई सोडलं. त्येंचा झगडा सुरू झाला. तवा दहापाच जन आमी जमलों तत. सकारा-

मार्शी समजूतबी घातली. पन त्यामुळ बळिबा पाटील लई फुगला. त्याचं त्वाड सुरूच होत. धन्याच्या जिवावर गोप्याची गुरगुरत ऱ्हता तवा !

श्रीपती—पण बळयाचा मोदळा म्या राव कसा फेकून दिलाय तेबी सांगाना दादांना !

रायबा—शिरप्या म्हनूनच तर पाटील तुला पान्यांत पाहातुया. उगाच बडबड करू नगस. आता गोप्याची बरा झालाय. आन् तो बळिबाची गल्लात नाई. नाईतर तुझ्यामाग हात धुऊन लागला असता त्यो. आता त्वांड आवरून आस बर शिरप्या !

गोप्या—नगा सागू रायबा पाटील मागची कहानी ! त्यो दिस मनात आला की लई भ्या वाटत मला आतानी !

रायबा—दादांना समद सागू या की ! आता तुला भ्या कसल ! तो बळिबा आता हाय कुठ इत !

श्रीपती—मीच सागतों दादा तुम्हाला. सखारामबाबा रागावला. दुसऱ्या दिवशीं बळ्या पाटलाची मोट त्यान बद पाडली. बळ्या पाटील गावांतून धावत आला. तो सखारामबाबाशीं तिगामस्ती करण्याच्या इच्यारात होता. काकू जवळ हाती त्या रडू लागल्या. मीबी धावत गेलों. मी त्याच्याच तालमींतला. तवा माझी भीती त्याला वाटत नव्हती. सखारामबाबानं मोटच बैल पिटाळून दिल होत तो धावेवर बसला होता दोघाची वाचावाची चालू होती. लोक गोळा झाल. तो बाबाच्या अगावर गेला. कोणीच त्याला आवरेना बाबाना तो धक्के देणार, इतक्यात काकू मध्यें पडल्या. त्यानीं शिव्या दिल्यामुळ बळ्या फार चिडला. त्यान एक काठी बाबाना मारली. पण झटकन् काकू पुढे झाल्या. त्यामुळ ती त्यांना लागून त्या जमिनीवर पडल्या ! बळ्या पाटलापुढ कोणीच येईना जो तो लांबून 'पाटील, हें बरं नव्ह !' एवढ ओरडून सागत होता. पण मला फार चीड आली राव ! मी मागून गेलों व बळ्या पाटलाचा मोदळा

दिला हिरींत फेकून ! माझ्या दुप्पट तो गडी ! पण मला चेव आलेला ! हिरींत फेकल्याबरोबर मी गाव जी धूम ठोकली तो गेलों गाव सोडून !

रायबा—अरं तू पळालास म्हनूनशानी त्येच्या तडाक्यातन सुटलास. नाहीतर जिता राहिला नसतास शिरप्या !

अरविंद—मग काय ! याच भांडणामुळं सखारामबाबान शिक्षा झाली म्हणता ? बरा उलटा न्याय म्हणायचा !

रायबा—त्यामुळं नाहीं दादा. बहिरा पाटलाच्या वाळभीतल्या शिरप्याला पागान ओढला उचलूनशान हिरीमधी फेकल्याचं येल. लई बगाळ झालं ! नीर काटोकाट भरली व्हती, म्हनूनशान त्यो बुडाला नाहीं पन शिरप्याचा सूड कशा बगावीन असं त्येला वाटून गेलं ! पण ह्येन तर पोबार केल्ता ! मग दातवडा खात खात त्यो गेला गावात जकड तकड पाटलाचा बोजवारा उठला म्हनूनशानी त्येन बरदी त्या दिशी सोडलं नाहीं दादा !

ठकाजी—काय आलं बघा, शिरप्या रातीचा कोठे गेला काणास ठाऊक ! नाहीतर तो ठार व्हावयाचा. बिचाऱ्या गोप्याचा पाय मात्र त्या गडबडींत तुटला व गोप्या लंगडा कोल्हा बनला !

गोप्या—जरा दम दादा मीच सांगतु पुडं ! त्या दिशीं रातीं पाऊस पडत व्हता म्हनूनशान् शिरप्याची खबर मोकळी व्हती बगा. तींत मी सवडलो अशी काळाकुट्ट आंदार पडला व्हता तवा ! माजा डोळाबी लागत व्हता तवा चोक हळूहळू काळ्या लांडग्याचा समद आला. आन् काय सांगतां राव ! त्येन कुऱ्हाडीचा घाव घातला माझ्या पायावर ! आयाईग, आयाई अरं मी किंचाळलो 'तवा शिरप्या नव्हं नव्हं' म्हनूनशानी समद पळाला मला मग सूद नवती दादा !

रायबा—गोप्याच्या किंचाळीनं समदं रान गराजलं ! मी आन सखाराम धावत धावत गेलो तकडं गोप्याला सूद नव्हती तवा ! आमी कसा बसा त्येचा पाय बांधला. आन पाटलाच्या गोठ्यात त्येला नेऊन टाकलं दादा !

अरविंद–मग ह्याला कोणी मारलें ! त्याच्या मालकानें !

गोप्या–नव्ह वो नव्ह! आमचा मालक अस करायचा नाई दादा-साब ! कोनी भूतच शिरप्याच्या छाताडावर बसन्याकरता आल असल, शिरप्यान पाटलाला हिरींत फेकल म्हनूनशान् ! म्हसोबाबी आला असल त्येला मारायला ! पन त्येला तथ मीच घावलो. देवार, देवा !

गोप्याला त्या वेळची आठवण होऊन त्याचें अग थरारूं लागलें

अरविंद आश्चर्यानें स्तंभित झाला व म्हणाला,

" काय गौडबगाल आहे हें समजत नाहीं काही माणसाना काळीज नसतें, हेंच खरें ! "

टकोजी–काळीज कसल घेऊन बसला राव ! खेडयाचा कायदा न्याराच असतो. पाण्याचा खटका चालूच होता. सखारामबाबादेखत मोट घरण्याची पंचाईत पडू लागली. तेव्हा पाटलाला हा खटला त्याचा काटा काढण्याला फार उपयोगी पडला. शिरप्या आरोपी म्हणावा तर तो परागदा झालेला ! मग सखारामबाबा आरोपी. जबाबावर आगठा बाबाचा. आम्ही लिहिणार एक, वाचणार दुसरं. त्यावर निशाणी आगठा घेतला की काम झाल ! सखारामबाबाना वाटत होत, आपण निरपराधी. देव आपल्या बाजूचा, पण कोर्टात देव काही आला नाहीं. साक्षीपुरावा तयार करणारे आम्ही ! पाण्यासारखा पैसा खर्चणारे आम्ही ! सखारामबाबाच नाव घेणारा गोप्या ! झाली शिक्षा बाबाना !

गोप्या–म्या खोटं नाव घेतल दादा ! आता मागच पाप माझ्या माग हात धुनशान् लागलय !

पुढे गोप्या रडू लागला.

अरविंदानें सुस्कारा टाकला. राधाबाई व जिजा ही सर्व हकिकत ऐकत होत्या. राधाबाईंच्या डोळ्यातून निघणारे कढत कढत अश्रु टिप्‌टिप् गळत होते. जिजा आश्चर्यचकित होऊन गेली होती. सर्वजण काहीं वेळ स्तब्ध होते.

इतक्यात रायबाचा मुलगा बच्चा हा हातीं सोटा घेऊन तेथें आला व आपल्या वडिलाना म्हणाला,

" चिमाआक्काला घेऊनशान पाटील आलाय. समद शेटजीच्या घरात घसल्याती ! तुमाला बोलावलं है लवकर, तवा चला बिगी बिगी बाबा ! "

रायबा उठला व जाताना गोप्याला म्हणाला,

" गोप्या बजावतुया मी ! खबरदार आमच्या आत्ताच्या गोस्टी कुनाला सांगशील तर ! याद राकून आस ! "

चिमा मावशी व बळी पाटील यांचे गांवीं आगमन झाल्याचें कळल्या-बरोबर जिजाला भीति वाटू लागली. अरविंदही जरा विचारात पडला. शिरप्या मात्र कोंवळ्या मिशाना पीळ देत म्हणाला,

" येऊ द्या तो बळया ! चारी गावात मीच आता भारी गडी. केव्हा तरी लेकाला हात दाखविल्याशिवाय राहणार नाही मी ! "



## प्रकरण पांचवें.

# पाटलांचा चडफडाट



चिमा ही रायबाची वडील मुलगी. सखाराम व रायबा यांचा पूर्वी घरोबा फार होता त्याचप्रमाणें चिमाची व राधाबाईचीही बालपणाची मैत्री होती सखारामाच्या लग्नात राधाबाईचें वय अवघें आठ वर्षांचें होतें. गावातील त्यांचीं घरें व जमिनीही जवळ जवळ असल्यामुळें शेणगोटा करिताना, शेतात भाकरी घेऊन जाताना, धुणें धुताना, पुरुष मंडळी शेत-कामात गुंतून गेली असता, फुगड्या किंवा सुरपारबी खेळताना ह्या बहिणीं-प्रमाणें जिव्हाळ्यानें वागत असत. हास्यविनोदात ह्या दोघी आपापलीं कामें तेव्हाच उरकून टाकीत. चिमाचें लग्न बारा तेरा वर्षांच्या सुमारास झालें होतें तिचा पति सोनगावचाच होता. शेटजींचें ऋण फेडण्याकरितां तो मुंबईस जाऊन गिरणीत नोकरी करू लागला. तरीपण चिमा बरींच वर्षें माहेरीं होती. शेटजींचें देणें पैन पै पावतें केल्यानतर त्यानें चिमाला मुंबईस नेलें. तिचा पति आपल्या कामात वाकबगार असल्यामुळें त्या वेळीं तो जॉबरच्या हुद्द्यापर्यंत चढला होता. तो निर्व्यसनी होता त्यामुळें मुंबईत ह्या पतिपत्नींचा काळ मोठ्या आनदात जात असे.

मुंबईत चिमा होती, तरी ती आपल्या मैत्रिणीस विसरली नव्हती. वर्षांतून एक दोन महिनेतरी ती माहेरीं येत असे. त्या वेळीं राधाबाईच्या प्रेमळ सहवासात तिला सुख वाटे. इतकेंच नव्हे, तर त्यांच्या प्रेमसागरास त्या वेळीं पूर्ण भरती येत असे !

चिमा सुंदर तर होतीच, शिवाय तिची आनंदी वृत्ति, कष्टाळू स्वभाव व सुखानें मिळणारी मीठभाकरी ह्यामुळें स्वाभाविकपणें ती आरोग्यसंप-न्नही होती. तिच्या पवित्र आचरणामुळे मुंबईच्या बकाली वस्तीच्या चाळीं-

तरी तिच्याकडे वर डोळा करून पाहण्याची कोणाची छाती होत नसे घरकाम आवरून ती पतीबरोबर गिरणींतही कामधंद्यास जात असे.

पण तिचें दुर्दैव मात्र असें कीं, दोन तीन सुंदर मुलें होऊनही तीं तिला लाभलीं नाहींत! राधाबाईला झालेल्या संततींत फक्त जिजाच काय ती त्याना लाभली. चिमा माहेरीं आली कीं, जिजाचे कोडकौतुक ती राधाबाई-पेक्षाही जास्त करी. त्या वेळीं छोटी जिजा मावशी मावशी करीत तिच्या-मागें मागें असे!

चिमाचा पति गिरणींतील पट्ट्यात सापडून एकाएकीं इहलोक सोडून गेला व तिच्यावर दुःखाचा डोंगर कोसळला. त्यामुळें ती मुंबई सोडून माहेरींच यावयाची. परंतु त्या गिरणीच्या व्यवस्थापकानें तिला जास्त पगार देऊन कामावर ठेवून घेतलें त्या व्यवस्थापकाची पापवृत्ति तिला पुढें कळूं लागली. पण चिमासारखी पवित्र स्त्री म्हणजे नागीण ह्याची त्याला पुरी जाणीव झाली व त्यानें तो नाद सोडला. गिरणींतील ज्या स्त्रीविभा-गात ती असे, त्याही विभागात बदमाषगिरी करणे पुढें पुढें त्याला अशक्य होऊन गेले. तिचें काम चोख असल्यामुळे व्यर्थ दोष लावून तिला काढून टाकण्याची व्यवस्थापकाची छाती होत नसे!

सखारामबाबाना संकटातून सोडविण्यासाठीं हिने आपल्या मैत्रिणी-करिता पुष्कळ पैसा खर्च केला. बळी पाटलाच्या हातूनच तो पैसा खर्च झाला! पण गावातील डावपेच तिला माहीत नसल्यामुळें तो पैसा कसा व कोठे गेला हे तिला अद्याप माहीत नव्हते, आपल्या वडिलाचे स्नेही बळिबा पाटील याचा जीव सखारामबाबाकरिता तळमळतो अशीच तिची अद्यापिही समजूत होती.

सखारामाला कैदेची शिक्षा झाल्यानंतर चिमा एकदा सोनगावास आली होती. राधाबाईची समजूत करून तिने जिजाला मुंबईस नेले होतें. तिचा सांभाळही तिने उत्तम प्रकारे केला होता. तिच्या शिक्षणाची काळ-जीही तिनें घेतलेली होती. तिला वाटे कीं, 'आपला धाकटा भाऊ

बच्चाजीराव याच्याशीं जिजाचे लग्न लावावे, म्हणजे आपला व राघाबाईचा लोभ जन्मभर टिकेल!'

बळी पाटलाचें व रायबाचें लाबचे नाते होते. त्यामुळे बाळिबा कधीं कधीं मुंबईस येत, त्या वेळीं चिमाच्या बिऱ्हाडीं उतरत असत. गावचा पाटील म्हणून त्याची बडदास्त ती चागली ठेवी. आठदहा दिवसापूर्वी ते मुबईस काही निराळ्या हेतूने आले होते आणि जर ठाणें स्टेशनवरचा प्रकार घडला नसता, तर तो त्याचा हेतु कदाचित् तडीसही गेला असता! पण त्या ठिकाणी घडलेल्या प्रकारामुळे त्याचें तोंड आबट झाले. ते परत मुबईस गेले आणि चिमाला घेऊन ठाणे स्टेशनवर आले. तरीही त्यांच्य हातची शिकार निसटलीच !

त्या वेळीं अरविंदाबरोबर जिजा जात आहे, हें पाहून चिमाला फार वाईट वाटले. मात्र अरविंदाची तिला जी थोडीबहुत माहिती होती, तीवरून तो गृहस्थ तिला तिच्या घरीच पोहोचवील, अशी तिची खात्री होती. परत मुबईस येऊन रजा काढून घरी जावे, असा तिने विचार केला. बळी पाट-लानाही चिमाला घेऊनच गावीं जावें, म्हणजे आपला कार्यभाग होण्याचा जास्त सभव आहे, असे वाटून ते मुबईस राहिले. सोनगावसारख्या दूरच्या खेड्यात कोणी अधिकारी येण्याचा सभव नसल्यामुळें त्याला बिन-रजेचे दिवस मुबईत घालविणे गैरवाजवी वाटले नाही ! चिमाला लवकर रजा मिळाली नाही, शिवाय तिचा पगार होण्यासही आठ दहा दिवसाचा अवधि होता, म्हणून तो मिळाल्याबरोबर बाळिबा पाटलासह ती त्या रात्रीं सोनगावास येऊन पोहोचली.

दुसऱ्या दिवशी चिमा सर्वांना भेटली. जिजाला तिची भीति वाटत असली, तरी चिमा तिच्यावर रागावली नाहीं. तिने पूर्वीप्रमाणेच तिला कुरवाळले. चिमाला मुबईस परत जाण्याची घाई होती. बळी पाटलाना तिच्यामार्फत आपलें कार्य साधून घ्यावयाचे होतें. म्हणून दुसऱ्या दिवशीं रात्रीं त्यानीं रायबाला शेटजींच्या घरीं बोलाविले. चिमाचा कलही

आपल्या भाजूचा आहे, अशी त्याची समजूत होती. म्हणून तिलाही तेथे बोलावून आणले. शेटजींच्या सल्ल्यानें आपले काम साधून घ्यावें, असा पाटलाचा मानस होता. त्यावेळीं कांहींतरी बोलावे म्हणून प्रथम रायबा म्हणाला, "पाटील ममईस तुमी लई दिस घालिवलं, गावाची काळजी नवती वाटत तुमास्नी!"

पाटील–नव्हती कशी! आपल्या गावच्या माणसाना भेटण्याकरिताच गेलों होतों मुंबईत! पण गाठी लवकर पडतात कुठल्या!

शेटजी–गावचं माणूस चिमाबाई. त्याच्या बिऱ्हाडीं तर तुम्ही होता! मग आणखी कोणाच्या गाठी घेणार होता राव! सखारामाच्या पोरीची म्हणावी, तर तिला येथे येऊन आठदहा दिवस झाले. मग कोणा माणसाची भेट घेत होता पाटील?

शेटजी मिस्किलपणें हसले.

पाटील–तुरुंगात गेलो होतों मी! चिमाला चल म्हणत होतो, पण ती येते कुठली?

शेटजी–काय पाटील! तुम्ही तुरुंगात गेला? काय गुण उधळले तुम्हीं मुंबईत? आठ दिवस तुरुंगात पडला होता म्हणता? बिचाऱ्या चिमालाही तुरुंगात नेण्याच्या विचारात होता? राव, आम्हाला तरी कळवायच म्हणजे आम्ही आलो असतो तुम्हाला भेटायला!

शेटजी हसत हसत म्हणाले.

पाटील–शेटजी, मी नव्हतों तुरुंगात पडलो, मी गेलो होतों सखारामाला भेटायला ठाण्याच्या तुरुंगात! एका वर्षाच्या आत तो सुटणार म्हणतात!

रायबा–काय म्हणता पाटील! सकारामाला भेटायला गेलो व्हतो म्हनता! तो राव तुमाला बघितल्याबरोबर वाघासारखा चवताळल!

रायबानें जीभ चावली व बोलणें थांबविले.

पाटील-तुमची समजूत आहे, रायबा, खोटी. मी ठाण्याच्या तुरुंगात सखारामाची भेट घेतली. तो आनंदानं बोलला. त्याच्या सुटकेकरिता मीं

अपील केल्याचं त्याला ठाऊक आहे. मग तो काय म्हणून चवताळेल ? त्याला काळजी पडली आहे जिजाच्या लग्नाची ! त्याचे म्हणणं जिजा आता फार मोठी झाली असेल. कैदेत पडलेल्या बापाची मुलगी कोण पत्करील, ह्याच फिकिरीत आहे तो ! मीं त्याला सांगितलं ' काळजी करू नको, कोणी मिळाला नाहीं, तर तिला पाटलीण करीन म्हणून ! '

चिमा—कोनत्या गावाची पाटलीन करनार तुमी पाटील माज्या जिजीला ? बच्चाबरोबर तिचं लगीन कवाच ठरलं हे !

शेटजी—कैदेत पडलेल्याची पोरगी सून म्हणून करून घेणार, रायबा ! तुम्ही बोलूंच नका चिमाबाई ! पाटील म्हणतात, त्याप्रमाणं ती पोरगी पाटलीण झाली, तर तोंडावर कोणाची बोलण्याची छाती आहे ? काय बच्चाराव, तं त्या पोरटीला बायको करून घेणार ?

बचा—मी काय दिल्या दामाचा आन सांगितल्या कामाचा. चिमाआक्का जसं सांगल तसं मी करनार ! मग आक्कान माज्या गळ्यात घोरपाड बांदली तरीबी ती मी पत्करनार, शेटजी !

पाटील—तुझ्या गळ्यात घोरपड कोण बांधील बचाजीराव ? चिमाबाई का तशा वेड्या आहेत ?

चिमा—मी येडी का असेना ? सकारामबाबाकरता दीड हजार रुपये ओतलं व्हतंना, पाटील तुमच्या पदरात मी येडी म्हनून ! हायकोटातल्या सायबान शिक्शा फिरवावी म्हनूनच ना ? त्यान फिरावली नाई नशीब त्या रांडेचं ! म्या येडीन करायचं तेवडं केलं !

शेटजी—काय पाटील, चिमान तुम्हाला दीड हजार रुपये दिले अपिला करितां ? अपील तर कोठे चाललं नाहीं. मग पैशाचं काय झालं ? माझं कर्ज शिरप्याच्या बापानं हजार रुपये काढलं सख्यारामाच्या खटल्याकरिताच ! ते पैसे खालच्या कोर्टांत मीच खर्च केले. दीड हजाराची दाद मला नव्हती !

पाटील—शेटजी, मुंबईस सालिसिटरला पांचशें, बॅरिस्टरला पांचशें व पांचशें किरकोळ खर्चाला गेले तेव्हांच निघून ! आणखी हजार असते

तर काम फत्ते होत ! पण चिमा डागिने विकून पसे देईनाच ! मग अपील कसं चालणार व सखाराम कसा सुटणार ?

शेटजी हसू लागले, त्याना त्या बोलण्याची गमत वाटली ! ते कांहीं बोलणार, तों पाटलानीं त्याना डोळा घातला. चिमाच्या लक्षात तो प्रकार आला; पण त्याचा अर्थ तिला चागलासा उमजला नाहीं. चिमाचे दीड हजार गेल्याचें समजल्याने रायबाच्या मनाला मात्र फार वाईट वाटले.

चिमा—दागिन बच्च्याच्या बायकोकरिता हैती, जिजाच्या आगावर ते घालुनशान तिला मी भावजय करून घेनार !

शेटजी—चिमाताई, तुम्हाला ठाऊक नाहीं खेड्यातील वागणूक ! कैदेत पडलेल्याची मुलगी रायबासारख्या मच्चा माणसान सून करून घेणं बर नाहीं ! मी काय बचाजीरावाला हजार मुली आणून देईन ! तो माझा नोकर आहे, तोपर्यंत तुम्हाला त्याच्या लग्नाची काळजी नको ! पाटलाचा विचार जिजाला पाटलीण करण्याचा आहे, तो बरा आहे !

चिमा—कोनत्या गावची पाटलीन व्हनार ती शेटजी ? मी जीव कीं परान तिला साबाळली, ती माजी भावजय व्हनार म्हनून !

शेटजी—पाटलीण झाली, तरी तुमची भावजयच होईल. बळी पाटील तुम्हाला भावासारखे नाहीत का ?

“ म्हज ! सवतीवर जिजी बळीबाना द्यायची व्हय ?” चिमा चवताळली व म्हणाली, “ ममईत असच काई बडबडत व्हत खरं पाटील ! बाई, मला कळलाच नाइ तवा त्येंचा कावा ! ”

शेटजी—अस रागाऊं नका चिमाबाई ! पाटलाना मुलगा आहे का ? पाच पोरगे मातींत घातलेना ? एक सोन्यासारखी बबी मात्र राहिली आहे, म्हसोबानंच कौल दिलाय कीं, दुसऱ्या बायकोचा मुलगा जगेल. म्हणजे जिजाचा मुलगाच पुढे पाटील होणार चिमाबाई ! यात काय वाईट आहे ? फार तर त्यांची बबी, बचाजीरावांना पाटील देतील, म्हणजे तर झालं !

चिमा—ती काळी मुंगळी माज्या भावाला करून घेनार व्हय मी शेटजी ?

म्हसोबा कायबी म्हनुद्या ! पन माजी जिजी माज्या बघालाच ! त्या दाताडया बबीला द्या कोनातरी टोनग्याला !

पाटील–बच्चा काय मदनाचा पुतळा लागलाय ! अवसेच्या काळोखा-पक्षा काळ्या, फोडेल तोंडयाला माझी बबी–पाटलाची मुलगी–देतो राय-बाचा स्नेह म्हणून. नाहींतर काण कुत्रा विचारतो त्याला !

बच्चा काळाकभिन्न होता. पण तालीमबाज असल्यामुळे काळ्या गुळ-गुळीत पत्तरास तेल लावल्याप्रमाणे तो तेजस्वी दिसत होता. देवीमुळें त्याचा एक डोळा जरा अधु झाला होता, पण एका धड डोळ्यानें तो चार डोळ्याचे काम करीत असे ! त्याच्या तोंडावर पाटलाने त्याची नालस्ती केली, त्यामुळे तोही चिडला व बेफामपणानें म्हणाला,

" तूबी ढेरपोट्या पाटला, काळ्या जिमिनीत तुला पालता पाडला तरीबी ओलकनार नाईस ! उगाच दिमाक दावतुस कशाला ? म्हसोबान कौल दिला म्हनतुयास, चल माज्यासंग ! तो कसा कौल देतुया बगू ! "

बच्चा क्रुद्ध नजरेने पाटलाकडे पाहू लागला

शेटजींना हे प्रकरण इतकें चिघळेल असे वाटले नव्हते. सखारामाची मुलगी केल्याने तो सुटल्यावर पुन्हा विहिरीचा तटा होऊ नये, व त्याची जमीनही आपल्या ताब्यात यावी, म्हणून शेटजींच्या समतीने बळीबा पाट-लानीं हा डाव टाकला होता. चिमा अनुकूल झाली की, आपले काम होईल, अशी त्याची समजूत होती. पण ह्या प्रकरणास निराळेच स्वरूप येत चाललेले पाहून, शेटजींना व पाटलांना मध्याच्या प्रसंगातून सुटका कशी करवून घ्यावी, ह्याचाच विचार पडला. बच्चा चिडला होता, तेव्हा तो पाटालाच्या अंगावर जाईल कीं काय, असे शेटजींना वाटू लागलें. तो रागावला म्हणजे शेटजीना देखील धाब्यावर बसवी. त्यामुळे आताचा तटा युक्तीने मिटवावा म्हणून शेटजी म्हणाले,

" बच्चाजीराव, जाऊ दे त्या गोष्टी ! आपण म्हसोबाला कौल लावू. मी येतो तुमच्याबरोबर. उगीच तंटा कशाला ? "

शेटजींच्या बोलण्याने बच्चयाचा राग जरा ओसरला आणि तो म्हणाला,
" लावू या पुन्हा कौल ! जर त्यानं उलट कौल दिला तर मातर मी म्हसोबालाबी जाग्यावर राहू देणार नाई, शेटजी ! "

रायबा—मुलगी कोनाची आन अस येडयासारक भाडताय कशापाई ! सकाराम सुटून येऊ द्या तर आदीं ! मग टरवा पाहिजे तस !

चिमा—मी तिला माझी भावजयच करून घेनार ! कैदेंत गेलेल्याची पोरगी करून घेनार मी ! कोन वाळींत टाकतय ते टाकू द्या आमाला ! आता मोट मोटबी कैदत जातात ममईत !

पाटील—लग्नात मराटा मोळ्याच्या कोण बायका सवाष्णी येतात पाहू या तर खर ! मी पाटील आहे, तुला टाऊक नाहीं वाटत, चिमाबाई !

चिमा—असशील पाटील ! भित्र्या भागूबाईसारका टान्याच्या ठेसनावर थरथर कापत व्हतास का मग ? तुझ्या ताब्यात दिली मी जिजाला, सकारामाकडे तूं चाललास म्हनून ! पन तिला सोडूनशान पळत आलास चोरासारखा ममईत माज्याकडे ! दिवे ओवाळा पाटलाभवती !

पाटील—तोड आवरून बोल चिमा ! इथं सोनगावात आहेस तू !

शेटजी—इतक भाडण कशाला ? जिजा आता मोठी आहे. तिला पसत पडेल त्याच्याशी तिन लग्न कराव.

चिमा—अशी रीत नाई आमच्यात आजून ! आईबाप जिथ देत्याल, तथ मुलगी नादायची ! शहरात अस चालत असत शेटजी.

शेटजी—जिजा चागली शिकलेली आहे व शहरात राहिलेली आहे. ती वाटेल त्याला पसत करील !

चिमा—माज्या मनाबाहेर ती जायची नाई ! सकारामबाबा पन जायचं नाहीती ! रादा तर जायची नाईच मुळीं !

रायबा—चिमे, चुकतेस तू ! रादाबाईला सबाळली है शिरप्यान ! तो व जिजी रातदिस गोस्टी करीत बसत्याती !

पाटील—शिरप्या सुटलाय माझ्या तावडींतून अजून ! बर पाहून घेईन

त्याला ! माझ्या वाटेंत आडवा आला, तर उभा चिरीन त्याला उभा !

पाटलाचे डोळे लाल झाले.

बच्चा—दातव्हाट खातुया आता ! परसग पडला म्हंजे दाडेला आमास्नी देउनशान आपन नामानिराळा !

पाटील—बच्चा, तुला वाचविलाय मीं ! नाहींतर तुरुगात दळत बसला असतास ! बडबड करूं नको फार ! शेटजींना सगळं ठाऊक आहे. कागदी घोडे नाचविले, खिसा मोकळा केला, तेव्हा निभावलं !

शेटजी—मागच्या गोष्टी काढूं नका, पाटील ! जिजा शिकलेली आहे. तुम्हीही शिकलेले आहात. तुमचेंच जमेल. बच्चा काय किंवा शिरग्या काय, सारे निशाणी अंगठेवाले !

चिमा—बच्चा, मी नेते तुला ममईला ! तत आता मोट्या मानसालाबी शिकविल्याती ! गिरनीत काम कर व रातीं शीक तत !

शेटजी—चरक्यात ऊस घालून जस चिपाड निघत, तसा होशील बच्चा गिरणीच्या चरकातून पिळून निघून ! मनगटात जोर आहे, तो सारा जाईल मुंबईत ! निवळ चिपाड होशील चिपाड !

बच्चा—नको र, बाबा मला ममई ! माजा मेवणा असाच मेला गिरनीच्या चरकात सांपडूनशान !

रायबा—खुळा र खुळा ! सार असच मरत्याती का ? चिमी गिरनींत हायच कीं नाई ? तुला ममई नग असल, तर हतच शीक. तो देवमानूस आपल्या राम-सीतामाईच्या धरमशाळत राहानार है. तो रामाची सेवा करूनशान अडाण्याना शिकवनार हे. तूबी तत शीक. अर, गोप्याबी शिकनार है त्येच्याजवळ !

पाटील—मी आल्यापासून माझ्यापुढं गोप्या आला नाहीं लेकाचा. आहे तरी कुठं ?

रायबा—तो मरता मरता वाचलाय. शिरग्याच्या खोंडानं कुपात फेकलं त्येला. त्या देवमानसानच वाचविलं त्येला, पाटील ! मोटा चागला वैदू

हाय तो ! त्याची वानी पन साकरवानी ग्वाड !

पाटील—शिरप्याच्या खोंडान फेकल म्हणता गोप्याला ? मग तुम्हीं काय केल ? मला नाहीं कळविल ? शिरप्या फारच माजला आहे. चारी गावात तो वाढ असेल, पण माझ्याशीं गाठ आहे; सांभाळ म्हणावं ! गोप्याकडून फिर्याद द्यायला लावतों आता ! बरा तावडींत सापडला शिरप्या माझ्या !

शेटजी—आता नका भानगडी करू पाटील तुम्ही ! त्याला बरेच दिवस झाले व तो आता बराही झालेला आहे. डॉक्टरच सर्टिफिकेट आता मिळणारही नाहीं व शिरप्याला दुखवून आपल काम आता जमणारही नाहीं !

रायबा—पन, गोप्या आता असल्या नादात पडनार नाहीं म्हनतुया ! तो आता त्या देवमानसाजवळ राहनार व लिवायला शिकनार !

पाटील—कसला देवमाणूस घेऊन बसलात, रायबा ! पोटाची खळगी भरण्याची काहीं सोय करतोय का तो ? गोप्याला शिवून तरी कोण घेतो ? आमचा गडी म्हणून त्याला काही किंमत आहे झाल ! लेकाला गाठतों व दोन रट्टे देऊन आणतो कामावर बघा उद्या !

इतक्यात एक पोस्टमन धापा टाकीत शेटजीच्या घरीं पाटलाचा शोध करीत आला. भलत्या वेळीं पोस्टमन आलेला पाहून शेटजींना नवल वाटलें. तो कोणाची तरी तार घेऊन आला असावा, असें त्याना वाटले. पण त्याच्याजवळ तारेचा लखोटा नव्हता. सोनगावचीं पत्रे देण्यास तो कधींच तेथे येत नसे. अगोदर त्या गावी पत्रे फार थोडीं येत असत सोनगावापासून तीन चार कोसावर असलेल्या डोबगावच्या बाजारास शेटजी किंवा पाटील जात असत, त्या वेळीं त्याच्याजवळ पत्रे देण्याची व गावीं आल्याबद्दल आपल्या बुकात सही करून घेण्याची, त्याची वहिवाट असे. एखाद्या बाजारास ह्या दोघापैकीं कोणी न भेटल्यास तेथे येणाऱ्या कोणाजवळही पत्रें देऊन, तो सवडीनें पाटलाच्या सह्या घेत असे, पण पत्राकरिता गावीं येत नसे. दररोज पधरा सोळा मैलाचा प्रवास कायद्यानें त्याच्या माथीं

मारलेला होता, पण बिचारा एका डोंबगावच्या बाजारात कोणाचींही पत्रें, कोणाजवळही देऊन प्रवासाचे श्रम वाचवीत असे. कोणत्या गावची व कोणाची तक्रार होण्याचा संभव आहे, हें तो बरोबर जाणत असे. इंग्रजींत पत्ता असलेलीं पत्रे किंवा वर्तमानपत्रें ज्याचीं असत, तेच तक्रार करणारे लोक होत, असें त्याने ठरवून टाकलें होते ! सोनगावी इंग्रजी पत्त्याचें पत्र येण्याचा संभव नसे पण सोनगावच्या पत्त्यावर एक पाकीट व काहीं इंग्रजी वर्तमानपत्रें नुकतीच आली होती. डोंबगावच्या बाजारास बळिबा पाटील गेले असते, तर त्याच्याजवळ तीं पत्रें त्याने दिलींही असतीं ! कारण, तीं पत्रें त्याच्याजवळ दोन दिवस पडून होतीं ! सोनगावचा पत्रें वाटण्याचा वार त्याच्याजवळ पत्रें आली तोच होता. त्याच्यावर अलीकडे लोकांच्या तक्रारीही बऱ्याच झाल्या होत्या. त्यामुळें बाजार उलगडेपर्यंत वाट पाहून नाइलाजास्तव तो त्या रात्रीं ती पत्रे घेऊन धावत आला होता ! बिचाऱ्याचा इन्स्पेक्टरही पोस्टाच्या गावीं तपासणीकरिता दुसऱ्या दिवशींच येणार असल्यामुळें त्याला रात्रीचा दिवस करावा लागला !

पाटलापुढे पत्रे टाकून पोस्टमन म्हणाला,

" हे कोण तुमच्या गावात आलेत मरायला व आम्हाला मारायला ! "

वर खालीं पत्रे चाळून त्रासानें पाटील म्हणाले,

" हा इसम आमच्या गावीं नाहीं. रात्रीच्या वेळीं कसलीं पत्रें वाटतोस ! तुला घरदार नाहीं वाटत, असा रात्रीं बेरात्री भटकतोस तो ! "

" पोट जाळल पाहिजे ना, पाटील ! त्याचं नावही चांगल समजत नाहीं. लेकाचे विंग्रजी लिहितात पत्त्यावर. मराठी लिहिल तर त्याचा हात मोडतो वाटत ! मास्तरनीं मराठी लिहिलय तेंही मला समजेना, पाटील ! कशाला शिकतात हे लोक ! चांगलं लिहिता येत नाहीं, आणि पगार खातात मात्र ओंझ्यावरी ! " पोस्टमन चरफडत बोलला.

पाटलाना इंग्रजी समजत नव्हतेच; पण पोटमास्तरनीं लिहिलेलें मराठीही लागत नव्हते ! म्हणून त्यानीं तीं पत्रें शेटजींपुढें टाकलीं. शेटजींनी

वर्तमानपत्राच्या पत्त्यावरील इंग्रजी नाव ए. आर. ए. व्ही. असे वाचत वाचत पोष्टमनला म्हटले,

" तुला नाव समजत नाहीं, तर नोकरी करतोस कशाला ? "

" मला मराठी वाचता येतं, शेटजी. पण इंग्रजी शिकलेल्याना मराठी लिहिता आल नसतं का ? जास्त शाहाणपण असेल, तर पत्र लिहाव इंग्रजीत पण पत्ता मराठीत लिहावा. तो लिहिण्यास त्याचे हात मोडतात वाटत ! आम्हाला तर त्रास होतो व त्याना पत्रं वेळेवर मिळत नाहींत तीं नाहींतच ! पुन्हा हे लोक आमच्यावर तक्रार करण्यास तयार ! "

" अरे, आता इंग्रजी शिकलेले पोस्टमन होणार आहेत ! तुझ्यासारखे नकोत आता पोस्टखात्याला ! " शेटजी त्याला चिडविण्याकरिता म्हणाले.

" सोळा मैलाचा दररोज टिपिरा इंग्रजी शिकलेल्याना निभतोय वाटत ! आमचं काम आम्हीच करू जाणं ! " पोस्टमननें स्वाभिमान-दर्शक स्वरात उत्तर दिले.

" अरे, नोकऱ्या मिळत नाहींतच, म्हणून थोड्याच दिवसात इंग्रजी शिकलेले पोस्टमन येतील. " शेटजी पुन्हा टोचून बोलले.

" येऊंद्यात शेटजी ! पण पत्रावरचीं नावं तर सांगा आता ! ह्या गावीं तो माणूस असला, तर द्या त्याला हीं पत्रं, नाहींतर जातो परत मालक मिळत नाहीं म्हणून ! कोणी तक्रार केली, तर तुम्ही सांगा तसंच म्हणजे झाल. उद्या साहेब यायचा आहे, म्हणून तर आलो रात्रीचा ! "

शेटजींनी एकेक अक्षर वाचीत वाचीत नाव वाचण्याचा आव आणला, आणि पोस्टमास्तरनीं मराठींत खरडलेले नाव लावून ते म्हणाले,

" पाटील, 'अरविंद' ह्या नावाचा मनुष्य आपल्या गावीं दिसत नाहीं मग कोणाचीं बर हीं पत्र असावीत ? "

" जिजाला घेऊन आलेला मानूस अजून हतं हाय का ? " चिमा मध्येंच म्हणाली.

रायबा- तो देवमानूस हत हाय, मगापासून म्हनतुया मी. पन त्येचं

नाब आमालावी ठाव नाई ! जिजा त्येला दादा म्हनत्ये. असल गिरनीं-
तला कुनीतरी !

अरविंदाला जिजाने ठाणे स्टेशनवर पाहिल्यामुळेंच बळी पाटलाचे
सारे मनचे मनोरे ढासळले होते नाही तर तिला एकाद्या पाहुण्याचेच
गावी नेऊन, तो तिचे लग्न आपणाशी लावूनही मोकळा झाला असता !
तोच दुष्ट अरविंद अद्याप येथे आहे, हें कळल्यामुळे बळी पाटलाचे पित्त
फारच खवळले व तो कावराबावरा होऊन म्हणाला,

" तो फार दुष्ट माणूस आहे, रायबा. तो मुंबईचा भामटा जिजीला
पळवून नेत होता ! पण मीं पोलिसना वर्दी देऊन त्याच्यामागे पोलीस
लावून जिजाला मींच घरीं पाठवले ! "

" भामटा असेलसा दिसत नाई, पाटील ! गोप्याला त्येनच बर केलं,
मी सांगतुयाना मगापासन ! " रायबा अंतःकरणपूर्वक बोलला.

" मुंबईचे भामटे कसे असतात तुम्हांला ठाऊक नाहींत रायबा ! "
पाटील मान हालवीत तुच्छतेने म्हणाले.

चिमाला पाटलाच्या बाष्कळ बडबडीची चीड आली व ती म्हणाली,
" मग का भागूबाईसारका त्याच भ्या वाटून माज्याकडे पळत ममईस
आलात पाटील ? "

बळिबाच्या मर्मा हे शब्द लागले व तो संतापला व चिडून म्हणाला,

" अस बरळू नको बरं चिमा ! आणि बोलू नको खोट नाट ! पाटलाचा
इंगा आता त्याला दाखवीन तरच मी बळी पाटील ! "

प्रकरण सहावें.

# किती चमत्कारिक पत्र हें !



ती मुंबईची चौपाटी म्हणजे शहरातील कोंडन्या चाळींत गुदमरून गेलेल्या लोकांचे सायंकाळचे आनंदानें विश्रांति घेण्याचें ठिकाण होय. त्या ठिकाणचे प्रासादतुल्य बंगले ज्यांचे असतील त्या श्रीमंताच्या सुखाचा हेवा चौपाटीवरून भटकणाऱ्या गोरगरिबांना वाटल्याशिवाय राहात नाहीं. पण बंगल्यांत राहणारे सर्वच सुखी, आनंदी असतात असेंच काहीं म्हणतां यावयाचें नाहीं आजच पाहाना, अशाच एका सुंदरशा बंगलींत एका दिवाणखान्यांतील पलंगावर एक तरुणी तळमळत पडली होती. तिची आई तिला चार वाजल्यापासून हाका मारून उठवीत होती. पण ती उठली नाहीं. शेवटी तिनें जोरानें म्हटलें,

"विमा, हें ग काय ! पांच वाजायाला झाले तरी तूं अद्याप उठत नाहींस ! आज रविवार असला म्हणून काय इतका वेळ झोपायचं ! उठ लवकर ! चहा निवून चाललाय ! "

"आई," विमल मृदु स्वरांत म्हणाली, "नाहीं ग बाई मला उठवत आतां ! मला चहा नको नी काहीं नको "

"असं आज झालं आहे तरी काय विमा !" आईसाहेब म्हणाल्या, "उठ. आतां मधू येईल. आज महालक्ष्मीला जायचं ना !"

तरीही ती काही बोलेना म्हणून त्या दिवाणखान्यांत आल्या. त्यावेळीं विमल म्हणाली,

"आई, मला काहीं तूं उठवूं नकोस ! मी आज कुठं येणार नाहीं. तूं अन् दादा महालक्ष्मीला जा आपलीं !"

विमलच्या बोलण्याचा स्वर आईसाहेबाना नेहमींचा वाटला नाहीं. त्या पलंगावर बसल्या. त्यानीं चादरींतून तिच्या मस्तकावर हात ठेवला.

" विमल, तुझं डोकं दुखतंय का ? " आईसाहेब प्रेमाने तिचें मस्तक चाचपीत म्हणाल्या. तरीही विमल बोलली नाहीं. आईसाहेबानीं तिच्या केसावरून हात फिरवीत पुन्हा म्हटलें,

" आज तुला झालंय तरी काय ! मला माग ना ? "

" आई, मला काऽही होत नाहीं नी काहीं नाहीं ! "

त्या वेळीं विमलचा कंठ दाटून आला. तिनें आपल्या आईचा हात हलक्या हातानें धरून ठेविला. तेव्हा त्या काहीं वेळ आपल्याशींच विचार करीत स्वस्थ होत्या. पुन्हा त्या अगदीं प्रेमळपणाने म्हणाल्या,

" विमल, उगीच कशाला बाई वाईट वाटून घेतेस ! आज ना उद्या लवकरच अरविंद इकडे आल्याशिवाय राहणार नाही, वेडे ! "

" आई, मला पाहिजे तर वेडी म्हण. पण दादाही म्हणतो, अरविंद बंदीखान्यातून सुटताना वेड्यासारखे बोलत होता म्हणून ! "

" तुझा दादा फार शहाणा आहे ! मला अरविंदाचा स्वभाव लहानपणापासून माहीत आहे. कुठ आठ नऊ महिने झाले, मला सोडून तो दूर गेला. निदान माझ्याकडे आल्यावाचून तो कसा राहील ? चार दिवस कुठं गेला असेल दरींखोरी पाहायला ! येईल आता परत !

" मलाही काहीं त्याचा स्वभाव नाहीं वाटतं ठाऊक ? मी बी. ए. होईन म्हटलं, पण मला त्यानच तस करू दिलं नाहीं. त्याच्या म्हणण्याप्रमाणं मी नर्सिंगचा कोर्स घेतला. आई, एकाचाच हट्ट असा चालवावयाचा वाटतं जन्मभर ! मी म्हणत होते, मेडिकल कॉलेजची शेवटची परीक्षा आली आहे, तेवढी दे आणि मग पड पाहिजे तर त्या चळवळींत ! पण हट्टानच ना कॉलेज सोडून दिल ? गरिबाची कळकळ म्हणे फार ! मग द्यायचे होते दहा पाच हजार रुपये एकाद्या गरिबाच्या संस्थेला ! "

" पण पैसे देणार तो कोण ! त्याच्या वडिलांनीं आपल्या सर्व धन-

दौलतीसह त्याला माझ्या स्वाधीन केला ना ! मी सांगेन त्याच्याबाहेर तो जाईल कसा, विमल ! तूही त्याच्या मर्जीबाहेर जात नाहींस. लहानपणापासून तुम्ही हंसलात खेळलात आणि आता तर तुमचीं मनं जमलीं आहेत असं म्हणता, तेव्हा आज ना उद्या तुमच्यावर माझ्या डोळ्यादेखत अक्षता पडल्या म्हणजे मी कृतार्थ झाले, विमल ! ऊठ. काहींतरी वेड घेऊन बसली आहेस. तुझं लग्न झाल्याशिवाय मधूही लग्न करीत नाहीं. तेव्हा मला वेडीलाच जास्त काळजी ! "

विमल उठली नाहींच व उठण्याचें चिन्हही दिसेना, तेव्हा आईसाहेब म्हणाल्या,

" विमल, आज असं काय झालं आहे तुला ! कध्धीं कध्धीं असा हट्ट तूं केला नाहींस ! "

" आई, मी हट्ट करीत नाहीं, पण मला आज उठवतच नाहीं, काय सांगूं तुला ! "

तिच्या आईला वाटलें, आज काही तरी विशेष प्रकार घडून आला असावा. तिच्या अंतःकरणात शिरल्याशिवाय खऱ्या प्रकाराचा उलगडा व्हावयाचा नाहीं, म्हणून त्या म्हणाल्या,

" मला सगळं कळतय, विमा ! मी आहे ना खंबीर ! तुझ्या मनासारखं झाल्याशिवाय राहणार नाहीं. "

" आई, लहानपणचा स्वभाव तरुणपणीं जशाचा तसाच राहतो, असं का तुला वाटतं ? "

" समजले मी ! पण अरविंद माझ्या शब्दाबाहेर नाहींच मुळीं जायचा ! "

" आई, कसला तुझा शब्द घेऊन बसलीस अन् काय ! अग मला तरी तसंच वाटत होत ना ! "

विमलचा कंठ दाटून आला व तिच्या तोंडातून शब्द उमटेना.

" उगीच मनाला ताप करून घेऊ नकोस. मीच काय करायचं तें

करते. तू आपली स्वस्थ राहा. पण आज तसं काय झालय हे साग तर आधीं मला ! ”

“ आई, तू जा कशी आपली ! त्याच्याकरिता मी कॉलेज सोडल. त्याच्या गैरहजेरीत त्याच कार्य चालविल. त्याच्या प्रेमाखातर मी देश-सेविका बनले. पण ह्याचं कौतुक करण्याकरिता तरी दादाबरोबर त्यानं मुबईस आधी यावयास नको होत का ! तो असे चाळे करील अशी मला कल्पनाही नव्हती, आई ! ”

तू कांहींही म्हण, पण अरविंद अतर्बाह्य स्फटिकाप्रमाण स्वच्छ मनाचा आहे. त्याच आत एक आणि बाहेर एक अस कांहीं नाहीं. ”

“ आणि मी मात्र आतल्या गाठीची, असचना तुझ म्हणण, आई !”

“ अग, माझ्या म्हणण्याचा असा का अर्थ घ्यायचा ! मघापासून मी विचारते, आज अस काय झाल ते साग म्हणून ! पण तें तर तू लप-वून ठेवतेस ! ”

“ आई, तुझ्यापासून मी काय लपवून ठेवणार ! पण माझ दुःख मी सागू तरी कशी ! माझ्या ध्यानींमनीं नाहीं असा प्रसंग आज आलाय खरा. ” त्या वेळीं विमलचा कंठ दाटून आला.

आईसाहेबाचें मन फार अधीर झाले. त्याचेही डोळे भरून आले. त्या गद्गदित स्वरात म्हणाल्या,

“ विमल, अशी कष्टी होऊ नकोस बरं ! तूं आपलं दुःख एकदा ओकून टाक कशी ! ”

“ काय ओकून टाकायच आई ! दुःख एवढं मोठ आहे कीं, तें माझ्या जन्मास पुरून उरणार आहे. दादा म्हणत होता कीं, कोणा एका सुदर मुलीबरोबर अरविंद गेला आहे आई, तोच पाश मला नडतोय झाल ! नाहींतर दोनतीन महिन्यात अशा थरावर गोष्टी कशा जात्या ! ”

“ काय म्हणतेस हें विमल ! अशी सशयी तूं कशी ! माझ्या सान्नि-ध्यात आजपर्यंतचं आयुष्य घालविणारा अरविंद कसल्याही पाशात अडक-

णार नाहीं. आणि माझ्या विमलला असा संशय येतो तरी कसा ! "

"उगीच असं बोलू नकोस आई ! मीच ना संशयी तुला वाटत ! मग हें घे तुझ्या अरविंदाचं आजचं पत्र ! मग काय म्हणावयाचं तें म्हण ! "

तें पत्र त्या वाचू लागणार तोंच 'आई' 'आई' असे मधुकराचे शब्द त्यांच्या कानीं आले. त्यामुळे त्या तेथून उठून गेल्या. आपण दिलेलें पत्र आई आणि दादा वाचणार व आपणास वेडी ठरविणार, असे विमलला वाटलं व अस्वस्थ मनानेंच ती पलंगावरून उठली व समोरच्या खिडकींत जाऊन उभी राहिली

ती सायंकाळची वेळ होती विमलचें लक्ष अथांग सागराकडे गेलें. त्या दिवशीं ती भरतीची वेळ होती. एकामागून एक येणाऱ्या लाटा चौपाटीच्या एका बाजूच्या खडकावर आदळत होत्या विमलच्या मनातही आशेच्या अशा लाटा वर उसळत होत्या व त्या निराशेच्या खडकावर फुटून जात होत्या. समोरच्या भरतीप्रमाणें तिचे अंतःकरणही वरचेवर भरून येत होतें.

थोड्या वेळानें तिनें आपले डोळे पुसले. ती चौपाटीकडे निश्चल दृष्टीनें पाहू लागली तिच्या बंगल्याच्या तिसऱ्या मजल्यावरून चौपाटीवरील देखावा सुंदर दिसत होता हातांत हात घालून बाबुलनाथचा रस्ता उतरूं लागणाऱ्या प्रणयी युगुलाचा तिला हेवा वाटू लागला समुद्रकांठीं एका बाजूस गुजगोष्टींत रंगून गेलेल्या जोडप्याकडे तिला पाहवेना. वाळवंटांतून आपल्या तान्हुल्यास कडेखांद्यावर घेऊन आपल्या पतीसमवेत फिरणाऱ्या जोडप्याचा हंसतमुख आविर्भाव तिच्या दृष्टींत भरेना. दिनराज पश्चिम दिशेशीं हास्यविनोदांत दंग होऊन गेला होता. त्या दिशेच्या आनंदी मुखकमलावरील रक्तिमा मोठी आल्हाददायक दिसत होती. पण विमलच्या नेत्रांना हें दृश्य पाहवेना, म्हणून तिनें आकाशाकडे वर पाहिलें, तों तिला अस्पष्ट अशी दिसणारी चंद्रकोर मेघाशीं खेळत असलेली दिसली. काय असेल ते असो, तिनें थोडा समाधानाचा सुस्कारा टाकला.

पण चमत्कार असा कीं, त्याचा चाललेला खेळ पाहण्याचें भाग्य तिला मिळूं देऊं नये म्हणूनच कीं काय, मेघरूपी काळा पडदा मध्यें आला. वास्तविक तशा दिवसात असे मेघ फार क्वचितच येत असतात. पण आपल्या मनाला त्रास देण्याचा त्याचाही मानस होता• म्हणून ते त्या वेळीं अवतीर्ण झाले, असें तिला वाटले. त्या वेळीं तो चौपाटीवरील जनसंमर्द आपापल्या निवासस्थानाकडे परतू लागला होता. इतक्यात त्या मेघराजानें चौपाटीवर सडा घालण्याचे काम सुरू केले. त्या वेळीं प्रणयी युग्माची उडालेली वादल तिला मनोहर दिसू लागली. निवाऱ्याच्या जागीं पतिपत्नींना लगटून उभे राहण्याचा प्रसग आला असताना त्याची होणारी त्रेधा पाहून तिला तशाही स्थितीत गमत वाटली ! थोड्या वेळाने चौपाटी निर्मनुष्य झाली. तेव्हा तिचे लक्ष बगल्याच्या समोवतालच्या बागेकडे वेधलें.

सुदर सुदर फुले जलसिंचनाने टवटवीत होऊन ती हसत आहेत, लहान लहान वृक्षावरील वेली आनदाने बेहोष होऊन आनंदाश्रु गाळीत आहेत की काय, असे तिला वाटू लागले ! थडगार वायुलहरीमुळे तिचे मस्तक शात होऊ लागले.

अरविंदाचे पत्र वाचून मधुकराला विशेष आश्चर्य वाटले नाहीं. पण आईसाहेब मात्र त्या पत्रातील मजकूराने घोटाळ्यात पडल्या. अरविंदाने इतकें तुसडेपणाने लिहिले कसे ह्याचे आश्चर्य वाटून त्या म्हणाल्या,

"मधू, अरविंदाच डोक अस केव्हापासून बहकल आहे ?"

"आई, तू म्हणतेस तस त्याचं डोकं बहकल नाहीं."

"मग असा चमत्कारिक मजकूर त्यानं का बरं लिहावा ?"

"ताईन लिहिलेल्या पत्राच हे उत्तर आहे. तिन आपल्या पत्रात काय लिहिलं, हें तरी आपल्याला कुठ माहीत आहे ? तिनं तुसडेपणानं लिहिल असेल म्हणून अरविंद असे लिहीत असावा.

"पण तो एका सुदर मुलीबरोबर गेला आहे, अस विमल म्हणते, त्यानंतर तर तसं झाल नाहीं ना ?"

" छट्! आई, अशी कशी तुला शंका येते? तो अरविंद आहे. त्याचं मन कालत्रयींही वाममार्गाकडे जाणार नाहीं. "

" मग ह्यावर आता काय उपाय करावा? आपण त्याच्याकडे जाऊं व त्याची समजूत घालून त्याला परत आणूं. "

" आपण गेल्यानंतर तो परत येईलच असं मला तरी सांगता येत नाहीं. त्याला एकांतवास पाहिजे. प्राणायाम करून चित्त स्थिर करून तो येणार आहे म्हणे! विमलच्या पत्रांनी त्याच्या चित्तांत अस्थिरता उत्पन्न झाली, म्हणून तो असें निर्वाणीचें लिहीत असावा. अंतरिक्ष कोसळलें तरी तो आपल्या वचनापासून ढळणार नाहीं, अशा निर्धाराचा तो आहे. "

" मग तिच्या मनाला भयंकर यातना होतील, असं पत्र त्यानं कां लिहावं? हळुवार मनाला ह्या पत्रानं किती त्रास झाला आहे, हें पाहा तर मधू! "

" आई, पत्राचा अर्थ विमलनं भलताच घेतला, म्हणून असं झालं. "

" मग तूंच तें पुन्हा वाचून पाहा. मला वाटतं तूंच घाईनं वाचलंस माझ्या समजुतीकरितां असं बोलतोस झालं! " आईसाहेब म्हणाल्या.

" आई, मी पत्रच तुला वाचून दाखवितों, मग तूंच सांग, मनोभंग होण्यासारखं त्यांत काय आहे तें? "

रामगुंफा, ता. ५ जानेवारी

प्रिय विमल,

तुझीं पत्रें पावलीं. आरोपींवर बजावणी करणारीं तीं वारंटेंच होत. मी बंदिखान्यांतून सुटतांना विचारपूर्वक जो मार्ग ठरविला आहे, तो बरोबर असो किंवा चुकीचा असो, त्याप्रमाणें वागण्याचा मी निश्चय केला आहे. यापासून मला ढळविण्याचा प्रयत्न करण्यापेक्षा तूं जहागिरदारीण होण्याचें ठरवावेंस, हें मला उचित दिसतें. म्हणूनच मी तुला दिलेल्या वचनांतून आजपासून मुक्त मी होत आहे व तुझाही मार्ग मोकळा करून देत आहे.

तुझा,

अरविंद

" वाचलसना मधू कस स्पष्ट लिहलय त्यान ! किती चमत्कारिक पत्र हें ! " आईसाहेब दुःखपूर्ण स्वरात उद्गारल्या.

" आई, तू चुकतेस. विमलच्या पत्रानीं चित्त स्थिर करू पाहणारा हा मुनि अस्थिर होऊन काहींतरीच लिहीत सुटला. त्याला पक्कं माहीत आहे, कीं विमलचा निश्चय बदलणार नाही, म्हणून जहागिरदारीण हो असे तिला टोचून तो लिहितोय. बंदिखान्यातून सुटताना ह्या मुनीच स्वागत करण्यास विमल आली नाही, तेव्हाची त्याची मुद्रा अजूनही मला दिसत आहे. स्वारी जरा चंचल आहे, चित्त स्थिर करून गोरगरिबाचीं सेवा करणार आहे, असे तो म्हणतो. हे वेड काही दिवस चालेल, मग मूळपदावर येईल. मला आश्चर्य वाटत, की विमल इतकी वेडी कशी ! "

" मधू, विमलला वेडी कशी म्हणतोस ? स्त्रियाची मनःस्थिति स्त्रियाच जाणू शकतात. आणि मी तर तिची आई ! मला तर आता सगळा वेडेपणा अरविंदाचाच दिसतो. तो इतका बहकेल, असं मला स्वप्नात देखील वाटल नव्हत. "

" आई, जरा दमान घे. त्या स्वारीला ताळ्यावर आणण्याच काम माझं. पण मी जे काय करीन, त्याला तुमची समति पाहिजे. माझं करण तुम्हाला चमत्कारिक वाटेल, तरी पण ते परिणामीं हितकारक होईल अरविंदाची त्रेधा उडेल तेव्हाची गमत पहा तर तुम्ही ! "

" मधू, काही वेडवाकड होईल अस मात्र करू नकोस बर ! माझ्या गळ्याची शपथ आहे तुला ! विमलची समजूत तूच घाल. मला म्हातारीला काहीं समजत नाही त्यात ! "

आईसाहेबांच्या डोळ्यास टचकन पाणी आले

## प्रकरण सातवें.

# रामगुंफेंत केशरी पातळ !



सोनगावच्या रामसीतेचा डोंगर हें एक रम्य स्थान होतें पायथ्या पासून थोडया उंचीवर राम आणि सीता ह्या देवतांची लहान लहान मंदिरें होतीं. कोणत्याही रामाच्या देवळांत रामाच्या मूर्तीजवळ सीतामाई असावयाच्याच. परंतु ह्या ठिकाणीं मात्र त्यांचीं मंदिरें पृथक् पृथक् होतीं. भाविक लोकांची अशी समजूत होती, कीं एकदा रामचंद्र कंदमुळे मिळ-विण्याकरितां दंडकारण्यातील गिरीकंदरांतून हिंडत असतां ते ह्या ठिकाणीं आले. येथील रम्य वनश्रीनें आनंदित होऊन एका स्वच्छ निर्झराजवळील पाषाणावर विश्रांति घेण्यासाठीं बसले तों त्यांची समाधि लागली. पुष्कळ वेळ झाल्यामुळें त्यांचा शोध करीत सीतामाई आल्या. रामचंद्रांना समाधि-स्थितींत पाहून त्याही समोरील एका भव्य शिळेवर आसनस्थ झाल्या. रामचंद्रजींना ध्यानस्थ पाहून सीतामाईची मनःस्थिति प्रसन्न झाली व त्यांचीही समाधि लागली, त्यामुळें त्या उभयतांचीं मंदिरें त्या ठिकाणीं वेगळीं वेगळीं आहेत.

हें कसेंही असो, पण तें ठिकाण अद्यापि नितांतरम्य आहे. मंदिराच्या मागील बाजूस आकाशास भिडणारें सह्य पर्वताचें शिखर तर पुढील बाजूस पातालापर्यंत पोंचणारी खोल दरी, वृक्षवेलींच्या समुदायामुळें आपला अंत न लागूं देणारी ती दरी, त्या दरीचा अंत शोधण्याकरिताच कीं काय मोठमोठया कडयावरून उडया टाकीत असलेले जलप्रवाह, हा सर्व देखावा कोणाचेंही मन आकर्षील असाच आहे.

त्या डोंगराच्या पायथ्यापासून अर्धा पाऊण कोसावर सोनगाव आहे. पायथ्याशीं मोकळे मैदान असून त्यापैकीं काहीं भाग त्या गावच्या गायरानाकरिता खुला व काहीं भाग सरकारी मालकीचा आहे. डोंगरातील सर्व जंगल सरक्षित आहे.

त्या जंगलात भरपूर चारा असला तरी सोनगावच्या जनावराना त्याचा उपयोग होत नसे. एकादे खट्याळ जनावर त्या भागात मनमुराद चरू लागले तर तें गावच्या कोंडवाड्यात केव्हा पडेल याचा नेम नसे. म्हणून गुराखी गावच्या गुरासाठी ठेवलेल्या गवतावर गुराना चारून त्याना लक्ष्मण कुडातील पाणी पाजण्यास अगदी जपून नेत असत. त्या जंगलात क्रूर श्वापदाची वस्ति नव्हती असे नाही पण ती सर्व त्या दरीच्या आतील भागात असे. दरीतून वाहणाऱ्या मोहिनी नदीचे पाणी पिण्यास त्याना भरपूर मिळत असल्यामुळें तिचा उगम राममंदिराजवळील ज्या रामकुडात झाला, तिकडे तीं श्वापदे फिरकत नसत. भाविकाची अशी समजूत होती, कीं रामचद्राच्या धनुष्याच्या भीतीने तीं तिकडे येत नसत. देवळाकडे यावयाच्या वाटेवर आरभी लक्ष्मणकुड लागे व त्या ठिकाणीं हातपाय धुवून तेथून एका फर्लांगावर असलेल्या देवळाकडे लोक जात असत.

अरविंदाला ते स्थळ अगदी पसंत पडले तेथे जवळच झाडींत एक दगडी बाधणीची जुनी धर्मशाळा होती तिचे नाव त्याने रामगुफा ठेविले. त्या ठिकाणीं त्याने प्राणायामाचा अभ्यास सुरू केला. श्रीपती हा त्याला कपिला गाईचे दूध आणून देत असे. गोऱ्या सभोवतालचे पटागण स्वच्छ करी. त्या ठिकाणापासून बऱ्याच दूर अतरावर गोऱ्या रहात असे.

अशा प्रकारे अरविंदाचा काळ तेथे आनंदात जाऊ लागला. प्राणायामात त्याची प्रगति होऊं लागली त्यामुळे त्याचा आत्मविश्वास वाढला. मुंबईच्या कोदट वातावरणातून निर्माण होणाऱ्या आकुंचित विचाराचा निरास होऊ लागला. अशा स्थितींत दोन तीन महिने गेल्यावर गोरगरिबाकरिता काहींतरी विधायक कार्य सुरू करावें, असे त्याच्या मनानें घेतलें.

त्या वेळीं ज्वारीच्या मळण्या होऊन गेल्या होत्या. तूर, हरभरा, इत्यादि पिकें शेतकऱ्याच्या पदरात पडली होतीं. मळेवाल्याच्या शेतातील गूळ, हळद याची विक्री झाली होती. सरकारी धारा भरण्याचे तगाद्यावर तगादे चालू होते. वर्षाची बेगमी करून धान्य विकावें म्हटले, तर त्याने सरकारदेणें भागत नव्हते. कित्येक दूरदर्शी शेतकरी वर्षाच्या बेगमीचे धान्यधुन्य घरीं ठेवून, संग्रहीं असलेले किडूक मिडूक शेटजींकडे गहाण ठेवून किंवा त्याची विक्री करून शेतसारा भागवीत होते बळी पाटील गावच्या वसुलीच्या धादलीत होते. मालाची खरेदीविक्री व कुळाकडील वसुली ह्या कामात शेटजी चूर होऊन गेले होते. शेतकऱ्याच्या घरातील कर्त्या माणसाना चिंतेने ग्रासले असले, तरी मुलाबाळाना ते दिवस मोठे आनदाचे होते

त्या मुलानीं सकाळीं उठावें, जनावराचा शेणगोठा करावा, न्याहारी उरकावी, चटणीभाकरीची शिदोरी घेऊन आपापल्या गुराढोरांना दामटीत गायरानाचा मार्ग धरावा गायरानात गेल्यावर तर काय मजाच मजा! खूप बागडावे, शिट्या वाजवाव्या, गाणीं गुणगुणावी, दुपार झाली, कीं लक्ष्मणकुडात यथेच्छ डुबावे, शिदोऱ्या सोडाव्या, त्यावर भरपूर ताव मारावा, जनावराना पाणी पाजावें, तीं विसावा घेण्याकरिता वटवृक्षाच्या छायेंत बसली, कीं सुरपारब्याचा खेळ मनमुराद खेळावा, करवदाच्या जाळ्या धुडाव्या, अशा प्रकारें ती गायरानात आलेली सोनगावची मुले त्या ठिकाणीं मोठ्या आनदात आपला वेळ घालवीत असत.

त्या आनदी मुलामुलींचा समुदाय पाहून अरविंदाला हर्ष होई. त्याचीं वस्त्रें फाटकींतुटकीं असली तरी त्या मोकळ्या हवेत ती मनमुराद बागडत असल्याने त्याचे चेहेरे उमलत असलेल्या कळीप्रमाणे मनोहर दिसत. तो बालबालिकाचा समुदाय व त्याच्या सवत्स धेनु पाहून हे गोपबालकच ह्या ठिकाणीं मूर्तिमत अवतरले आहेत, असें त्याला वाटे!

सायकाळच्या वेळीं राममदिराजवळील धर्मशाळेत श्रीपती व त्याच्या तालमींतील संवगडी जमत. उन्हाळ्यात त्या तरुणाना विशेष कामधदा

नसल्याने कोठेतरी चकाट्या पिटण्यापेक्षा अरविंद ज्या मनोहर कथा सांगे व नंतर काळजीपूर्वक लिहिण्यावाचण्यास शिकवी, त्यात त्यांना गोडी वाटू लागली. अद्यापि हे तरुण लोभादि मोहाच्या तावडींत सांपडले नसल्यानें गावातील कटकटीपासून अलिप्त होते.

ह्या तरुणांप्रमाणे दिवसा जमणाऱ्या मुलामुलींनाही विद्येची गोडी लावावी, असे अरविंदानें श्रीपतीच्या अनुमतीनें ठरविले. मुली लाजून पुरुषाजवळ शिकण्यास कचरतील, म्हणून जिजाने त्यांचा शिक्षणक्रम आपल्या शिरावर घेतला. त्या गायरानांत जुनाट भव्य वटवृक्ष होते. त्याच्या शीतल छायेंत अरविंदानें आपले विद्यालय एका सुमुहूर्तावर सुरू केलें. सकाळचा त्याचा वेळ ध्यानधारणेंत जाई. दुपारी तो मुलांना शिक्षण देई व सायंकाळीं तरुणांना लिहिण्यावाचण्यास शिकवी

शेटजी व बळी पाटील हे गेले तीन चार महिने आपापल्या कामांत पूर्णपणें गुंतून गेलेले होते गांवची पैन पै वसूल झाली, म्हणजे अधिकारी खूष होत, हे पाटलांना पक्के माहीत असल्यामुळें ते सारावसुलीच्या कामांत कसूर करीत नसत त्यांनीं लोकांना धाकदपटशा पुष्कळ दाखविला. जप्तीची दहशत घालून वसूल करण्याचा प्रयत्न केला. पण इतके उपाय करूनही सगळा वसूल झाला नव्हता. कुळांची गरज शेटजी ऐनवेळीं भागवीत असत, परंतु सोनेंनाणे हातीं पडल्याशिवाय ते योग्य रक्कम त्यावर्षी देईनात. माल घेण्याचा त्यांनीं सपाटा चालविला असला, तरी नाण्याच्या रूपांत त्यांना नफा कमी राहू लागल्यामुळे, तेही संतुष्ट नव्हते.

पाडव्याच्या दिवशी वर्षफल ऐकण्याच्या वेळीं मारुतीच्या देवळांत श्रीपतीच्या तालमींतील तरुण व गुराखी मुले पाटलांना दिसलीं नाहींत. कामाच्या गर्दीमुळे अरविंदाच्या चळवळीकडे पाटलांचें फारसे लक्ष गेले नसलें, तरी त्या दिवशीं श्रीपती, व त्याचे मित्र तेथें न आल्यामुळे त्यांना श्रीपती व अरविंद यांचा फार राग आला. गोप्यावर त्यांची गैरमर्जी होतीच. पण पोटाला चिमटा बसल्यावर तो परत येईल, असे त्यांना वाटत होते.

एके दिवशीं शेटजींच्या घरीं रात्रीचीं जेवणें आटोपून पाटील व रायबा नेहमींप्रमाणें आले. आदले दिवशी पाटील तालुक्याच्या गावीं जाऊन आले होते, त्यामुळें त्याना शेटजी सहज म्हणाले, "काय खबरबात आहे, पाटील ! नवे रावसाहेब कसे काय आहेत !"

"रावसाहेब जरा तापट आहेत. साऱ्या पाटील तलाठ्याना त्यानीं ताणलं. सरकारधारा पुष्कळ गावचा फार थकलाय. कामच करायचं नको त्याना. मग वसुली कशी होणार ? " पाटील म्हणाले.

शेटजी– तुमच्यावर तर ते खूप आहेत ना ! तुम्ही गावचा वसूल तर आटोपत आणलात !

पाटील– माझ्यावर त्याची पहिल्या रावसाहेबासारखीच मर्जी आहे. माणूस तरणाबांड आहे. त्याला शिकारीची हौस आहे फार ! मीं म्हटल या एकदा आमच्या डोंगरात शिकारीला ! मी रिपोर्ट केला आहे, तो खरा कीं खोटा हेही समक्ष बघा पण ते म्हणाले, 'सध्या सवड नाही मला !'

शेटजी–कसला रिपोर्ट केला तुम्हीं ! आम्हाला तर त्याची दादही नाहीं !

पाटील– तुमचा ओढा जरा त्या भामट्याकडे. गावच्या पोराना ता देवमाणूस दिसतो. रायबालाही तसच वाटत. पण खरा प्रकार निराळा आहे. तो मुंबईचा भामट्या आहे गाव त्यानंच नासल. जिजासारख्या तरण्याताठ्या पोरीला आमच्या हातावर तुरी देऊन तो केव्हा घेऊन जाईल याचा नेम नाहीं, शेटजी ! फौजदारसाहेबही असच म्हणत होते !

शेटजी– फौजदारसाहेबाना याची काय माहिती ! आणि तो असं कर-तोय तरी काय ! देवाच नाव घेतो व चार पोराबाळाना शिकवितो. कार्टी गाय रानात भांडत व शिव्या देत हिंडायचीं ती चांगली शिकत आहेत त्यानं त्याना बुकबिकं, पाट्यापेन्सिली फुकट आणून दिल्या आहेत !

रायबा– शिरप्याबी आता वाचूं लागला है. मी म्हनत व्हतो बच्चाला तूबी लिवण शीक. पन शेटजींच्या कामात येळच मिळतुया कुठ त्येला !

बच्चा—मला शिकूनश्यान काय करायच है ! शिकावं शेटजींनीं व पाटलानीं ! आपल्याला चार गोनी इकडच्या तकड टाकायला सागा. नाईतर एकाद्याची हड्डी नरम करायला सागा !

शेटजी—पण जिजाही तेथें शिकवीत असते, पाटील. तुमच्या बबीला तुम्ही शिकविणार नाहीं का ?

पाटील—जिजाला त्या भामट्यान चवचाल बनविली आहे. एवढ्या मोठ्या पोरी रानात भटकतात वाटत! तिच्या आईला असं कसं खपत कोण जाण !

रायबा—पाटील, तुमी कायबी म्हना, जिजा अशी चागली पोर है. तुमच्या बबीलाबी पाटी आनली है तिनं !

पाटील—रायबा, तुलाही त्या भामट्याचं कसब कळल नाहीं. त्यानं साऱ्या गावचीं पोर बिघडविली. मी बबीला अस बिघडू नाहीं देणार ! देवही बाटवला त्यान. गोप्या म्हार रामाला शिवतो म्हणतात ! काय भ्रष्टाकार माडलाय त्यानं ! रायबा, तुम्हाला बघवतं तरी कस ?

रायबा—गोप्या मातर तत नग हें खर !

पाटील—मी गोप्याला आपल्या कामावर ये म्हटल, पण तो येत नाहीं म्हणतो लेकाचा !

शेटजी—त्याचीं बायका पोर नाहींत इथ वाटत ? तुमच्या कामावर आल्याशिवाय त्याच्या पोटाला कस मिळणार ?

पाटील—उपाशी मरायला लागला, म्हणजे झकत येईल कामावर ! त्याची बायको ओरडत आलीच आहे, माझ्याकड म्हणा !

शेटजी—शिरप्याच्या घरच मण दोन मण धान्य सपल कीं तोही नरम येईल, पाटील ! पावसाळ्यात सार रडत येतील माझ्याकड. त्यानं म्हैस विकलीच. आता खोड वीक म्हणावं. शेताची चावडी मीं दिली नसती तर त्याचा लिलावच झाला असता !

पाटील—तुम्हीं चावडी का भरली शेटजी ? नाहींतर कळला असता माझा इंगा त्याला !

शेटजी– त्याचं शेत माझ्याकडे आहे ना!

पाटील– सगळी घाण तुम्हीच करता, शेटजी! तुमच्यावर रागावून आम्ही सोसायटी काढली. सरकारदेण्याला पैसे लागले, कीं देतो काढून कुळाला सोसायटींतील! पण आता सोसायटीचा वसूल होतोय कुठ?

शेटजी– माझाही वसूल यंदा होत नाहीं, पाटील! सोसायटीचे हप्ते भरण्याकरिता कुळ मागतात पैसे! सावकार नको म्हणून सोसायटी काढता मग आता कशाला आमचे उंबरटे झिजविता? सोननाण असल तर आणा, मग करतो गरज, अस मी सांगतों त्याना! काय रायबा असच का नाही?

रायबा– सरकारदेन्यासाटी दानादुना इकला, सावकाराच्या येजापाई किड्डूकमाड्डूक मोडल! सुसायटीपाई गुरंढ्वार जास्याल! तगाईपाई जिमीनबी नाईल! दिस लई बंगाळ आल्याती! देवाला गरिबाची कणवबी येत नाई!

पाटील– देव तर बाटवला गोप्या म्हाराकडन! मग त्यान काय कराव?

इतक्यात फॉरेस्ट खात्यातील एक शिपाई पाटलाकडे आला. तो त्याना रामराम करून म्हणाला,

" चावडीवर कोणीच नाहीं पाटील! बश्या महार कुठ गेला तुमचा? सरकारी काम अस असत वाटतं, पाटील? कसल पाटील तुम्ही!"

पाटलाना राग आला, पण तो तसाच गिळून ते चावडीवर गेले. बराच आरडाओरडा केल्यावर तेथे जवळच खेळत असलेले एक शेबडे कळकट पोर पाटलापुढे आले व म्हणाले,

" आई गेली है गाव झाडायला मला हत बसवूनशान!"

पाटील त्या पोरावर कडाडले. त्यामुळें पळत पळत एक बाई तेथें आली. तिचें वस्त्र मळकट व अगदी फाटकें तुटकें होते. त्यामुळे ती बावरली होती. तिच्या हातात एक खराटा, कडेवर एक पोर, पाठीमागें दोनतीन पोराचे लेंढार होतें. डोक्यावरील पाटींतील शिळ्या भाकरीचा तुकडा कडेवरच्या पोराच्या हातात देत देत ती मोठ्या काकुळतीच्या स्वरात म्हणाली,

"कारबाऱ्याची पाळी है हा आटवडा चावडीपुड बसन्याची. पन त्ये गेल्याती रामाच्या डोंगरात एका गोसावड्याच्या नादान ! घरींबी येत न्हायिती ! तुमची चाकरी सोडली है त्येन. माहेरासन मी आल्यें, तवापासून पोटाला न्हाई, पाटीलसाब माज्या ! सारा गाव झाडत्ये तवा चार वाळल तुकड मिळत्याती मला ! ह्या कच्याबच्याचं प्वाट भरतय कसंतरी ! तुमी कारभाऱ्याना सोडलय म्हनूनशानी अस वगाळ दिस आल्याती आमाला पाटीलसाब ! "

त्या वेळीं त्या बाईचे तोंड गोरेंमोरें झाले पुढे तिच्या डोळयातून टपाटपा अश्रु गळू लागले. ते तिच्या वक्षस्थळाशी बिलगलेल्या बालकाला न्हाणीत होते. कित्येक दिवसात त्याला न्हाऊ घातले नसल्यामुळे ते उष्ण उष्ण अश्रुबिंदु त्याच्या मस्तकावर पडल्याने ते आपले मस्तक खाजवीत खाजवीत आपल्या आईच्या तोडाकडे करुणपूर्ण नजरेने पाहूं लागले. आईची ती स्थिति पाहून दुसरीं मुले तिच्याजवळ आलीं. त्यांनीं तिच्या कमरेला मिठी मारली. त्यामुळे तिच्या शरिराचा वस्त्राच्छादित नसलेला भाग झाकून गेला ! यामुळें तीं मुले जणू काय आपल्या आईच्या अब्रूरक्षणार्थ धावलीं कीं काय, असें वाटू लागले. आईच्या तोडाकडे पाहून तीं मुलेंही रडू लागलीं !

हा देखावा कोणाही माणसाच्या हृदयास पाझर फोडणारा होता. पाटील व तो फॉरेस्टचा शिपाई ह्याना ते दृश्य पाहून वाईट वाटले. पाटलाचा गोप्यावर राग होताच, शिवाय त्याच्या बायकोची दुर्दशा पाहून त्याना त्याचा अधिक संताप आला

त्या शिपायाची जेवण्याची व्यवस्था त्यानीं केली. त्याला जगलात तपासणीकरिता जावयाचे होते. पाटलानीं गावचीं आपल्या पुढ्यातील पाच पंचवीस माणसे जमा केलीं. महारवाड्यातील पाच दहा लोकाना सरकारी कामाकरिता म्हणून बोलावून आणलें. बचाला मुद्दाम बरोबर घेतले. त्या बाईला गायरानात गोप्याकडे पाटवून दिले. जमलेल्या लोकाना गोप्याची

हकिकत त्यांनीं तिखटमीठ लावून सांगितली. देवळाजवळील पाणी व देव बाटविण्याचें काम गोप्याकडून तो गोसावडा करीत आहे, ह्याचें त्यांनीं रसभरित वर्णन केलें. जंगलाच्या नासधुसीचा बोभाटा झाल्यामुळें शिपाई तपासास आल्याचें त्यांनीं त्यांना पटवून दिलें. तेथील पंचनाम्याकरितां व देवळाजवळ चाललेला भ्रष्टाकार बंद पाडण्याकरितां रामाच्या डोंगराकडे त्या जमावाला घेऊन ते तिकडे निघाले. देवाच्या भ्रष्टाकाराचें भडक चित्र त्यांनीं लोकांच्या डोळ्यापुढें उभें केल्यानें त्या लोकांना चांगलाच चेव आला होता!

इतकी जमवाजमव होण्यास बारा वाजून गेले गायरानाकडे चाललेला जमाव श्रीपतीला आपल्या शेतांतून दिसत होता. कपिला गाईला घेऊन जिजा नेहमींप्रमाणें गायरानांत गेली आहे, हें त्याला ठाऊक होतें पाटील व बच्चा ही जोडी मागें मागें घुटमळत चाललेली त्यानें पाहिली. तिकडे आज कांहींतरी गडबड होईल, अशी भीति त्याला वाटली. लवकरच मोट सोडून त्यानें तिकडे जाण्याचा विचार केला

गायरानांत एका वडाच्या झाडाखालीं मुलांना शिकविण्यास अरविंदानें सुरवात केली होती. दुसऱ्या एका वडाच्या झाडाखालीं मुलींना जमवून जिजा त्यांना मनोरंजक गोष्टी सांगत होती. गोप्या रामगुफेची राखण करीत होता. त्याची बायको हळू हळू वाट चालत रामकुंडापर्यंत जाऊन पोहोंचली होती.

फॉरेस्टचा शिपाई प्रथम राखीव जंगलाकडे वळला. गुराखी मुलें शिकण्यांत दंग झाल्यामुळे त्यांचीं जनावरें त्या जंगलांत शिरलीं होतीं, तीं आडवून त्यांना कोंडवाडा दाखविण्याचा हुकूम बरोबर आणलेल्या गांवच्या महारांना त्यानें केला. तेव्हां जिकडे तिकडे धावपळ सुरू झाली! जिजाची कपिला गाय कोणाच्याही हातीं न लागतां कित्येकांना लाथांचा प्रसाद देऊन तडक आपल्या घराकडे धावत सुटली! मुलांचें लक्ष तिकडे गेल्यावर तींही तेथेंच पाट्या टाकून आपापल्या जनावराकडे धावलीं! ही

धावपळ पाहून एकाद्या पिसाळलेल्या वाघाने गाभरानात प्रवेश केला, कीं काय, असें एकाद्यास वाटले असतें !

पाटील व त्याच्याबरोबरचे लोक गोप्याचा शोध करीत राममंदिराकडे चालले. गोप्या त्यावेळीं धर्मशाळेच्या पायरीवर हातात लहानसे पुस्तक घेऊन र, ट, फ करीत बसला होता. त्याच्यापुढे त्याची बायको दत्त म्हणून उभी होती. मुले त्याच्याजवळ जाऊन त्याला लगटून बसलीं होतीं. त्याची आई घरी चलण्याविषयीं पतीची मनधरणी करीत होती. इतक्यात तो जनसमूह तेथे येऊन थडकला. पाटलांनी क्रुद्ध मुद्रेने गोप्याला हट-कलें, तो "जोहार मायबाप" करून खालीं मान घालून उभा राहिला.

"तूं देव बाटवितोस त्या गोसावड्याच्या नादान! बायकापोरं उपाशी मारतोस! असं ढंग चालवितोस! सरकारी कामही मुळीच करीत नाहीस! चाकरीवर येत नाहीस! थांब तुझा चांगला समाचार घेतो!" पाटील दटावणीच्या सुरात म्हणाले.

अरविंद लगबगीनें तेथे आला. जिजाही तेथे येऊन दूर उभी राहिली. अरविंदाच्या नजरेस हा सर्व प्रकार आला. गोप्याच्या बायकापोराची ती अनुकंपनीय स्थिति पाहून तो गहिंवरला. पाटील व बच्चा यांची टकळी चाललीच होती गोप्या निमूटपणे ती ऐकत होता. देव बाटविला म्हणून त्याच्यावर जो गहजब चालविला होता, त्यामुळे त्याच्या मनाला अत्यंत दुःख होत होते. त्याचे डोळे भरून आले होते. परंतु तो जागचा हालला नव्हता. हा त्याचा धीटपणा पाहून सर्व मंडळी त्याच्यावर चवताळली. बच्चाने हातातील काठी त्याच्यावर उगारली. त्याबरोबर गोप्याची बायको पुढे झाली व रडत रडत म्हणाली,

"नकाव मारू कारभाऱ्यास्नी. मी भीक मागून कच्च्याबच्च्याची प्वाट भरीन. कुटंबी राहू द्या त्येना. देवाच्या दारीं हायती. देव राकील आमास्नी."

तिच्या डोळ्यातून घळघळ अश्रु वाहू लागले. भयकर दारिद्र्यात होरपळणाऱ्या त्या बाईची पतिनिष्ठा पाहून अरविंदास विस्मय वाटला व त्या जमावाला उद्देशून तो नम्रपणें म्हणाला,

" गोपाळाला त्याच्या बायकापोरात खुशाल न्या, पण त्यान देव बाटवला असं म्हणून त्याच्या आगावर येऊ नका. या देवळाजवळ मनस्वी घाण साचली होती. कोणी देखील ती काढीत नव्हता ! ह्या गोऱ्यान ती सर्व काढली ! दररोजची झाडलोट हा बिचारा करीत असतो, म्हणून ह्या ठिकाणची शुद्धता जास्त वाटली कुडातील शेवाळ, पालापाचोळा, गाळ व समोवतालची घाणसाण काढून ह्यान तीं वाहतीं ठेविलीं आहेत त्यामुळं कोणीही येथें येऊन लक्ष्मणकुडात स्नान करून पाप धुवून टाकावीत, रामकुडातील जलपान करून तृप्त व्हाव, अशी स्थिति ह्या गोपाळाच्या निरलस श्रमामुळ झाली आहे. तरी बधूनो, ह्याला ताप देऊ नका. "

" देवळातील झाडलोट तुमचा गोऱ्याच करीत असल नाई ! " एक आवाज तुच्छतादर्शक स्वरात निघाला.

" नाहीं, नाहीं. मुळींच नाहीं. श्रीपती व जिजा ही तीं कामे करितात. " अरविंद निश्चयी स्वरात म्हणाला.

" कुडात शिरून त्यान पाणी बाटवलं की नाही बोल, भामट्या ! त्यातल पाणी देवाला घालता, मग देव नाहीं का बाटला ! लाकडही सरकारी जगलातील तोडून आणलीं ह्या भामट्यानं आणि खोली केली धर्मशाळत ! शिपाईबोवा, बघा तुमच तुम्ही ! " पाटील तिरस्कारदर्शक मान हलवीत हलवीत हुकमी स्वरात बोलले.

" वाहत पाणी आहे, ते पाटीलसाहेब ! ते बाटेल कस ! शिवाय तो तरी माणूसच ना ! किती स्वच्छतेने वागतो, हें तुम्ही पाहा ! जरी तो देवळात गेला, तरी देवच शुद्ध होईल ह्याच्या पूजेअर्चेनं ! इतकी त्याची वागणूक पवित्र आहे. चार दिवस एकातवासात घालवावे, म्हणून मी येथ आलों. मी येथे बेकायदा वागेन कसा ! धर्मशाळेतील लाकडे श्रीपतीची

आहेत. जंगलातील नाहीत. पाटीलसाहेब, मी भामटया नाहीं. तुमच्या गावचीं मुलबाळ जमतात गायरानात. त्याना लिहिण्यावाचण्यास शिकवितों मोकळ्या वेळात. हें काहीं वाईट करीत नाहीं ना ? तेव्हा गोपाळावर व माझ्यावर लोभ ठेवा, एवढीच हात जोडून माझी तुम्हाला प्रार्थना आहे. ''

अरविंद खरोखरच हात जोडून उभा राहिला.

सर्व समाज काही वेळ तटस्थ होता.

पाटलाने शिपायास व बच्चास खूण केली, व ते म्हणाले,

" बघा, कसा गोसावडा बोलतो तो ! शिरप्यानं आणिलीं असतील लाकड जगलातलीं ! आपण मात्र नामानिराळा ! शिरप्या लुच्चा व हा सात लुच्चा ! करा शिपाईबोवा लाकडाचा पचनामा ! '' शिपायाकडे हात करीत तुसडया स्वरात पाटील बोलले.

बच्चाने खोली मोडून लाकडें बाहेर काढण्यास आरभ केला. अरविंद स्वस्थ उभा होता. पाटीलच पंचनामा लिहू लागले. आतील बाजूस इंग्रजी पुस्तके व वर्तमानपत्रे पाहून शिपाई मात्र चरकला. पण एका बाजूस धुतलेल्या केशरी पातळाची घडी पाटलाच्या नजरेत आली ! पाटलाना मनात अत्यत हर्ष झाला ! ते पातळ काठीने बाहेर फेकून पाटील जोरानें म्हणाले,

" बघा हा भामटा आहे कीं नाहीं ? खोलीत ह्याला लुगडं कशाला ! ''

त्या वेळी जिजा पळत पळत विटाईने पुढे आली व म्हणाली,

" मीं वाळवून ती घडी तिथ ठेविली आहे. ''

त्यावेळीं तिचा चेहरा रागाने लाल झाला होता. ती वाघिणीसारखी क्रुद्ध नजरेने पाटलाकडे पाहू लागली. पाटील चवताळले व ओरडले,

" गप्प बस कार्टे ! आहे ठाऊक मला सगळ ! ''

नतर लोकाना उद्देशून ते म्हणाले,

"सोनगावची अब्रू जाते आता. गोप्या महारान देव बाटविला. ह्या भामटयान गाव नासल. द्या पिटाळून याला ! गावची कीड तरी जाईल एकदाची ! ''

बच्चाने अरविंदावर काठी सरसावली. अरविंद शांत चित्ताने हात जोडून उभा होता. जिजा रडू लागली बच्चाची काठी आता त्याच्यावर पडणार, इतक्यात एक धिप्पाड तरुण धावत आला. त्याने ती काठी वरचेवर पकडली. ती आपल्या हातात घेऊन तो म्हणाला,

" पुढे येण्याची कोणाची माय व्याली असेल, त्यान यावं पुढ ! "

त्या तरुणानें क्रुद्ध नजरेनें सर्वांकडे नजर टाकली. बच्चा हातपाय गाळून मागे परतला. पाटील दात ओठ खाऊं लागले, पण तोंडातून शब्द काढण्याची त्याची छाती होईना ! शिपायाला ह्या प्रकरणात आपली नोकरी जाईल, कीं काय, असे वाटून तो तडक ते ठिकाण सोडून जाऊ लागला ! असा रागरंग पाहून बाकीच्या समाजानें काढता पाय घेऊन रस्ता गाठला. आकाशात गडगडाट व्हावा, वीज चमकावी, काळेकुट्ट मेघ अवतीर्ण व्हावेत, पण अशा वेळीं झंझावात सुटून मेघाची जिकडे तिकडे पांगापांग व्हावी, अशी स्थिति तेथें जमलेल्या लोकांची झाली !

त्या तरुणाची ती निश्चयी मुद्रा, हुकमी स्वर व मर्दानी आविर्भाव पाहिल्याबरोबर जिजाचा चेहरा खुलला. तिच्या गालावर लाली चढली व तिची दृष्टि त्या तरुणाकडे खिळून राहिली.

## प्रकरण आठवें.

# पतिपत्नी मूर्छित ?

ती भर दुपारची वेळ. राधाबाई आपल्या मळ्यातील बकुळीखालीं बसल्या होत्या. वृक्षाच्या बुंधाजवळ एका टोपलींत श्रीपतीचें दुपारचें जेवण त्यानी आणून ठेविले होते. श्रीपतीची मोट चालू होती. तो वृक्ष फुलाफळांनीं बहरलेला होता फुलाचा सुवास सर्वत्र दरवळलेला होता. मोट भरून वर आली, कीं तीतील पाणी कुर्डीत पडे, त्या वेळीं सभोंवतालीं जलतुषार उडत असत. मधून मधून इंद्रधनुष्याची मनोहर छटा त्यात उमटलेली दिसे. वायुलहरींनें ते तुषार कित्येक वेळी बकुळीच्या वृक्षापर्यंतही पोहोंचत असत. त्यामुळे त्या वृक्षाखालीं बसलेल्याना जणूं काय पंख्यावर पाणी शिंपडून त्याने आपण वारा घेत आहोत, असें वाटे !

सकाळपासून केलेल्या कष्टामुळे राधाबाईंना थकवा आला होता, त्यामुळे बकुळीच्या शीतल छायेत त्या आडव्या झाल्या. त्याच्याकरिता बकुळीने आपल्या पानाफुलाची मृदु शय्या पसरून ठेविलेली होती. श्रीपतीचे बैलाना उत्तेजनपर गाणें चालू होते. मोट भरून वर येत असता मोटेच्या चाकाची तालबद्ध घरघर त्या गाण्याची साथ करीत होती. उन्हाच्या तापानें सतप्त झालेले पक्षीगण बकुळीच्या आश्रयास आले होते. त्याची मधून मधून कर्णमधुर किलबिल चालू होती. अशा त्या आनंदी वातावरणात राधाबाईचा डोळा चट्कन लागला.

गायरानाकडे चाललेला जनसमूह पाहून तिकडे जावें, असा विचार श्रीपतीच्या मनात आला. दहा पधरा वाफे भिजले, कीं मग निघावे, असे त्यानें ठरवून मोट चालविली होती. पण इतक्यात कपिला गाय छपरीच्या

रोखाने चौखूर धावत येत असलेली त्याला दिसली. त्याबरोबर त्यानें मोट सोडली, अंगात पैरण घातली, फेटा काखेंत मारला व गायरानाकडे धूम ठोकली !

राधाबाईना हा प्रकार कळला नाही. त्याना झोप लागलेली होती. त्या माउलीच्या शरीराचा आता फक्त अस्थिपंजर शिल्लक उरला होता. तिचा पति बंदीखान्यात पडल्यापासून तिच्या डोळ्यातील अश्रूना खळ पडलेला नव्हता. त्यामुळे तिच्या दृष्टीस मदत्व आलें होते पाच सहा वर्षांपूर्वीच्या अश्रूनें व आनदाने गेलेल्या दिवसाची तिला क्षणोक्षणीं आठवण होई.

तिचे सध्याचे दिवस मोठ्या कष्टाचे होते मोठ्या पहाटेस उठावे, दळण दळावे, शेणगोटा करावा, भाकरी भाजाव्या, शेतात जाऊन कामधदा करावा, जनावराच्या वैरणीची तरतूद करावी, सरपणाकरिता काट्याकुट्या जमा करून आणाव्या व पुन्हा सायकाळीं स्वयपाक करावा. पिठास मीठ नाहीं, दिव्यास तेल नाही, अगास वस्त्र नाही, अशा स्थितीत दिवस कंठावे, आणि हे सारें करिताना आपल्या पतीची मूर्ति डोळ्यापुढे ठेवून त्याना होत असलेल्या यातनाची मनात कल्पना आणून एकसारखें हळहळावे व हृदयात उचबळून येणाऱ्या दुःखाच्या उद्रेकाने येणारे अश्रूचे लोट आपल्या हाताच्या मनगटानीं पुशीत असावे.

श्रीपती हा त्याच्या शेजाऱ्याचा मुलगा. ह्याच्या वडिलाचा व सखारामाचा अत्यत लोभ होता. त्याच्या वडीलमातुश्रीच्या निधनानतर गेलीं पाच सहा वर्षं हा राधाबाईच्याजवळ राहात असे. तो त्याच्यावर आईप्रमाणे प्रेम करीत असे. त्याच्या शेतीभातीला कोणाचा तरी आधार जरूर होताच, त्यामुळे सकटकाली उपयोगी पडणारा हा मुलगाच आपणास परमेश्वराने दिला, अशी त्याची समजूत होती.

त्याला तालमीचा नाद असल्यामुळे त्याचा बहुतेक वेळ सवगड्याबरोबर जात असे. शेताची मेहनत मशागत तो जेव्हा करी; तेव्हा तो दोन तीन गड्याचें काम एकटाच करून टाकी. नाहीतर कित्येक दिवस

कामाकडे ढुंकूनही पाहात नसे! त्याच्या खाण्यापिण्याकरिता दोन्ही शेतातून जें काय येई तें पुरें पडत नसे, म्हणून शेटजींची उचल नेहमीं करावी लागे. देण्याचा बोजा आपल्यावर किती वाढत चालला आहे, ह्याची फिकीर त्याला वाटत नसे. राधाबाईच्या चिंतेंत त्यामुळें भरच पडे. पण ती साध्वी त्याला एका शब्दानेही दुखवीत नसे. स्वतः कष्ट करून ती खर्चास कसा तरी मेळ घाली. श्रीपतीला टोलेजग जवान बैल, दुभती भरदार म्हैस, खिलारी धष्टपुष्ट गाय, इत्यादि जे पाहिजे असेल, तें घेण्यास तिनें कधीं मनाई केली नाहीं

जिजा आल्यापासून राधाबाईची वृत्ति थोडी आनदी दिसू लागली. तिच्या बुद्धीची चलाखी, विद्या संपादण्याची हौस व विनय इत्यादि सद्-गुणामुळे त्याचे अतःकरण कौतुकाने उचबळत असे. खेडेगावच्या परि-स्थितीत तिचे लग्नाचे वय टळून गेले असले, तरी त्याना त्याची तितकीशी फिकीर वाटत नसे. पतीवर ओढवलेल्या आपत्तीमुळें त्याचे मन लोकाप-वाद सहन करण्यास पाषाणाप्रमाणे कठिण झाले होतें. अरविंदाच्या आग-मनापासून श्रीपतीस चागले वळण लागू लागले आहे व त्याला विद्येची गोडी लागली आहे, हे पाहून अलीकडे त्याच्या मनाला हुरूप वाटू लागला त्यामुळे आपल्या पतीची सुटका केव्हा होईल, ह्याची त्या रात्रं-दिवस वाट पाहात होत्या. कारण त्याच्या सुटकेनतर श्रीपतीला जिजा द्यावी व आपले असेल नसेल ते त्याच्या स्वाधीन करावे व नतर देवाघरी सुखाने जावे, असे त्याच्या भावड्या मनाला वाटे.

त्या दिवशीं हेच विचार त्याच्या मनात घोळत होते बकुळीच्या शांतिल छायेत त्याना झोप लागलेली दिसली, तरी त्याचें मन पतीच्या शोधार्थ भटकत होते. त्या स्वप्नस्थितीत त्याना विलक्षण आनंद होत असावा, असे त्याच्या स्मितयुक्त मुखचर्येवरून दिसत होते. त्या वेळीं त्या तापसीचे मनोरथ पूर्ण व्हावेत म्हणूनच कीं काय, पक्ष्याच्या हालचालीने त्याच्या-वर बकुळीच्या सुवासिक फुलाचा वर्षाव होत होता! त्या रम्य स्वप्नसृष्टींत

आपले पति बंदीखान्यातून सुटून घरीं आले आहेत, आपण व जिजा ह्यानीं त्याचे आग चोळून त्याना स्नान घातले आहे, नतर गूळ-भाताचे सुग्रास भोजन चालले आहे, जिजा व श्रीपती याची जोडी पाहून उभयताच्याही मनात तिच्या विवाहाचा विषय आला आहे, जिजा मुंबई-तील आपल्या अनुभवाच्या गोष्टी सागून सर्वांना आनंद देत आहे; तिच्या लग्नाचा मुहूर्तही ठरविण्याचा कारभाऱ्याचा निश्चय झाला आहे, असे तिला वाटत होते. त्यामुळे ती अत्यंत आनदित झाली होती. पण अशा त्या आनदी स्थितींत एक काळपुरुष झोपडीपुढे येऊन दत्त म्हणून उभा राहिला व तो श्रीपतीवर आपला पाश टाकूं लागला, त्यामुळे ती दचकली व एकदम जागी झाली. इकडे तिकडे पाहाते तो काय ! ती सारी स्वप्न-सृष्टिच होती, हे तिच्या लक्षात आले. तिच्या घाबरलेल्या मनास क्षणभर बरें वाटलें. तिने सभोवतीं नजर टाकली. श्रीपती तेथे नाहीं, मोट सुट-लेली आहे, बैल डरकाळ्या फोडीत ओढ्याकाठी उधळत आहेत, कपिला गाय बकुळीच्या झाडाखालीं उभी आहे व तिने श्रीपतीचे जेवण फस्त केले आहे, असें तिला दिसले.

कपिला गाय अवेळी आलेली पाहून जिजाविषयीं तिला काळजी वाटूं लागली. स्वप्नसृष्टींतील संकट आज तिच्यावरच कोसळलें कीं काय, असे वाटून तिचे हळवें हृदय भरून आले. इतक्यात धावत धावत जिजा तेथें आली. तिचें आनदी मुखकमल पाहून राधाबाईना बरें वाटले. त्यानीं इडा पिडा टळो म्हणून आपली दोन्ही हाताचीं बोटे कानशिलावर मोडलीं. तिला जवळ घेतलें व प्रेमानें कुरवाळीत त्या म्हणाल्या.

“ जिजे, अशी धावात का म्हन आलीस ? गाय पळूनशान आली म्हनून व्हय ? शिरप्या कुट हे ? उनातानाच कुटं जाऊं नगस बरं !”

“ आई, मला कांहीं झाल नाहीं बरं ! उगीच काळजी करूं नकोस. रामाच्या धर्मशाळेंत मात्र आज घनचक्कर उडाली ! मेले जमाव करून आले होते, पण बापाची नजर गेल्याबरोबर जशा शेळ्या मेढ्या उधळतात, तशी

त्याना पळता भुई थोडी झाली!" जिजा आनंदाने बेहोष होऊन बोलली.

"जिजे, तूं काय म्हनतेस! मला कायबी कळत नाई. साग तरी संमद रामाच्या धरमशाळंत काय झालं त्ये! शिरप्या कुटं है! कुटं दाडगावा केला काय त्येन? पोरी बोल कीं लवकर!"

राधाबाई घाबरेपणाने विचारूं लागल्या. जिजाला त्याच्या शब्दाचे कौतुकच वाटत होते. श्रीपतीच्या धैर्याचा तिच्या मनावर आज विलक्षण परिणाम झाला होता. रामचद्रानीं धनुर्भंग केल्यावेळी सीतेला जसा आनंद झाला होता, तशा प्रकारच्या आनदाचा स्वाद ती आज चाखीत होती. त्यामुळे रामाच्या धर्मशाळेजवळ घडलेली हकिकत तिने आपल्या आईस मोठ्या उल्हासाने सागितली.

ती सर्व हकिकत ऐकून राधाबाई म्हणाल्या,

"मंग शिरप्या आला नाई अजून!"

"तो धर्मशाळेतली खोली दुरुस्त करतो आहे. मी पण मदत करीत होते त्याला. पण अरविंददादा मला म्हणाले, 'जिजा, तूं घरीं जा. तुझी आई काळजी करील. म्हातारी अगोदरच दुःखाने होरपळून गेली आहे."

"बाळ, त्या परक्या मानसाला माज्यासारक्या गरिबाची केवडी कणव बर! त्येला देवमानूस म्हनत्याती त्येच खर!"

"आई, काय सागूं तुला! कोणाही माणसाला दुःखीकष्टी पाहून दादा गहिंवरतात. गोप्याची बायको व त्याचीं उघडीं नागडी पोरं पाहून त्याना फार वाईट वाटल. आपल्या हातान त्या पोराबाळाना त्याची आई नको नको म्हणत असता, त्यानीं आघोळ घातली. त्याच अंग पुसलं. आपलं धोतर फाडून त्याचे तुकडे त्याना पाघरायला दिले!"

"अग, हे समद खरं, पन आईबाप निर्मळ राहत्याल, तर पोरंबाळंबी तशी राहात्याल! संमद्या गावची घान ती बया काडत्ये. तिच्या वस्तींत पानीबी नाई. कुटनं तिन आगावर पानी घ्यावं, जिजे?"

"आई, हेही खरच आहे. तिच्या मनात अंग धुवावं, असं आलं.

लक्ष्मणकुंडातल वाह्त पाणी बघून ती आनदली ! पण आग धुऊन नेसाव तरी काय तिन ? आई, तूं रागावू नकोस. मी तिला म्हटल, ‘ आग धू बाई. मी देते तुला नेसायला ’ ! ”

“ जिजे, तूं गुनाची पोर हैस. पन आपलबी दीस बर कुट हायती ! सुडक तरी कुट मिळतय आपल्याला ! चिमान दोन साडया घेतल्या म्हनून तू आगभर लेतेस तरी ! देवानं बर दीस दावलं म्हंजे कायबी दे गरिबाला ! ”

“ आई, मी आपलं पातळ दिल तिला. त्यामुळ दादाना बरं वाटलं आणि ते म्हणाले, ‘ चागल केलस जिजा ! ’ मलाही त्या पातळाचा राग आला होता फार. म्या मेलीन वाळवून त्याची घडी ठेविली होती धर्म-शाळेत. पण त्या दावेदारान पराचा कावळा करून तो दादाना नाहीं नाहीं तें बोलला. मेल्याच्या जिभेला हाड नव्हतं बोलताना ! गावचा पाटील झाला म्हणून काय झाल आई असं वेडेवाकडं बोलाव का त्यान ? ते त्या पातळाच पाप त्या बाईला देऊन टाकून मी नाहींसं केल ! ”

“ जिजे, तू ते पाताळ पाप म्हनूनशान त्या बयाला दिलंस, हे वंगाळ झालं. पाप आपलं आपून नाहीस कराया होवं ! दुसऱ्याला देऊनशानी ते कस जानार ? ”

आईचे हे शब्द ऐकून जिजाच्या डोक्यात नवा प्रकाश पडला. आपल्या आईला लिहिता वाचता येत नाहीं, म्हणून ती अडाणी आहे, असें आपण समजत होतों, परतु तिचे ते विचार ऐकून नुसत्या लिहिण्यावाचण्यानेच माणूस सद्गुणी होतो असे नाहीं, असें तिला पटले व ती म्हणाली,

“ आई, माझ चुकलं खरं. चार पुस्तकं मी वाचते, पण अद्याप मला काहीं कळत नाहीं. चुकलें मी ! ”

“ अग, तुझं चुकल कसल ? मी काय अडानी ! मला काय समजतया ? पन आता तुला नवं सुडक घेतल पाहिजे मला. शेटजीचं ऋन चार रुपय केलं पाहिजं आता ! ”

" आई, तूं काळजी करूं नकोस. दादा म्हणतात, ' मी पातळ आणवून देईन लवकरच. ' "

" वेडे पोरी, धरमाच कुनाच घेऊ नये. आपल बावट खबीर हायतीना ! कस्ट करावं. देव देईल तें खाव, प्यावं, ल्यावं. तेबी असंच म्हमत असत."

राधाबाईस पतीची आठवण झाली. त्याच्या नेत्रात अश्रु तरंगू लागले. जिजाला आपल्या आईबापाच्या मोठ्या मनाची स्पष्ट जाणीव झाली. ती आपल्या आईच्या माडीवर डोके ठेवून कलडली. काहीं वेळ दोघीही स्तब्ध होत्या. इतक्यात राधाबाईची नजर रस्त्याकडे गेली. गोप्या, त्याची बायको व पोरे गावाकडे चालली होती. जिजाने दिलेले पातळ गोप्याची बायको नेसली होती. पोरे उड्या मारीत मारीत मधून मधून रस्त्यावरील धूळ उधळीत होती. गोप्या त्याच्यामागून काठी टेकीत टेकीत चालला होता.

इतक्यात श्रीपती धावत येत असलेला त्याना दिसला, तेव्हा त्या म्हणाल्या,

" जिजे, ऊट आता. शिरप्या येतुया. त्येला भाकर कोरड्यास केल पाहिजं. गाईन त्याच जेवन फस्त केलंय. "

" आई, माझी भाकरी मीं खाल्ली नाहीं अजून ! ती आम्ही थोडी थोडी खाऊं. मीच आज लवकर स्वयंपाक करीन, म्हणजे झालं ! "

इतक्यात श्रीपती तेथे येऊन पोहोचला. त्याच्या आनंदी मुखकमलाकडे पाहून जिजानेंही मंदस्मित केलें व आपली शिदोरी त्याच्यापुढें ठेविली. त्या दोघानी तिचा तेव्हाच फन्ना उडविला. राधाबाई मोठ्या कौतुकाने त्याची ती लीला अवलोकन करीत होत्या. जिजानें तांब्या भरून विहीरींतून ताजें पाणी आणिले. श्रीपतीने ते पिऊन समाधानाची ढेकर दिली. खरोखर आज जिजाच्या प्रेमी मनाची धावपळ पाहून त्याचें मनच उल्हासी बनलें होते. त्यामुळे एवढ्याशा जेवणानेंही पोट भरल्याचा त्याला भास झाला. प्रेमापुढें तहानभूक हरून जाते असे म्हणतात, ते काहीं खोटें नव्हे.

पण त्याची खरी भूक तेवढ्यानें भागणारी नव्हती. त्या वेळीं पक्ष्यानीं टोंच्या मारून गाभुळलेले बकूळ त्याच्यापुढे पडले. त्याने वर पाहिलें.

बकुळीच्या उंच शेंड्यावर राघूंची हालचाल त्याला दिसली. त्या ठिकाणीं पक्व फळें असावींत, हें त्यानें ताडिलें. तो त्या झाडावर चढूं लागला. थोड्याच वेळात त्यानें शेंडा गाठला. त्या ठिकाणीं लालबुद झालेले जे बकुळ सापडे, तें तो खालीं जिजाकरिता टाकी. दुसरें जे हातास येई, तें आपल्या तोंडात टाकी. मधून मधून तो खालीं जिजाकडे नजर फेकी. दोघाची नजर एक झाली म्हणजे त्याच्या हृदयात एक अननुभूत आनंदाचा तरंग उठे. अशा प्रकारें बकुळाचा स्वाद मनमुराद चाखण्यात काही वेळ गेला.

ते प्रखर उन्हाळ्याचे दिवस असल्यामुळे दुपार उलटून गेली, कीं केव्हा केव्हा भयंकर वादळ उत्पन्न होई. त्यामुळे उत्पन्न झालेला शंका-कृति गरगर फिरणारा धुळीचा लोट आकाशास भिडे. त्या वेळीं दूर अंतरा-वर तशी स्थिति असल्याचें श्रीपतीस दिसलें. त्या वायधुळींत दोन व्यक्ति सापडून त्यापैकीं एकाची मोडकी तोडकी छत्री उडून गेली. पुढे त्या दोन्ही व्यक्तिही त्या धुळींत लुप्त झाल्या. रायबा परगावी गेला होता, तोच परत येत असताना वादळात सापडला असावा, असे त्याला वाटलें. पण त्याच्याबरोबर दुसरी व्यक्ति कोण असावी, हे त्याच्या लक्षात येईना.

इतक्यात त्या वादाळाचा रोंख बदलला. झाडाचा शेंडा जोराने हेल-कावे खाऊ लागला, हे पाहून त्यास खालीं उतरण्याबद्दल राधाबाईनीं मोठ्यानें सांगितलें. त्याच वेळीं एक लालबुद बकुळीचा घोस त्याच्या नज-रेस पडला. तो अगदीं शेंडयावर होता. तो झटदिशीं काढून तीं मधुर फळे खिशात भरून खालीं उतरावे, असा विचार झट्कन त्याने केला. वाऱ्याचा जोर वाढू लागला. त्या वृक्षाची फांदी न् फांदी इतकी विलक्षण हालूं लागली, कीं तो वृक्षच मुळासकट उमळून खालीं पडतो, कीं काय असें वाटूं लागले. श्रीपती अद्याप उतरला नाहीं, हे पाहून जिजाचें हृदय खालींवर होऊं लागले. इतक्यात वावटळ तेथें येऊन पोहोंचली. धुळीनें राधाबाई व जिजा ह्यांना डोळे मिटावे लागले. वृक्षाखालून उठून त्या दोघी दूर होतात, तोंच कडकड असा मोठा आवाज त्यांच्या कानीं आला

व वृक्षाची एक मोठी फांदी मोडून जमिनीवर आदळली. त्या वेळीं दोघींच्या अंतःकरणात चर्रर्र झाले !

*　　　*　　　*

इकडे दूर अंतरावर ज्या दोन व्यक्ति श्रीपतीस दिसत होत्या, त्यापैकीं एक रायबा होता. तो त्या दुसऱ्या व्यक्तीस मोठया आर्जवाने त्या बकुळी-च्या शेताकडे घेऊन येत होता. धुळींत उडालेली छत्री आणण्यास रायबा गेल्याबरोबर ती व्यक्ति गुडघ्यात मान घालून खालीं बसली. रायबा आल्यानंतर मोठ्या मुष्किलीने त्या व्यक्तीस त्याने उठविलें. ते दोघे चालू लागले. उन्हामुळे व मनात होत असलेल्या कालवाकालवीनें एक पाऊल उचलणेही त्या व्यक्तीच्या जिवावर आले होतें. नागरटीच्या शेतातून चालत असता पदोपदीं ते ठेचाळत होते. रायबा त्या व्यक्तीचा हात धरून चालला होता. तो म्हणाला,

" बाबा, आपल्या जल्मात अशाच ठेचा खात दिस काडाव लाग-त्याती. दम सोडून कस भागल ! "

" पन, रायबा, ठेचा खात असता जीव घाबरा व्हतो रे ! म्हनून देवा-घरीं लवकर जाव, असं माज्या मनाला लई वाटत ! "

" काय म्हनता, बाबा, देवान जल्म दिलाय कशाकरिता ? "

" आपलं पाप भोगन्याकरिता. मेल की सारं गेल ! "

" तस नव्ह बाबा. शेतकऱ्याना बळीराज म्हनत्याती ना ? देवाच नाव घेत घेत आपलं ध्यात पिकवाव. आल्यागेल्याना व गोरगरिबाना मूटभर द्याव. पृथिमीच्या पाठीवर बळीराजासारका मोटा कोन है ! बाबा, उगाच वैताग कशापाई करून घेता ? "

" रायबा, अब्रून दीस काडनारा मी. रामरायाच्या किरपेन मला काय कमी व्हतं ? पन माजी इटबना झाली ना ? मग कसं घरीं चलाव म्हन-तुयास ? मी जात व्हतो नरसोबाच्या वाडीला डोहात उडी टाकायला ! तू मला उगाच धरूनशानी आनलंस. "

“ पन सोन्यासारखी पोर तुमाला है ना ! भारी गुनाची हाय पोर ! बोलती काय, वाचती काय, लिवती काय ! जनु सारजाच दिसती मला. तिला आपल्या डोळ्यादेकत उजवा, मग कुटंबी देवाच नाव घ्यायला जा !”

ती व्यक्ति म्हणजे ठाण्याच्या तुरुंगातून सुटलेला सखारामबाबा होय. त्याची तुरुंगातील वागणूक उत्कृष्ट असल्यामुळे त्याला त्याची मुदत भरण्यापूर्वी मुक्त केले होते. सोनगावास जाता येईल अशा स्टेशनचे तिकीट काढून देण्याची व्यवस्थाही त्या दयाळू जेलरने केली होती. स्टेशन-वर उतरल्यानंतर सोनगावला जाऊ नये, असे त्याला वाटू लागले. तो इकडे तिकडे भटकूं लागला. त्या वेळी सोनगावी येत असलेल्या रायबाची नजर त्याकडे गेली. आपल्या शेजाऱ्यास त्याने ओळखले. त्याची समजूत घालीत घालीत तो त्याला सोनगावास घेऊन येत होता. जसजसे ते आपल्या शेता-जवळ येऊ लागले, तसतसा सखारामाचा पाय जड पडू लागला. त्याच्या मनाला अत्यंत दुःख होऊ लागले. तो चार दोन पावले गेला, कीं मटकन् खालीं बसे. तशात ते बायधुळींत सापडल, त्यामुळे तर त्याचें मन अत्यत उद्विग्न झाले. रायबाच्या नेटाने तो कसा तरी पाय उचलीत होता. राय बाला सखारामाची भेट अचानक झाल्यामुळें आनद झाला होता. जिजा-सारखी गुणी पोर चिमाच्या हेतूप्रमाणें जर आपली सून झाली, तर बचाचे नशीब चागलें उजळेल, असे त्याला वाटत होतें. त्यानें ओघाओघानें सखारामाला त्याच्या घरची सर्व हकिकत सागितली. आता बोलताना तो जिजाची खूप स्तुति करीत होता. त्यामुळे सखारामाला थोडे बरें वाटलें. ते आपल्या शेताजवळ आले, त्याच वेळी बकुळीची फादी मोडली. श्रीपती त्या उंचीवरून खालीं आदळता तर त्याची धडगत नव्हती. त्यानें चला-खीनें क्षणात खालच्या फांदीवर उडी मारली, पण तीही त्याच्या हातची निसटल्यामुळें वृक्षाखालीं बसलेल्या कपिला गाईच्या आगावर तो आदळला. ती गाय ताबडतोब उठून उधळली व तो खालीं पडला. तेव्हा किंचित् काल तो बेशुद्ध झाला !

वावधूळ गेल्याबरोबर जिजा त्याकडे धावली. त्याला तशा स्थितींत पाहून घाबरेपणाने तिने आईला हाक मारली. दोघींच्या डोळ्यातून गंगा-यमुना वाहूं लागल्या. तशात जिजाने समयसूचकतेने त्याच्या तोंडात पाणी घातले. हळूहळू तो सावध होऊं लागला.

त्याच वेळीं रायबा व सखाराम मोटेच्या धावेवर येऊन पोहोचले. सखारामानें सभोवती पाहिलें. त्याने मोठ्या कष्टाने लावलेले आम्रवृक्ष कसे तरी जीव धरून आहेत, तालीतुलीकडे दुर्लक्ष झाल्यामुळे ठिकठिकाणीं जमीन वाहून गेली आहे, विहिरीच्या कड्याचा कांहीं भाग ढासळलेला आहे, मात्र आपल्या शेजारच्या जमिनींत बळी पाटलाचा ऊस डौलाने डोलत आहे; ह्या सर्व देखाव्याने त्याचें मन अधिकच विषण्ण झाले.

इतक्यात रायबाने जिजाला हाक मारली. तिने मोटेच्या धावेकडे नजर टाकली. श्रीपती आता सावध झाला होता. त्यामुळें तिची मनस्थिति काहीशी ठिकाणावर आली होती. रायबाबरोबर एक वृद्ध गृहस्थ आहेत असे तिला दिसले. थोडी मान वळवून त्या वृद्धाकडे तिने कांहीं वेळ एकसारखें पाहिले. "आई, बाबा आले ग आले !" असें म्हणत तिनें धावेकडे धूम ठोकली. राधाबाईही तिकडे वळल्या. सखारामाची नजर त्याच्याकडे गेली. जिजानें पुढे जाऊन "बाबा" म्हणून त्याच्या पायावर मस्तक ठेविले. राधाबाई धावत तेथे येऊन पोहोंचल्या. त्याची ती अवस्था पाहून सखारामाच्या डोळ्यापुढें अंधारी आली. त्याचा तोल गेला व तो धप्पकन् धावेवर मूर्छित होऊन पडला ! राधाबाईनीं ही स्थिति अवलोकन केल्याबरोबर त्याच्यावर दुःखाचा पडलेला ताण असह्य होऊन त्याही तेथेच मूर्च्छित होऊन पडल्या !

---

## प्रकरण ९ वें.

# शेटजींच्या घरीं !



रामगुंफेत घडलेल्या प्रकारामुळे अरविंदाचे मन गेले सात आठ दिवस उदास होते. सायंकाळीं तरुणाना शिक्षण देण्याच्या कामात मात्र खंड पडला नव्हता. पण शिकणाऱ्या तरुणाची संख्या घटत चालली होती. ह्याचें कारण श्रीपतीला पाचसहा दिवस तिकडे जाता आले नाहीं, हे एक होते. तो झाडावरून पडला, तरी त्यास विशेषशी इजा झाली नव्हती, पण सर्वांग आदळल्यामुळे चार पाच दिवस त्याने अगदीं पडून राहावें, असें अरविंदानें त्याला बजावलें होते. त्याची शुश्रूषा जिजा करीत होती. त्यामुळें तिच्या गोड सहवासात त्याने आणखी दोन दिवस आजाराच्या मिषानें काढले. त्याच्या स्नेह्यासोबत्याचा शिक्षणाचा उत्साह मात्र ओसरूं लागला. एक नवीन गमत म्हणून प्रथम प्रथम ते जितक्या उत्साहानें जमत होते, तितका उत्साह त्याचा आता राहिला नव्हता. शिवाय गावातील गप्पाष्टकाच्या चवाठ्यावरील अरविंदासबंधाचे तर्ककुतर्क त्याच्या कानीं पडत, त्याचाही परिणाम त्याच्या गैरहजेरींस थोडाबहूत कारण झाला.

गायरानातील दुपारच्या शिक्षणक्रमातही शिथिलता आली. मोकाट भटकून मन मानेल तसे वागणाऱ्या मुलाना शिक्षणाच्या बंधनाने आपले स्वातंत्र्य थोडे कमी होतें असें वाटूं लागले, मुलींचाही शिक्षणक्रम चालू नव्हता, कारण जिजाला तिकडे जाण्यास मुळीं फुरसत नव्हती. तिच्या आईबापाची अत्यंत अनुकंपनीय स्थिति झाली होती. ते उभयता मूर्च्छेतून नाना उपायानीं सावध झाल्यानंतर अगदीं गळून गेले होते. त्याची

सेवाचाकरी करण्यात तिचा सगळा वेळ जात असे. श्रीपती हिंडूं फिरूं लागल्यापासून तिची एक काळजी कमी झालेली असली, तरी आईबापाची प्रकृति सुधारण्यास कांहीं काळ लागणार होता. वडिलांच्या आगमनाच्या झालेल्या आनंदामुळे हसतमुखाने ती सर्व कामे उरकी. त्यांच्या गोड शब्दांनीं तिला इतका हुरूप चढे, कीं ती कोणासही इकडची काडी तिकडे करण्याचे श्रम पडूं देत नसे. अशा स्थितींत तिच्या आवडीचें शिक्षणाचे काम तिला करण्यास मुळीं वेळच सापडत नव्हता.

तेथील नैसर्गिक निर्मल हवापाण्यामुळे व सृष्टिसौंदर्यामुळें अरविंदाला तें ठिकाण अत्यंत प्रिय झालें होतें. कसलाही व्याप पाठीमागें लावून न घेणाराला ईशचिंतनात काळ घालविण्यास ते ठिकाण अगदीं योग्य होतें. पण तसा काळ त्याला घालवावयाचा नव्हता. " हे करावे का तें करावें " असा त्याच्या मनाचा जो घोटाळा होई, तो घालवून, त्याला विचारपूर्वक जनसेवेचा मार्ग आखावयाचा होता. मनाची स्थिरता असल्याशिवाय अंगिकारलेल्या कार्यांतील अडचणींना तोंड देता येत नाहीं, मन खंबीर बनत नाहीं, हें त्याला पटल्यामुळे चित्त स्थिर करण्याकरिता त्याला पटलेल्या योगाचा अभ्यास तो एकांतस्थळीं प्रातःकाळीं मोठ्या नेटाने करी.

खरी जनसेवा म्हणजे खेड्यांतून विखुरलेल्या जनतेची सेवा होय, हें त्याचे मत आता अगदीं ठाम झाले होतें. त्याच्या अपेक्षेप्रमाणे तींत यश येण्याचें चिन्ह दिसेना. म्हणून त्याचे मन थोडे उदास झालें असलें, तरी अडचणींतून मार्ग निघणारच, असें त्याचें अंतर्मन त्याला ग्वाही देत होते. खेड्यांतील लोकांच्या मनःस्थितींचें, त्यांच्या चालीरितींचे, त्यांच्या भावनांचे, त्यांच्या अडीअडचणींचे सूक्ष्म निरीक्षण केल्याशिवाय तेथें कार्य करिता येणार नाहीं, अशी त्याच्या मनाची जास्त जास्त खातरी होत चालली. टिकाऊ कार्य थोड्या अवधींत होणारें नसते. त्याला कांहीं काळ जावा लागतो. पण चिकाटी मात्र सोडता कामा नये, हें तत्त्व त्याच्या मनावर पूर्णपणे ठसले.

खेडेगावात स्पृश्यास्पृश्यतेवर निष्कारण रण माजते, याचा त्याला अनुभव आला. गोप्याला मुद्दाम जवळ ठेवून लोकाचा गैरसमज वाढविल्यानें आपल्याला येथे कार्य करणें कठिण होणार आहे, हे त्याच्या लक्षात आले. तेव्हा यापुढें कशा प्रकारें कार्य सुरू करावे, ह्याचा विचार करीत एके दिवशी दुपारच्या वेळी तो रामगुफेंत बसला असता अचानक तेथे गोप्या आला. "पाया पडतु दादासाब" असे नम्रपणे म्हणाला. अरविंदाचे लक्ष प्रथम त्याच्याकडे गेले नाहीं. तो विचारात गर्क होऊन गेला होता. पण पुन्हा "दादासाब, मी गोप्या आलुया" म्हणून तो जरा मोठ्याने बोलला. तेव्हा अरविंदाने त्याच्याकडे पाहिले.

गोप्याचे सर्वांग घामाने बडबडलेले होते. त्याला दिलेले कपडे अगदी गलिच्छ होऊन गेले होते. त्याचा आनंदित दिसणारा चेहरा आता अगदी मलूल झाला होता. त्याला पाहून अरविंद म्हणाला,

"गोप्या, काय बावळटासारखा दिसतोस ? काय कपड्याची घाण केलीस ही ! आजारीबिजारी काहेस की काय ? वर ये असा !"

"नाई. दादासाब, नाई. आमच जिन असच. चार दीस व्हतो हत तवाच दिस न्यार. समद्या गावची खेटरं बसत्याती आता मला. आन् दादासाबानाबी तरास माज्यापाई दिला गावकऱ्यानी. म्हनूनशानी मी येत नाई. आता वरत दादासाब !" गोप्या गहिवरून बोलला.

"मग आज तू इकडे कसा आलास ? कामावर जातोस की नाहींस?"

समद सागतुया दादासाब. पन आता आलुया शेटजीचा सागावा घेऊन-शान. मालकाच्या उकिरडयात खताच्या पाट्या भरत व्हतो. तत शेटजी आल ! त्येन तुमास्नी घेऊन ये म्हनूनशान् सागितल मला. तवा आलो पळत पळत. 'जा बिगी बिगी आन् घेऊन ये त्येना' म्हनुनूशानी मालकानबी दम दिला मला. तवा आता, दादासाब, चलाव, नाईतर पाटील उगाच शिव्या हासडील मला !"

गोप्या थांबला आणि अरविंदाकडे कारुण्यपूर्ण नजरेने एकसारखें पाहू लागला. त्यावेळी अरविंदानें आश्चर्याने विचारलें, " पण माझं काय काम आहे शेटजींकडे ! माझी त्याची ओळखही नाही. "

" शेटजी वगाळ मानूस नाई, दादा ! त्येचं कामच असल तुमाकड, म्हनुनशानी त्यो बोलावतोय तुम्हास्नी दादा " गोप्या घाईनें बोलला व परत जाण्याच्या वाटेकडे पाहू लागला.

शेटजीकडे जावे कीं जाऊ नये, ह्याचा विचार अरविंद करूं लागला. गावच्या लोकांची ओळख जितकी जास्त होईल तितकी बरीच, असे त्याला वाटले. तो शिक्षित मनुष्य असेल व त्याला आपले म्हणणे पटवून दिले, तर निष्कारण आपल्यासंबंधी झालेला गावकऱ्यांचा गैरसमज कमी होईल, असे वाटून तो म्हणाला,

" बरें, येतो तर ! तुझ्याबरोबरच येऊं कीं मागाहून येऊं ? "

" दादासाब, चलावं आताच. तुम्हास्नी आनलं म्हंजे मालक मला बोलनार नाईती. शेटजीचं काम आमचं मालक आलीकडं तवाच करत्याती. त्यानाबी बरं वाटल व शेटजीबी कोरभर भाकर देल मला. "

अरविंद गोप्याबरोबर गावांत जाण्यास निघाला. ते भर उन्हाळ्याचे दिवस होते. डोंगराचा पायथा सोडून थोडें पुढें गेल्याबरोबर उन्हाचा ताप जास्त होऊं लागला. सूर्यनारायणाने आपल्या प्रखर किरणांनी भूमि तापविली होती. गोप्याच्या पायांत पादत्राण नव्हते, तरी नेहमीच्या सरावामुळे त्याला त्याचें कांही वाटत नव्हतें.

पुढें कांही अंतरावर आल्यानंतर रस्त्याच्या दोन्ही बाजूला काळी सपाट जमीन लागली. तशा उन्हाच्या तापांत शेतकऱ्यांचे जमीन नांगरण्याचें काम चालू होतें. अगदीं जवळच्या रस्त्याने नांगरलेल्या शेतांतून गोप्या जाऊं लागला. तो ढेकळांतून झपझप पाय उचली, पण अरविंद मात्र पदोपदीं ठेंचाळे. शेतकऱ्यांच्या बायकामुलें नांगरटींतील ढेकळें फोडीत होतीं. ज्वारीचें सडही वेचण्याचें काम चालू होतें.

एके ठिकाणीं झुडपाखालीं पाटीत घालून ठेवलेले लहान बालक उन्हाच्या तिरपीमुळें जागे होऊन डोळे दिपल्यामुळें डोळे मिटून रडत होतें. त्या वेळीं त्याची आई धावत येऊन त्याला त्याच झुडपाखालीं बसून, थोपटू लागली. रडे न थांबल्याने तिने त्याला पदराखालीं घेतलें. त्याबरोबर ते मूल हसू खेळू लागले. "लबाडा, उगीचच रडतोस" असे म्हणून ती त्याच्या पाठीवरून हात फिरवू लागली. इतक्यात त्या ठिकाणीं दोन तीन बायका आल्या

त्या ठिकाणाजवळून अरविंद जाऊ लागल्याबरोबर त्या स्त्रियानीं आपलीं तोंडे फिरविली. त्यानीं डोक्यावरून पदर घेतला व त्या खालीं माना घालून बसल्या. अरविंद जरा पुढे गेल्याबरोबर त्यापैकी एक पोक्त बाई दुसरीस म्हणाली, "एवढ्या भर दुपारचा कुठ चाललाय ग तो देवमाणूस!"

"कुठ जातोय! जात असल त्या जीजीकड!" दुसरी म्हणाली.

"अग, कसला देवमाणूस घेऊन बसलीस? जिजीच लुगडं त्याच्या खोपटात कस ग सापडलं?" तिसरी म्हणाली.

"उगीच भल्या माणसावर कुभाड रचू नये, बाई!" पहिली मृदु स्वरात बोलली.

"अग, पाहिलेती पुष्कळ मी अस! तरण्याताठ्या पोरीबरोबर का ग फिरावं त्यानं? म्हाताऱ्या कोताऱ्या बायाबरोबर नाही हिंडत बरं, तुझा देव-माणूस! अग, सगळं थोताड!"

ती जोरानें हंसली. अरविंदाचें लक्ष तिकडे होते. ते शब्द ऐकल्या-बरोबर स्वाभाविक त्याने मागे वळून पाहिलें. साऱ्याची दृष्टि त्याकडे होती. त्यानें पाहिल्याबरोबर त्या बायानीं खालीं माना घातल्या; पण तो पुढे गेल्याबरोबर हास्याचे फवारे त्याच्या कानीं आले. अरविंदाच्या मनाला मात्र ह्यामुळें वेदना झाल्या. तो हिरमुसला. गोप्या पुढें चाललाच होता. त्याला अरविंद म्हणाला,

"गोप्या, सरळ रस्त्यानें जायचें सोडून कशाला आड रस्त्यानें आलास!"

" दादा, गाव बिगी बिगी गाटावं म्हनून ? आता गावाजवळ आलुंया. "

अरविंदाने समोर पाहिले, तो फोफावलेला फड्या निवडुंग त्याच्या दृष्टीस पडला. जरा पुढे गेल्याबरोबर आत झोपडीवजा घरें डोकावूं लागलीं. त्या निवडुंगातून आता त्याना जावयाचे होते. गोप्या मध्यंतरीं टाकलेल्या दगडावरून झपाझप पाय टाकीत चालला. अरविंदाला त्याच्यामागून जाणें भाग होते. जर पाय चुकला, तर काटेरी फणीवर तो पडावयाचा म्हणून अगदी जपून पाय टाकीत त्यानें तो रस्ता ओलाडला. त्याला वाटलें कीं खेड्यातील कार्यकर्त्यांना त्याच्या कंटकमय मार्गाची जाणीव करून देण्याकरिताच ह्या निवडुगाचे येथे वास्तव्य आहे ! दिवसेंदिवस तो मार्ग अधिक कटकमय कसा होत आहे, हे दाखविण्याकरिताच कीं काय त्याची बेसुमार वाढही होत आहे !

अरविंद थोडा पुढे गेला, तेव्हा त्याला हायसे वाटले. जवळच त्याला एक विहीर दिसली. तिच्या समोवती मोठा वटवृक्ष असल्याने त्याच्या शीतल छायेत तो थाबला. त्यामुळे त्याच्या मनास थोडी हुशारी वाटली. गोप्या झटकन् त्या विहीरीजवळ बसलेल्या बाईकडे गेला. विहीर पाहाण्याच्या उद्देशाने अरविंदही तिकडे गेला. त्या बाईस त्यानें ओळखिलें. ती गोप्याची बायको होती. जिजाने दिलेले पातळ ती नेसली होती पण तें इतके मळून गेले होते, की त्याचा रंगही चागला ओळखूं येत नव्हता. अरविद जवळ गेल्याबरोबर ती उटून उभी राहिली. तिला गोप्या म्हणाला,

" किती येळ हतं हैस ? आता भाकरी कवा भाजनार ? "

" गाव झाडला; पाटलाचा घान पान्याचा खड्डा उपसला आन् घागर घेऊनशानी पान्याला आलय मी. दुपार टळून गेली, तरी पानी कुनीबी वाडीना. संमद्या मानसानीं सकाळीं पानी भरलं. आता हिरीवर मानूसबी फारसं येत नाई. कवा पानी मिलल, तवा बिगी बिगी घरीं जाल्यें आन् झुनका करत्यें. शिळा तुकडा टोपल्यामंदी लई है. "

तिच्यापुढे खापरी घागर होती. त्या बाईच्या डोक्यावर चुबळ होती. एका बाजूच्या गलिच्छ जागेत ती उभी होती. हे दृश्य पाहून अरविंद काहीं बोलणार, इतक्यात पाटलाचा एक गडी आपली भली थोरली लोखंडी घागर घेऊन आला. तो उकीरड्यातील खत भरीत असल्यामुळें त्याचे हातपाय घाणीने बरबटले होते. त्याने गोप्यास पाहिल्याबरोबर त्याच्या-वरच तो उसळला व दरडावणीच्या स्वरात बोलला,

" गोप्या, किती वेळ झाला तुला ? कामाची चुकवाचुकव करून असा भटकतोस इकडे तिकडे ? घरी तरी जा म्हणजे पाटील समाचार घेतात तुझा चागला ! तिबल्याशिवाय कणीक मऊ येत नाहीं. "

गोप्या काहीं बोलणार तोच त्याची बायको त्या गड्यास म्हणाली,

" दादा, मला पानी वाडा. घरी कचीबच्ची पान्यायिन तडफडत्यात !"

" जा, जा ! इथं कोणाला वेळ आहे ? अद्याप पोटात घास गेला नाहीं माझ्या. खाताची गाडी येईल परत माझी. मला तुकडा खाऊन कामाला लागलं पाहिजे. गोप्यासारखी उनाडकी करून आमच चालणार नाहीं."

तो गडी त्या पडक्या विहिरीत पायऱ्यावरून उतरत असता बोलला.

त्यानें विहिरींतच हात पाय स्वच्छ धुतले. खाकरून विहीरींतच घाण टाकली. पाणी ढवळून त्याने घागर भरली व तो जलदीनें पायऱ्या चढूं लागला.

अरविंद हें सर्व पाहात होता. त्याच्या मनात अनेक विचार आले. लोकाना स्वच्छतेची जाणीव नाहीं, भूतदया नाही, दलित वर्गाच्या अड-चणी लक्षात येत नाहींत, अशा समाजास कोणत्या उपायाने जागृत करावें, ह्याच विचारानें त्याच्या मनात गोंधळ उडवून दिला होता. ह्या बाईस आपण पाणी आणून द्यावे, असा एक विचार त्याच्या मनात आला. पण त्याच्या जवळ पाणी आणण्यास काहीं साधन नव्हते. त्या गड्याकडून घागर मागून घ्यावी, असें त्याला वाटलें. इतक्यात तो गडी घागर भरून झपझप पायऱ्या चढून वर आला. त्याच वेळी गोप्याची बायको दीनवणीने पुनः म्हणाली,

" दादा, लई येळ झालाय मला. कोरड पडली माज्या तोंडाला. गरिबाला पानी वाडा ! "

त्या गड्याने ते केविलवाणे शब्द ऐकले व तो तिच्या घागरीत पाणी ओतू लागला. घागर भरल्याबरोबर ती खाली वाकली तो तिच्या डोक्यावरील चुबळ खाली घसरली. ती त्या गड्याच्या पायावर पडली. मग काय विचारावे ? स्वारी अत्यंत संतापली. कारण त्याला विटाळ झाला. त्या संतापाच्या भरात कदाचित् त्याने त्या बाईची घागरही फोडली असती. परंतु अरविंदाला जवळ पाहून तो चपापला. तडक विहिरीत जाऊन त्याने त्याच पाण्यात बुडी मारली व घागर भरून तो निघाला. अरविंद त्या गड्याच्या अज्ञानाचे, त्याच्या स्वच्छास्वच्छतेच्या कल्पनेचे व त्याच्या विटाळाच्या भावनेचे आश्चर्य करीत गोप्याच्या मागून पाय उचलू लागला.

अरविंद एकदाचा शेटजींच्या घरी पोहोचला. गोप्याने ' जोहार मायबाप ' करून त्याना तो आल्याची वर्दी दिली. शेटजी वाणसवदा विकीत दुकानात बसले होते. दुकानाच्या पुढे बायाबापड्याचे गिऱ्हाईक होते. दुकानाची पुढील बाजू तंबाखूच्या पिचकाऱ्यानी चित्रविचित्र झालेली होती. शेटजी दुकानातून उठले. त्यानी डोकीवरील रुमाल जरा सावरला. दारापुढे येऊन अरविंदास नमस्कार करून ते नम्रतेने म्हणाले,

" रावसाहेब, तुम्हाला उन्हातून येण्याची तसदी पडली. माफ करा. "

शेटजीनी अरविंदास आतील खोलीत नेले, त्याने घाम पुसला व हुश्श करीत तो तक्क्यास टेकून गादीवर बसला. शेटजींनी बच्च्यास हाक मारली. तो शेटजीपुढे येऊन नम्रतेने उभा राहिला. शेटजी त्याला म्हणाले,

" साहेबाना विहिरीचे स्वच्छ पाणी आणून दे लवकर ! "

बच्या कामाला निघाला. त्याला अरविंदाने पूर्वी पाहिले होते त्या वेळी तो धर्मशाळेत त्याच्यावर काठीचा प्रहार करण्याच्या बेतात होता. त्या वेळचा त्याचा उद्धटपणा व आताचा नम्रपणा पाहून त्याला आश्चर्य वाटले.

विहिरीच्या घाण पाण्याची त्याला कल्पना आली होती. तेव्हा तसलेच

पाणी आपणास मिळेल कीं काय, अशी त्याला शंका आली व तो शेटजींना म्हणाला,

" शेटजी, विहीर कितीशी लांब आहे ? तिचे पाणी स्वच्छ आहे ना ? "

शेटजींनीं अरविंदाच्या बोलण्याचा हेतु जाणला व ते म्हणाले,

" रावसाहेब, विहीर आपल्या मागील दारींच आहे. येता का तिकडे ? पहा तर मागील चौक कसा स्वच्छ आहे तो ! "

अरविंद व शेटजी मागील दारी गेले. चौक प्रशस्त होता. मागील रस्त्याकडील दार बंद होते. विहिरीला लोखंडी रहाट होता. मोकळ्या जागीं फुलझाडे लाविलेली होतीं. जिकडे तिकडे स्वच्छता व टापटीप पाहून अरविंदास प्रसन्नता वाटली. त्याने हातपाय धुतले, त्याबरोबर शेटजींनीं त्याच्यापुढें स्वच्छ टॉवेल केला. त्याचा विनय व तेथील एकंदर व्यवस्था पाहून अरविंदाचा त्या वेळीं चांगला ग्रह झाला व तो म्हणाला,

" शेटजी, पाणी तर स्वच्छ व गोड आहे. गावातील लोक हे पाणी पिण्यास नेत असतील नाहीं ! "

" सकाळीं दहा पांच घरातील माणसें नेतात पाणी ! पण सारा गाव वडाखालच्या विहिरींचेच पाणी भरतो ! "

" ह्या विहिरीचे पाणी पिण्याकरिता लोकांनीं नेण्यास हरकत काय आहे ? "

" हरकत कसली आहे म्हणा, पण नेतात कुठं लोक पाणी ? "

" स्वच्छ व मधुर पाणी त्यांनीं का बरे नेऊं नये ? चांगला जिन्नस कोणाला नको असतो, शेटजी ? "

" काय सांगावं रावसाहेब ! खेड्यातील लोकांची तऱ्हा थोडीबहुत माहीत आहेच तुम्हाला. गावाला विहीर एक. तिला पाणीही भरपूर. पण सगळ्या गावाने तेच पाणी भरायचं, घागरी त्यातच घासावयाच्या, हातपाय त्यातच धुवायचे. त्या पाण्यानं गावात भारी नारू होतात. मीही तीन वर्षांपूर्वी नारूनं मरता मरता वाचलों; म्हणून मनाचा हिय्या केला

आणि घरातच विहीर खणली. देवाच्या दयेनं पाणीही चागलं लागलं. दोन वर्षं झालीं त्याला. रहाटानें पाणी काढावं म्हणून दोन रहाटही लावले. एक आम्हाला व एक गावाला. पण रहाटावर लोकाच्या मारामाऱ्या फार होऊ लागल्या. पायऱ्याच्या विहिरींत दहा पाच जणाना एकदम पाणी भरता येते, तसे इथें येईना. रोज तटा तोडता तोडता आमच्या नाकीं नऊ आले. पण देवानेंच हा तटा थाबविला, रावसाहेब."

" देवाने हा त्रास वाचविला म्हणता ! ते काय झाले सागता का !

" ती गोष्ट वाईट झाली खरी. पण तेव्हापासून फारसे कोणी पाण्याला येत नाहीं. म्हणून तर चार फुलझाडे दिसतात येथे, नाहींतर काय ! लोकाच्या वर्दळीत कसल झाड लावताय इथे ! कुणीं फुल तोडलीं आणि बोलल, की भाडणाला कायहो उशीर ! भाडण झाल, की घरावरचीं कौल तरी धड राहातात कशाला ! "

" पण शेटजी, मूळ गोष्ट राहिलीच सागावयाची ! "

" त्याच अस झालं. घागर ओढता ओढता दमून गेलेली एक बाई घागर घेण्यास वाकली. हातचा रहाट सुटला आणि विहिरींत पडून मेली ! "

" मग काय ! असा अपघात झाला हे वाईट झाल खरं ! "

" वाईट झालं खर. पण माझं बरं झालं, रावसाहेब ! "

" काय, शेटजी, काही तरीच बोलता ! थट्टा करता झाल माझी ! "

" थट्टा कसली, रावसाहेब ! लोक म्हणतात ती भूत झाली. आम्हीं ही जागा घेतली ती भुताटकीची होती ! पण आम्हाला मिळाली स्वस्तात ! आम्ही देश डोक्यावर घेऊन आलों, तो भुताला भितो थोडेच !

" शेटजी, भूत ख्वाट है वाटत ! राती बागड्या वाजत्याती हतं ! मला ऐकूं येत्याती ! पन मी भुताला भिनारा नाई म्हनून्शानी तगलोय हतं ! नाई तर तो भिव्या ! " बच्च्या मध्येच बोलला.

" हो खरंच. भिव्यानें नोकरी सोडली भूताच्या भीतीनें. आमचा बच्च्या म्हणजे जिवत भूतच आहे, झालं ! "

शेटजी खो खो हसले. बच्च्याही हसू लागला. इतक्यात पाटलाची बबी ओच्यात ज्वारी घेऊन शेटजींना हाका मारीत आली. ती म्हणाली,

"आईला 'चा साकार' व मला 'दाळ चुरमुर' पाहिजेत, शेटजी!"

बबीला पाहून शेटजी म्हणाले, "अग बबे, ओरडू नको. बच्चाजीराव दिसत नाहींत वाटत तुला? तू कारभारीण होणार त्याची. पाटील म्हणत होते मजजवळ असं!"

"मी नाही बाई ह्या भुताशी लगीन करायची." बबी लाजून बोलली

"ह्या हडळीला पन कोन लेकाचा बायकु करून घेतोया?" बच्च्याने उत्तर दिले.

शेटजी व अरविंद हसू लागले.

"आज बघ, देवरिसिणीकडन डाकीण सोडते तुझ्यावर! आमच्या घरीं देवरुसीणबाई आली आहे, आता आईला बघायला! तिलाच 'चा' पाहिजे आहे, शेटजी!"

बच्चा एवढा शूर गडी, पण तोही जरा चरकला.

"शेटजी, देवऋषीण कसली? हा काय प्रकार आहे?" अरविंदाने विचारले.

"अहो, भुतखेत अंगात आल्यास तीं काढणाऱ्या बाईला देवऋषीण म्हणतात! अडाणी लोक काही आजार झाला, की त्या बाईकडे जातात. ती सांगते भुताने पछाडले म्हणून! पाटलीणबाईंना फिट येते. पण ही बाई म्हणते, तिला भूत लागलं आहे म्हणून. काय सांगावं ह्या लोकांना?"

"मग तुमच्यासारख्यानो ह्याची वेडी समजूत घालवावी."

"कसली समजूत घालवता याची? पाटलीणबाईंची मुलें जगत नाहींत, तीही भुतामुळच, अशीही ह्यांची समजूत! काय बबे, भूत काढलं का त्या बाईने?" शेटजी बोलले.

"आवसेला आईच्या आंगात भूत येणार आहे शेटजी. मग ती काढणार आहे पण शेटजी, मला 'चा' द्या लवकर."

" बच्च्या, जारे पैशाचा चहा आणि साखर दे हिला ! हिचं धान्य ओतून घे. "

" तुम्हीच द्या शेटजी !" बबी लाजून बोलली.

" जा, जा. देईल तुला तो डाळे चुरमुरे !" शेटजी बोलले.

" काय चेष्टा करता तुम्ही शेटजी ! जणू काय तुम्ही ह्याना माकडंच समजता की काय ? " अरविंद हसत म्हणाला.

" कोण माला माकाड म्हनतुया ? माकडाचा इगा ठाव नाई वाटतं ? " बच्चा डोळे गरगर फिरवीत पुटपुटला

" बच्च्या, चल. सांगितलेले काम कर. फाजीलपणा करूं नको. " शेटजी रागानें बोलले.

" मालाबी माकाड म्हणत्याती काय, शेटजी ? मीबी आईला जाऊन सांगते. मला 'चा' लवकर देत नाई आन् माकाड म्हनता व्हय ? " बबी डोळे फिरवीत मानेला वळसे देत शेटजींकडे पाहून हलक्या स्वरात बोलली.

" तसं नव्ह बबे. चल, तुला मीच चहा देतो. "

शेटजी चटकन दुकानात गेले. त्यानी चहा साखर त्या मुलीला दिली आणि डाळे चुरमुरे तिच्या पदरात घातले. तिचे धान्य तिला परत नेण्यास सांगितले व ते तिला म्हणाले, " पाटलाना असं काही सांगू नकोस हो ! " तिनें डाळ्या चुरमुऱ्याचा बोकणा भरला व धावतच घर गाठलें.

बच्च्या मात्र अद्याप गुरगुरतच होता. त्याला अरविंदाच्या म्हणण्याचा रोखच कळला नव्हता. अडाणी व मगरूर अशाची समजूत तरी कोण घालणार ? शेटजीकडे तो मात्र गरीब गाईप्रमाणे वागे, कारण, ते त्याचे अन्नदाते होते.

अरविंद गादीवर स्वस्थ विचार करीत पडला. ' मी येतोच ' म्हणून शेटजी दुकानात गेले. मध्येच बच्चा त्या खोलीवरून जाताना उद्गारला,

" माकडचेस्टा दावीन तरच मी नावाचा बच्चा ! "

---

प्रकरण १० वे.

# बत्ती बेशुद्ध झाली !



अरविंदाचे मन ह्या घडलेल्या क्षुल्लक प्रकारामुळें अस्वस्थ झाले. क्षुल्लक कारणावरून खेडवळाचा गैरसमज कसा होतो, ह्याचा दुसरा अनुभव त्याला आला. तो विचार करीत लोडाला टेकून पडलेला होता. तेथून वाणसामानाच्या दुकानातील हालचाल स्पष्ट दिसत होती. गोरगरिबाचीं बायकामुलें ओटीतून आणलेले धान्य शेटजींच्या दुकानीं ओतीत आणि शेटजी ते मोजून, त्याना तेल, मीठ, हिंग, लसूण असले जिन्नस देत असत. धान्याचा दर कोणता होता व शेटजी किती किमतीचा माल गिऱ्हाइकाच्या पदरात टाकीत होते, ह्याची पूर्ण कल्पना त्याला येत नव्हती. तथापि, शेटजींच्या बोलण्यावरून व गिऱ्हाइकाच्या खळखळीवरून दिलेल्या जिनसाच्या किमतीच्या दिढी दुपटी किंमतीचें धान्य शेटजींच्या पदरात पडत असावें, असा त्याचा तर्क होता. रोख पैसा मात्र कोणीच देत नसत. ह्यावरून उत्पन्न होणाऱ्या धान्याचा बराच मोठा भाग लोकाना दुकानदाराना द्यावा लागतो, हे त्याच्या चागलें लक्षात आले.

लोकाच्या फाटक्या तुटक्या कपड्यावरून त्याची आर्थिक हलाखी किती असली पाहिजे, ह्या विचारात तो मग्न असता, सखाराम काठी टेकीत टेकीत जिजाला बरोबर घेऊन शेटजींच्या दुकानीं आला. त्याने शेटजींना लवून रामराम केला. शेटजी दुकानातून उठून पुढें आले व त्याला म्हणाले, “ बाबा, किती वर्षांनीं आलात तुम्ही आपल्या घरीं ! ”

सखारामाच्या डोळ्यात दुःखपूर्ण अश्रु तरगूं लागले. त्याची मनःस्थिति शेटजींनीं जाणली व ते म्हणाले, “ गमाला नाहीं का चौदा वर्षे

वनवासात काढावीं लागलीं! अहो, देवादिकाची ही गत, तर आपल्या-सारख्याची काय कथा! आपण कोणाचे वाईट केलें नाहींना! मागच भोगणं कोणाला सुटलय!"

शेटजीचा चेहरा गंभीर होता. त्याचा प्रत्येक शब्द अंतःकरणास जाऊन पोहोचेल असा होता. त्यानी सखारामाचा हात धरला. ते त्याला कापडाच्या खोलींत घेऊन गेले. तेथे त्याला आदरानें बसविले. शेटजीही तेथेंच बसले. त्याच ठिकाणीं अरविंद विचार करीत बसला होता. त्याला पाहून जिजा एकदम उद्‌गारली,

"अगबाई! बाबा, दादाही इथच आले आहेत. मला नव्हत वाटल इथं त्याची भेट होईलशी!"

सखारामानें अरविंदाकडे पाहिले. त्याने नम्रतापूर्वक रामराम केला. त्याच्याजवळ गादीवर शेटजी त्याला बसवूं लागले. पण सखाराम तेथं बसेना.

शेटजींनीं थोडी विचारपूस केली. त्यानंतर सखाराम शेटजींना म्हणाला,

"शेटजी, जिजीला लुगड घ्यायच है."

"तुमचंच दुकान आहे. चागलं लुगडं घ्या बरं जिजीला! सुताचा बाडबिड शोभायचा नाहीं तिला."

शेटजींनीं दहापाच लुगडीं काढलीं. तीं सखारामापुढें टाकलीं. जिजाही तीं पाहूं लागली. तिच्या मनासारखे त्यात दिसेना. त्यामुळे कपाटातील दोन चार नवीन पद्धतीचीं पातळे त्यानीं काढलीं. पातळ घ्यावे कीं लुगडे घ्यावे ह्या विचारात ती पडली. तिनें वडिलाकडे पाहिले.

"जिजे, जाडंभरड पन टिकाऊच सनंग पाइजे." त्यातील एक लुगडे बाजूस काढून सखाराम म्हणाला. त्या लुगड्याची किमत कमी असावी, अशीही त्याची समजूत होती. जिजाने ते ताडलें व ती वडिलाना म्हणाली, "पातळालाही फार किमत पडत नाहीं, बाबा. आईला जरा हलकं लुगडच बरं. तिला आता जाडं लुगडं त्रासाचं होईल."

" तुला लुगडं घेन्याकरता आलोयना आपून ? मग घेऊं पुड तिला. आताच कशाला घ्यायच ? पैसं आपल्याजवळ हायती कुट ? शेटजींनी मेहर-बानीन उदार दिलं, तर एक लुगड घ्यायचं है."

" आईला नाहीं तर मलाही नको, बाबा. मी आपली एका पातळा-वर काढीन दिवस आणखी. आता उन्हाळाच आहे." जिजा असंमति-दर्शक लाडिक स्वरात मान वेळावीत म्हणाली.

अरविंद त्याचा संवाद ऐकत होता. त्याला त्याच्या दारिद्र्याची कल्पना होती. त्यामुळे तो झटकन् म्हणाला, " बाबा, जिजाच्या मनाप्रमाणे दोन दोन लुगडीं घ्या. मी त्याची किमत देईन. तुम्हाला नको काळजी !"

" तुमच मन फार मोट है, दादा. पन धरमाचं कस घ्याव आमी ? आपल्या कस्टाच तेंच खर आपल, दादा." सखाराम गभीर पण निश्चयी स्वरात बोलला.

अरविंद पुढे बोलण्याच्या विचारात होता, तोंच शेटजी मध्येच म्हणाले,

" बाबा, नका काळजी करू पैशाची. राधाबाईनी पुष्कळ हाल काढले आहेत. त्याना व जिजाला दोन दोन सणगं घ्या आता. माझे पैसे केव्हाही वसूल होतील. मला नाहीं त्याच काहीं वाटत. रावसाहेबाच पैसे घ्यायच नसल तर नका घेऊं. पण घरचे हाल कशाला करता ?"

शेटजीच्या ह्या बोलण्याचा अरविंदाच्या मनावर चागला परिणाम झाला. सखारामाला अडीअडचणीच्या वेळीं मदत करणे आपले कर्तव्य आहे, असे त्याला वाटत होते. शेटजींची बाकी आपणच देऊन टाकू, अशा निश्चयाने त्याने शेटजीकडेही पाहिले. त्यामुळें शेटजीच्याही बोलण्यास जोर चढला. त्याचा अंतस्थ हेतु मात्र अरविंदाच्या ध्यानात येणे त्या वेळीं शक्य नव्हते. कारण खेड्यातील सावकारीचा व्यवहार त्याला माहीत नव्हता.

जिजाच्या आवडीनिवडीप्रमाणें सणंगें एका बाजूस काढून प्रत्येक लुग-ड्यावर चोळीचा खणही शेटजींनी आणून ठेविला. इतक्यात त्या ठिकाणीं श्रीपती आला. त्याकडे पाहून सखाराम म्हणाला, " ऐशीं तत पचायशीं !

शिरप्या, तुलाबी पैरनीला कापड घेऊं का र ! "

श्रीपतीला त्याची जरूरच होती. अरविंदानें पुन्हा शेटजींकडे पाहिले. त्याच्या पाहण्यातील आशय त्यांनीं जाणला. श्रीपतीच्या मर्जीप्रमाणे धोतरे व पैरणीचे कापड शेटजींनीं काढले त्यावेळीं बाबानाही पैरण, पागोटं पाहिजे, असे श्रीपती बोलला. सखाराम काकू करीत असला, तरी सर्वांच्या आग्रहापुढे त्याचे काहीं चालले नाही. अद्याप प्रत्येक नगाची किंमत शेटजी बोलले नव्हते. श्रीपतीने विचारल्यानंतर त्यांनी किंमती सांगितल्या. त्या भरमसाट किंमती ऐकून अरविंदालाही आश्चर्य वाटलें. सर्व कापडाची किंमत त्याच्या दृष्टीने अगदींच क्षुल्लक होती. परंतु कापडाचे दर मात्र अव्वाचे सव्वा शेटजी गंभीरपणे सांगत होते. उधारीच्या मालाची जास्त चिकित्सा करून मागत नसते, हे सखाराम जाणत होता. परंतु सर्व कापडाची किंमत कळल्याबरोबर त्याची छातीच दडपून गेली शेवटीं सखाराम शेटजींना काकुळतीने म्हणाला, " शेटजी लगीनाच बोचकच झाल हे ! इतक कापाड मी जल्मात एकदम घेतल नवत. किंमतीबी लई दिसत्याती. चोपडीत बघुनशानी गरिबाना किंमत सांगा. मागच देणबी तुमच राहिलच है. येवडा बोजा मला फिटला तर पाइजे ! "

" बाबा, किंमती जास्त नाहींत. अगदी बरोबर आहेत. तुम्ही सांगाल ते लिहितो, म्हणजे झाल ! आमच जुन कूळ तुम्ही. तुमच ऐकल पाहिजे. आणखी दोन चार सणग घेऊन लग्नाच बोचकच घ्या ना, बाबा ? जिजाच लग्न आता उरकून टाका तिच्या पसंतीनच. "

शेटजी हसू लागले. जिजाला ही गोष्ट आवडली नाही. सखाराम काहींच बोलेना. श्रीपतीचा चेहरा मात्र खुलला. थोड्या वेळाने सखाराम शांतपणे म्हणाला, " बगूं आता तिच्या नशिबाची पारक ! आज काय त्येच ! "

ह्यावर शेटजींचा जास्त बोलण्याचा बेत होता. पण आजचे मुख्य काम त्यांना अगोदर साधावयाचे होते. त्यांनीं गंभीरपणे वहीत लिहिण्यास आरंभ केला. अगदी मुदलामुदली कारभार, असे म्हणत म्हणत प्रत्येक नगाची

किंमत थोडथोडी कमी करून ती वहींत मांडली. त्या वहीवर बाबाची निशाणी घेण्याची तयारी केली. अर्थात्, सखारामानें मुकाट्यानें त्यावर आपला निशाणी आंगठा उठविला. दस्तुर लिहिण्यास शेटजींनी अरविंदास विनंति केली. हा सर्व कारभार त्यास चमत्कारिक वाटला. तो जरा विचार करूं लागला, इतक्यात मध्येच श्रीपती जरा अभिमानानें म्हणाला, ' मी लिहितों शेटजी, मला लिहिता येतय. '

शेटजींना आश्चर्य वाटलें. त्यानीं जरा काकू केले. तथापि बालबोधींत श्रीपतीनें शेटजींनीं सांगितल्याप्रमाणे लिहून त्यानें त्याच लिपींत सही केली. त्या वेळीं आपण आज केवढा मोठा पराक्रम गाजविला, अशा अभिमानानें तो उल्हसून गेला !

शेटजींनीं दाखविलेल्या उदारपणातील हेतु कांहीं निराळा होता, हें तेथे कोणाच्याही लक्षात येण्यासारखे नव्हते. मागील सहा वर्षांपूर्वींची जुनी बाकी ह्या व्यवहारानें तरती झाली, ही कायद्यातील पकड कोणालाच तेथे कळली नाहीं. शिवाय अरविंदाकडून परस्पर पैसे वसूल करण्याचा शेटजींचा मानस त्या भोळ्या सखारामाच्या लक्षात आला नाही. साळसूदपणे एक एक पाश घट्ट घट्ट आवळण्याची कला सावकारीचा पिढीजाद धंदा करणाराना चांगली अवगत असावयाची, इतराना तींतील मख्खी सहजासहजीं कळावयाची नाही.

ती मंडळी उठली. अरविंदही निघण्याच्या बेतात होता, पण शेटजींनीं त्याला मुद्दाम अत्यंत आग्रहाने ठेवून घेतले. त्यानीं कोणत्या कामाकरिता बोलावलें ह्याचा थांगपत्ताही अरविंदाला अद्यापि नव्हता. आता त्याचें बोलणे सुरू होणार, इतक्यात दहापांच माणसांचा घोळका दुकानात शिरला. शेटजींनीं त्या मंडळींचे मोठ्या अदबीनें स्वागत केलें. त्यातील पोक्त गृहस्थास मोठ्या आग्रहानें त्यानीं लोडाशी टेकवून बसविले. पांच चार पोक्त बायका व तेवढेच पोक्त पुरुष यांचा कलकलाट तेथे सुरू झाला. ते लोक जवळच्या दोनतीन कोसावरील एका लहानशा खेड्यातून

आलेले होते. इतक्यात रायबाही तेथे येऊन दाखल झाला. शेटजी हसत हसत रायबाकडे व त्या मंडळीकडे पाहात म्हणाले,

" काय, रायबा, पावण्याच्या घरीं लगीन ठरलंय, वाटतं ! लग्नाचा बस्ता घ्यायचा विचार दिसतोय तुमच्या पावण्यांचा. पण सध्या उधारी बंद केली आहे आम्हीं ! "

" तुमी गरज केली नाई तर आमा गरिबाच चालायच कसं शेट !" गादीवर बसलेला गृहस्थ काकुळतीने म्हणाला.

" दिवस फार वाईट आलेत. आमच्या घरीं का कापड होतं ! आम्हांला रोख दाम मोजावा लागतो, व्याजाच्या पायी आमचा सर्व धंदा बसलाय, म्हणून तर आम्ही उधारी बंद केली. " शेटजी निश्चयाच्या स्वरात बोलले.

" आम्ही काय हात हालवीत मोकळं नाई आलोय शेट. पन लगीनाचं काम है. दोन पैसं जादा लागल, तर येत्या सुगीपर्यंत दम धरा. पन कापाड मातार अश्शी चांगल द्या. मागपुढं बगू नगा." एक पोक्त बाई आपल्याजवळील पैशाच्या पिशवीस हात लावीत बोलली.

" कापड तर चांगलंच देत असतो आम्ही. चार वर्षांचं पोर आलं तरी ते फसणार नाहीं आमच्या दुकानात. रायबाला विचारा पाहिजे तर ! काय रायबा ! " शेटजी रायबाकडे पाहून बोलले.

रायबाला शेटजींचे सारे कसब माहीत होते. आपल्या बोलण्याचा फायदा शेटजींना मिळणार, हे जरी त्याला कळत असले, तरी प्रसंगोचित बोलल्याशिवाय त्याला गत्यंतर नव्हते. म्हणून तो म्हणाला, "आमचं शेटजी हायती चोक. ते कुनालाबी फसवनार नाहिती. म्हनून तर मी तुमासंग आलोंय."

सर्व वातावरण अनुकूल झाले. किती रुपयाचा बस्ता घ्यावयाचा ह्याची विचारपूस शेटजींनी केली. वाटाघाटीं होऊन पन्नास रुपयापर्यंतचा अंदाज ठरला. शेटजींनीं तेवढयात बस्ता बसणार नाही अशी कुरकूर चालविली. पाच चार रुपये आग किंवा माग लगिनाच्या बस्त्यामदी व्हायचच ! असे रायबानें

सांगितलें. शेटजी कापड काढण्याच्या तयारीस लागले. त्यांनीं अनेक जुनीं पुराणीं पण नवीन बासनांत बांधलेलीं सणंगें दाखविण्यास सुरुवात केली. जो तो कापड पाहण्यांत गर्क होऊन गेला. अद्याप कोणाचेंच समाधान झालें नव्हतें. "शेटजी चांगली सणग दावा कीं! पैशा दोन पैशा-कडं नगा बगू" एक पोक्त बाई उद्गारली.

शेटजींची धावपळ पुन्हा सुरू झाली. त्यांनीं आंतील भागचें कपाट उघडलें. बासनांत बांधलेलीं व पातळ रंगीबेरंगी कागदाचें आच्छादन असलेलीं सणगें त्यांनी त्याच्यापुढें टाकलीं वास्तविक अगोदर दाखविलेल्या नमुन्याचीं पण जरा कमी किंमतीचींच तीं सणगें होतीं. परंतु शेटजींनी केलेली मोहक भाषेतील नावाजणी ऐकून त्यांतील एक सणग पसंत झालें.

आतां किंमतीचा प्रश्न सुरू झाला. शेटजींनीं त्याची किंमत बारा रुपये सांगितली. सर्वांना आश्चर्य वाटलें. एवढें महाग सणग घेऊन कसें भाग-णार ह्याचा प्रत्येकजण विचार करू लागला. पण त्यांतील एक बाई म्हणाली, "शेट, तीन चार रुपयं असल याची किंमत. सिरीमंताची बारा रुपयाची साडी नव्हं ही!"

शेटजींनीं खूप आकांडतांडव चालविलें. त्यांनीं पुष्कळ ओढून धरलें एकादा दुसरा माणूस रागानें उठून जाऊं लागला. दिवसही मावळण्याच्या बेतांत आला. सर्वांची चुळबूळ सुरू झाली. शेवटीं सर्वांच्या आग्रहानें व रायबाच्या मध्यस्थीनें त्या सणंगाची किंमत सहा रुपये ठरली. शेटजींनीं तें सणंग फार तोट्यानें विकलें. त्याचा चेहरा अत्यंत कष्टी झाला. इत राच्या मुखावर उल्हास चमकूं लागला. पण अंदरकी बात अशी कीं, त्या किंमतींतही शेटजीचा एक रुपया फायद्याचाच होता!

इतर सणगांची ह्या पद्धतीनें चिकित्सा झाली नाहीं. रायबाच्या संम-तीनें भराभर एक एक सणग पसंत होत गेलें. जपानी स्वस्त कापड शेटजी त्या बस्त्यांत दाखल करीत होते. तरीही बस्त्याची किंमत साठ रुपये झाली. सायंकाळ झाल्यानें सर्वांची निघण्याची गडबड सुरू झाली. शेटजींनीं ताणून

ताणून मुद्दाम ती वेळ आणली होती. एका सणगावर सपाटून घासाघास झाली, म्हणजे पुढे आपोआपच आपण दाखवूं ते, सणंग व म्हणूं ती किमत ह्या लोकाच्या पदरीं बांधण्यास अडचण पडत नाहीं, हा त्याचा अनुभव होता !

त्या पोक्त बाईनें पाच पाच रुपयाचे पाच ढीग शेटजींपुढें ठेविले. बाकीचे उधार ठेवण्याबद्दल याचना सुरू झाली. शेटजींची जिकीर कमी होईना. शेवटी कोणाजवळील रुपया, कोणाजवळील आठ आणे असे करीत करीत पाच रुपयाची आणखी भरती झाली

शेटजींनीं वहींत साठ रुपयाचा माल रायबाच्या पाहुण्याच्या नावें खर्च लिहिला. जमा वजा करून बाकी सांगितली, पण वहींत जमा केली नाहीं. नोंदीखालीं त्या पाहुण्याचा व रायबा काकू करीत असताही, त्याचा आंगठा घेण्यास शेटजी चुकले नाहींत.

सर्वजण निघून गेले. दुकानात समई तेवू लागली. शेटजी माल आवरीत मोठ्या मिनतवारीनें बोलले, " रावसाहेब, तुम्हाला फार तसदी पडली. अस्सा त्रास असतो आमच्या धंद्यात ! "

" बरे तर, उद्या आपण पुष्कळ बोलू शेटजी. आता मी येतो. रामगुफेत कोणी नाहीं. तेथें मुले जमतील. आता परवानगी द्या मला. " अरविंद उठूं लागला. पण शेटजींनीं आग्रह करून त्याला बसविले.

" आमच्या घरची मीठ भाकरी तरी खाल्ल्याशिवाय मी जाऊं द्यायचा नाहीं. आपल्यासारखे मोठे लोक माझ्या घरीं येणार तरी केव्हा ! मला आपल्याबरोबर पुष्कळ बोलावयाचं आहे. आता वेळ निवात सापडेल. माझ्या घरातून पाहुणा कधीही विन्मुख जात नसतो ! "

शेटजींच्या मिठ्ठास वाणीचा अरविंदावर परिणाम झाला. जेवण आटोपल्यावर ते दोघे मागील दारीं तुळशीवृंदावनाजवळ बोलत बसले. त्या शांत जागीं फुलाचा सुवास दरवळलेला होता. जलसिंचनाने सर्व आवार गारेगार झालें होतें.

शेटजींची दुपारपासून चाललेली उलाढाल अरविंदाच्या नजरेपुढें होती. शहरातील व्यापाऱ्याची धावपळ त्याला ठाऊक होती. खेड्यातील काहींसा प्रकार आज त्याच्या नजरेस आला. व्यापारातील खुब्या सामान्य माणसाच्या माहितीच्या नसतात. पण सारा खटाटोप पैसा मिळविण्याकरिताच असतो. हा पैसा कसा मिळतो ? नवीन संपत्तीचें उत्पादन होतें काय ? पैसा मिळतो तो कोणापासून मिळतो ? गोरगरिबाजवळचा पैसा नाना खटाटोपानें दुसरा आपलासा करितो काय ? त्या करण्यात वाजवी भाग किती व गैरवाजवी किती आहे ? इत्यादि विचार त्या वेळीं त्याच्या मनात घोळत होते.

थोड्या वेळानें अरविंद म्हणला, " शेटजी, तुमचा धदा आज मीं पाहिला. बहुतेक व्यवहार उधारीचा. नेहमी रोखीचा व्यवहार ठेवावा. फायदा थोडा कमी घ्यावा आणि चागला माल लोकाच्या हातीं द्यावा. स्वार्थ व परमार्थ व्यापारात साधता येणार नाहीं का ? " अरविंद किंचित् खिन्नतेने म्हणाला.

शेटजी आपला मुद्दा सोडून देण्यास तयार नव्हते. अरविद भोळा देशभक्त आहे, हें त्यानीं पूर्वीच ताडले होते. त्याच्याकडून थोडेबहुत कामही त्याना करवून घ्यावयाचें होतें. म्हणून त्याचे मन न दुखविता ते मृदु स्वरात म्हणाले, " रावसाहेब, तुम्ही म्हणता तस करून पाहूं. पण आमचा धदा मात्र बसेल त्यामुळं. रोख पैसा लोकाजवळ नसणार, मग आमच्याकडे तरी कोण येणार ? आजची उधारी तुम्हाला दिसली खरी, पण सखारामाची उधारी तुमच्याच जिवावरची ! लग्नाच्या बस्त्याची उधारी वसूल होईल तेव्हा होईल. त्यानीं दिलेल्या तीस रुपयाच्या रोकडीत माझं मुद्दल निघाल आहे. आता नफा मिळेल तसा घेत जाणार ! समजल का रावसाहेब ! असा आमचा खेडयापाडयातला व्यापार असतो. कोठही जा पळसाला पानं तीनच ! "

शेटजी हंसूं लागले. परंतु अरविंदाचा चेहरा खुलला नाहीं. सखारामाच्या

कापडाची किमत त्याला द्यावी लागणार, याची जाणीव त्याला मुद्दाम शेटजींनीं युक्तीने करून दिली होती. पण त्याचा निश्चय पूर्वीच तसा झाला होता, त्यामुळे त्यास त्याच्या बोलण्याचे विशेष नवल वाटलें नाहीं. पण शेटजींची गोड भाषा खऱ्या प्रेमाची द्योतक नसून, ती व्यवहाराची भाषा आहे, हे त्याच्या लक्षात आले. आपल्याला येथें आणण्यात व राव-साहेब, रावसाहेब म्हणून नसता मोठेपणा देण्यात शेटजींचा काहीं विशिष्ट हेतु असेल, असे वाटून तो त्याना म्हणाला,

"बरें शेटजी, तुमच्या व्यापारातील अडचणी आम्हाला ठाऊक तरी झाल्या, तुमच्या घरीं येण्याने ! पण आज मला आपण कशाकरिता बोलावलेंत हे अद्याप तुम्हीं सांगितलेंच नाहीं. काही कमजास्त तर नाही ना ?"

शेटजीना अशी संधि पाहिजेच होती. त्यामुळे ते उत्सुकतेनें म्हणाले, "रावसाहेब, तुमच्यासारख्याना उगीच का मी तसदी देणार आहे ! आमच्यापेक्षा तुमचं ज्ञान मोठं. अहो, तुमच्यासारख्याचे आमच्या घरीं पाय लागले हेच आमचे नशीब ! माझं काम काहीं मोठंसं नाहीं. आपण आतील खोलींत जाऊं या. तेथेच बोलत बसू."

"पण शेटजी मला रावसाहेब म्हणू नका. मी काहीं तसा कोणी मोठा माणूस नाही. एक गरीब माणूस तुमच्या गावीं आलो आहे. त्याला आपणासारख्याची मदत मात्र पाहिजे हो !"

"रावसाहेब, मला कोण माणूस कसा, हे कळत नाहीं वाटत ? आपली योग्यता फार मोठी. आमच्यासारख्या खेडवळाना कळतंय कुठं ? नाहीं तर नसता त्रास देईल होय कोणी आपल्यासारख्याना ? अहो, मी आपल्याला रावसाहेब म्हणतो, ते उगीच नाही ! खेडवळानीं ते ऐकलं म्हणजे तुमच्याविषयीं त्याना भीति वाटेल व तुमच्या कामात फाटे फोड-ण्याला ते धजणार नाहीत ! रावसाहेब म्हणण्यात अशी जादू आहे, साहेब !"

शेटजी मोठ्याने हसूं लागले. त्यानी अरविंदाचा हात धरला व ते त्याला दुकानाच्या दुसऱ्या बाजूच्या खोलींत घेऊन गेले.

त्या खोलीत अरविंदाकरिता गादी पसरली होती. तीवर पाढरी शुभ्र चादर घातलेली होती. पलीकडच्या बाजूस लहानशीच पण भक्कम तिजोरी भिंतीत बसविलेली होती. वरील बाजूस कागदपत्राचे सालवार रुमाल फळ्यावर व्यवस्थेने ठेवले होते. वारा येण्यास एकच खिडकी होती, ती बऱ्याच उचीवर होती. खोलीत कुलदेवतेची तसबीर असून तिच्यापुढे निराजन होतें. त्या खोलींत उदबत्त्याचा सुवास दरवळलेला होता.

अरविंदाच्या मनाला प्रसन्नता वाटून तो गादीवर आडवा झाला. शेटजींनीं कपाट उघडून त्यातून कागदपत्राचे रुमाल बाहेर काढले. त्यानीं एक रुमाल सोडला. त्यातून एक कागदाचे पुडके बाहेर काढले. ते त्याला दाखविलें. त्यातील शेवटचीं दोन तीन पाने एका हुकूमनाम्याचीं होतीं. तीं इंग्रजींत लिहिलेलीं होती. तीं दाखवून शेटजी म्हणाले, "साहेब, याची एवढी इंग्रजींत नक्कल करून द्या मला. ती मुंबईच्या वकिलाकडे पाठवावयाची आहे. तेथे हायकोर्टात आमचा दावा चालला आहे. एका कागदावर मराठींतही तर्जुमा केला म्हणजे मलाही कळेल."

शेटजींनीं कागद, दौत, टाक वगैरे लिहिण्याचें सामान त्याला ताबडतोब दिलें. अरविंद वाचूं लागला. नंतर भराभर लिहू लागला. शेटजी त्याच्याकडे पाहात होते. अरविंदाच्या लिहिण्याची सफाई पाहून त्याना थोडें आश्चर्य वाटले. त्याना त्याच्या विद्वतेची थोडी कल्पना असली तरी इतके भराभर इंग्रजी लिहिणारा हा इसम असेल, असे त्याना वाटले नव्हतें. थोडया वेळात इंग्रजी लिहिणे खलास झालें.

पुढें दुसरा कागद घेऊन अरविंदाने भाषांतर करण्यास सुरुवात केली. इतक्यात शेटजींच्या दरवाजाबाहेर रडण्याचा आवाज ऐकूं येऊ लागला. त्या आवाजाकडे अरविंदाचें प्रथम लक्ष गेले नाहीं. शेटजींचे लक्ष गेलें होतें, परंतु ते मुद्दामच हालचाल करीत नव्हते. शेवटीं जास्तच ओरड झाल्यानंतर शेटजींनीं बचाला हाक मारण्यास सुरवात केली, पण त्याचा पत्ता नव्हता. तेच स्वतः उठले, त्यानीं दार उघडले. एक दहा बारा

वर्षांची मुलगी एकसारखी मोठ्याने रडत होती. एक गृहस्थ तिची समजूत घालीत होता. परंतु त्या मुलीचे रडे थांबेना. ती थयथय नाचतच होती. तिला भयंकर वेदना होत असाव्या, असे वाटत होते. इतक्यात अरविंदही बाहेर आला.

त्याने तो देखावा पाहिला. जो तो बच्च्याचा शोध करू लागला. तो तेथे नाही, असे कळल्यानंतर दुसरा मांत्रिक शोधण्यास सुरुवात झाली.

अरविंद त्या मुलीजवळ गेला. इतराजवळ थोडी विचारपूस केली. एका भयंकर इंगळीने त्या मुलीला दंश केला असल्याचे त्यास कळले. वेदना पूर्णपणे चढल्या होत्या. किरकोळ उपायापेक्षा जालीम उपायाची त्या वेळी जरुरी होती. अरविंदाने पुष्कळ विचार केला, पण झटकन् त्या ठिकाणी उपलब्ध होणारे औषध त्याला दिसेना.

बच्चा विंचू उतरवणारा मोठा मांत्रिक आहे, ह्या समजुतीने तिला तेथे आणले होते. तो न भेटल्याने दुसरा मांत्रिक लोक पाहू लागले. त्या मुलीची स्थिति असह्य झाली होती. तिला वेदना सहन होत नव्हत्या. लोकांची धावपळ चालली होती. इतक्यात दुसरा मांत्रिक सुदैवाने आला.

त्याने उपचार सुरू केले. त्या मुलीच्या हातास दंश झाल्यामुळे त्याने त्यावर पाण्याचे हबके दिले. हात झाडण्यास सांगितले. "विंचू उतरला का? उतरला का ? " असें म्हणू लागला. त्या वेळीं विंचू उतरूं लागला आहे, असें सभोवतालच्या मंडळींना वाटले. पण खरोखर त्या असह्य वेदनामुळे ती मुलगी बेशुद्ध होऊ लागली होती.

थोड्या वेळाने ती धबकन् जमिनीवर पडली व बेशुद्ध झाली. कोणी तरी झपाटले आहे असे म्हणून जो तो काढता पाय घेऊं लागला. इतक्यात पडदणी पांघरलेली तिची आई तेथे दाखल झाली. "बबे ! बबे!" म्हणून तिने हंबरडा फोडला !

---

## प्रकरण ११ वें

# खेड्यांतील सावकारी !



ती दुसऱ्या दिवशींची प्रातःकाळची वेळ. दिनराजाची कोवळी किरणे पाटलाच्या मागील सोप्यात डोकावू लागली. गोठ्यातील बैल, गाई, म्हशी यांची धडपड चालू झाली. मागील बाजूचा खातेरा आपल्या पायांनी उकरीत उकरीत कोंबडी आपले भक्ष्य शोधीत होती व ती त्याचे धडेही आपल्या चिल्यापिलांना देत होती. शोभिवंत डौलदार तुऱ्याचा कुक्कुट मधून मधून अद्यापही आरवत होता. पाणी आणून भला मोठा रांजण भरण्याचे काम एक गडी करीत होता. तो रांजण त्या सोप्याच्या पुढील बाजूस होता. त्या सोप्याच्या भिंतीला लागून धान्याची भरलेली पोती अस्ताव्यस्त पडली होती. त्या सोप्याच्या मध्यभागी खाटेवर बबीला निजवले होते. तिच्या उशाशीं पाटलीणबाई सचिंत बसल्या होत्या.

शेटजींच्या दारीं बबी बेशुद्ध झाल्यापासून ती शुद्धीवर यावी, म्हणून अरविंदाचे नानाप्रकारचे उपचार चालू होते. पाटलाच्या घरीं मोकळ्या जागी तिला आणवून त्याने तिला एका खाटेवर निजविले होते. बबीला लवकर बरे वाटावे, म्हणून लोकांनी सुचविलेले बाह्योपचारही गड्यामाणसांनीं केले. कोणी तिच्यावरून कोंबडी उतरून टाकली, कोणी म्हसोबास नवस केला, कोणीं अंगारा आणून लावला, हे सर्व प्रकार अरविंद पाहात होताच. त्याच्या उपाययोजनेस अडथळा येणार नाही, असे तोडगे करण्यास त्याने कोणास मनाई केली नाही. गोप्याला ह्याच देव माणसाने बरें केले, तेव्हा अशा प्रसंगीं हा बबीला उठवील, असे पाटलीणबाईस मनापासून वाटत होते. त्यामुळें त्याच्यावर श्रद्धा ठेवून त्या बबीच्या उशाशीं सचिंत बसल्या होत्या.

त्याचे लक्ष बबीकडे होते. रात्रीच्या जागरणाने त्याचे डोळे लाल झाले होते. मधून मधून दुःखाचा कड आल्याने त्याच्या डोळ्यातून अद्यापही ऊष्ण ऊष्ण अश्रु बाहेर पडत होते.

त्याची ती स्थिति पाहून अरविंदास फार वाईट वाटले. इतक्यात बबीची थोडीशी हालचाल त्याच्या लक्षात आली. तो झटकन् खाटेजवळ गेला. बबी हलके हलके सावध होऊ लागली. काही वेळाने तिने आपले डोळे साफ उघडले. ती कण्हत कण्हत म्हणाली,

" आई हात दुखतुया ग ! "

ती सावध झाल्याचे पाहून पाटलीणबाईंना अत्यंत आनंद झाला. तिच्या तोंडावरून हात फिरवीत त्या म्हणाल्या, " बाळ, हात दुखायचा राहील बर आता लवकर ! देवमाणसानंच तुला बरं केलं आहे. त्याचं आपल्यावर जन्माच उपकार झालेत ! "

त्यांनी आपले डोळे पुसले. त्या लगेच उठल्या व अरविंदाच्या पायावर त्यांनी डोकें ठेवले. पडद्यातील स्त्रिया परपुरुषाच्या नजरेस पडावयाच्या नाहींत, हे खरे असले, तरी उपकारकर्त्या पवित्र माणसाच्या दर्शनाला तो पडदा आड येत नाही !

हा सर्व प्रकार पाहून अरविंद आश्चर्यचकितच झाला व म्हणाला, " ह्यात मीं काय केलं ? इंगळीच्या विषाचा परिणाम जबर असतो, पण घाबरण्याचं इतके कारण नसते. मुलगी लहान असल्यानं तिच्यावर तो परिणाम जास्त झाला. आता सायंकाळपर्यंत ती कालच्याप्रमाणं खेळूदेखील लागेल. काही काळजी करायला नको तिची. "

" येवढीच ल्येक माझी जगलेली. तिला काळाच्या दाढेतन काढलीत तुम्हीं ! ते नाहींत घरी. कालच तालुक्याच्या कचेरीला गेलेत. तुम्ही खरोखर आम्हाला देव भेटलात." पाटलीणबाई अडखळत अडखळत बोलल्या. अंतःकरणात उचंबळून आलेली कृतज्ञता त्यांच्या नेत्रात दृग्गोचर होत होती.

बबी शुद्धीवर आल्याचें लोकांना कळण्यास फार वेळ लागला नाहीं.

तिला पाहण्यास माणसांची रीघ लागून गेली. शेटजीही तेथे आले. योग्य ती व्यवस्था करून अरविंद शेटजींबरोबर त्यांच्या घरीं गेला.

अरविंदाला स्वस्थता पाहिजे होती. शेटजींनाही त्याची आणखी जरुरी होती. त्यांच्याजवळ इंग्रजी निकालपत्रें बरींच होतीं. तेव्हा तीं त्याच्याकडून वाचून घ्यावीं, असा त्यांचा मानस होता. पण दुपारपर्यंत शेटजींची काहींना काहीं धादल चालूच होती. अरविंदाला विश्रांतीची जरुरी असल्यामुळे तो शेटजींच्या खोलींत स्वस्थ पडून होता.

दुपारच्या वेळीं शेटजींकडे एक कूळ आले. ते त्यांचे जुने कूळ होते. पण बऱ्याच दिवसापूर्वी शेटजींचे व त्याचे बिनसले होते. त्यामुळे त्याचे देणे न देता बळी पाटलांनीं काढलेल्या सोसायटींत तें कूळ गेले होते. घरच्या ओढगस्तपणामुळें सोसायटीचे देणेंही त्याच्या हातून भागले नव्हते त्या देण्यामुळे ते अगदी जिकिरीस आले होते थोड्या दिवसात ते देणें न दिल्यास त्याची जमीन लिलावात निघणार होती. शिवाय त्याच्या मुलाच्या लग्नाकरिताही त्याला पैशाची जरूरी होती ते शेटजींना अत्यंत काकुळतीनें म्हणाले.

"शेटजी, तुमच्या दाराशीं मी आलोय. मागचं सगळं पोटात घाला आताची तेवढी माझी गरज भागवा."

"जा आता सोसायटीकडे." शेटजी खेकसून म्हणाले, "माझं देण बुडविण्याकरिता तुम्हीं सोसायटी काढलीत ना? आता कशाला माझ्या दाराचा उबरटा झिजविता?"

शेटजींनी रुद्रावतार धारण केला होता. ते एकसारखे गरगर डोळे फिरवीत होते. ते कूळ अगदीं हताश होऊन गेले होते, म्हणून तर शेटजींकडे आलें होते. त्याने पूर्वी शेटजींचे तोंडही न पाहण्याची चारचौघात शपथ घेतलेली होती. शेटजींच्या प्रामाणिक कुळानाही त्यानें फितविले होते. त्यामुळे शेटजींच्या रागाचा पारा बेसुमार चढला. त्याला तर पैशाची अत्यत जरुरी होती म्हणून तो काकुळतीने म्हणाला,

" शेटजी, चुकलो. तुमाइण आमचा कुणी वाली नाहीं. कसलाबी कागद करून घ्या. पन माझी येळ काडा. तुमच्या पायावर डोकं ठेवतों."

आणि खरोखरच उठून तो गृहस्थ शेटजींच्या पायावर डोकें ठेवूं लागला. अरविंदास शेटजींचा तो आविर्भाव, त्याच्या तोंडून निघणारे कटु शब्द, बेपर्वाईची वृत्ति ही पाहून मोठे नवल वाटलें. इतक्यात शेटजी या कुळास म्हणाले, " जा रे ! गरज लागली म्हणजे तुम्ही गोगलगाय बनता. पैसा हातात पडला, म्हणजे मग तुम्ही वाघासारखे गुरगुरता ! माझ्याकडून आता तुला एक दमडीदेखील मिळणार नाहीं, समजलास ? मागच्या बाकीची तुला कधी आठवण झाली का ? आम्ही तर त्याच्यावर पाणीच सोडल. कोर्टातील तुझ्या जबाबानं चांगला कानाला खडा लावून घेतलाय मीं !"

अरविंदाला वाटत होते, कीं इतक्या स्पष्टोक्तीने तो गृहस्थ उठून जाईल, पण तसे कांहीं घडून येईना. तो लग्न ठरवून बसला होता. निदान मुलीच्या बापास द्यावयाची रक्कम तरी त्याला रोख पाहिजे होती. बळी पाटलांनीं सोसायटीतून पैसे देतो, असे सांगून त्याला नादीं लावलें होतें. पण पूर्वीची बाकी वसूल झाल्याशिवाय त्याचे नवे कर्ज मंजूर होत नव्हते. अशी त्याची अनुकंपनीय स्थिति झाली होती. त्यामुळे तो सारा अपमान गिळून पुन्हा अत्यंत नम्रतेनें म्हणाला,

" शेटजी, कोडतात वकिलान सांगितल तसं बोललों मी. माला कायदा काय ठावा ? तुमच्या वहींत बाकीबी लई निघाली. देवाला स्मरून खोट कस बोलाव मीं ! पन ते सार इसरून जा, शेटजी. पोराच लगीन नाहीं व्हायच आताची येळ गेली म्हजे ! मी नाहीं तर पोरगा तरी तुमच देण फेडील, शेटजी. मी नाहीं का चापाचं पैन् पैच देण दिल तुमच ? आम्ही तुमच्या पायाच चाकूर आहो ! "

ह्या दीनवाण्या शब्दांनीं शेटजींच्या अंतःकरणाला पाझर फुटेल, असें अरविंदाला वाटलें. परंतु खरोखर शेटजींचा राग अद्याप शांत झाला नव्हता. ते उसळून म्हणाले,

" कोर्टात खोटं बोलतोस ? वकील काय वाटेल ते सांगेल म्हणून तूं आम्हास लबाड म्हणतोस ? आणि येतोस पुन्हा तोंड वेगाडीत आमच्याकडे ! आम्ही अगोदर जातच नसतो कोर्टात वकिलाची भर करायला ! भर कोर्टात आम्हीं वह्या खोट्या लिहिल्या म्हणतोस ? चांगला निशाणी आंगठा दिलास वहीवर, कोर्टात खोटं बोलायला शरम नाही वाटली तुला ! हे रावसाहेब वकिलापेक्षा हुशार आहेत. ह्यांना दाखवितो तुझा खोटेपणा !"

शेटजींनीं खरोखरच वह्या उलथ्या पालथ्या करण्यास सुरुवात केली. त्यांची धांदल सुरू झाली. कांहीं वह्या त्यांनी अरविंदापुढे टाकल्या. एकींतील नोंद त्याला दाखवली. नोंदीखालीं खरोखरच रुजवातीचा निशाणी आंगठा होता. शेटजींच्या माऱ्याने ते कूळ अगोदरच हतबुद्ध होऊन गेलें होते. ती नोंद वाचून अरविंदाला शेटजींच्या बाजूनें मान हलवावी लागली. त्यामुळे ते कूळ अगदींच चीत झाले.

" चुकलों शेटजी, मला सय नवती तवाची. आता तुमची सारी बाकी काढून, नवा कागद घ्या लिवून ! पन आताची नड काढा. पुना म्हनून कुट्टं कुट्टं जानार नाई मी ! " कूळ विनवणीच्या स्वरात म्हणाले.

शेटजी विजयाच्या आनंदात होते. ते त्यांचे जुनें कूळ होते. त्याची जमीन बरी होती. त्याने शेटजींना सोडल्यापासून त्यांचा राग त्या कुळावर होता. केव्हा तरी जाड सुट्या कागदावर त्यांनी त्याचा निशाणी आंगठा घेऊन ठेविला होता ! कुळाची खोड मोडण्याकरिता तो कागद पक्क्या कीर्दीत गेला व तो आंगठा एका नोंदीखालीं आला !

" पाटील नाहीत येथे. ते आल्याशिवाय मी बोलत नाहीं तुझ्याशीं. आपल्याजवळच घालवून कोणीं कटकटी कराव्या तुमच्याबरोबर ! आता पैसा भारी महाग झालाय. व्याजाचा भुर्दंड आम्हाला द्यावा लागतो आमच्या सावकारांना वेळेवर ! तुमचं काम झालं, कीं फिरून तोंड दाखविता कोठें आम्हाला ? " शेटजी मुद्दाम ओढून धरून बोलत होते.

" पाटील आल्याती आताच आपल्या घरी. त्यांना घेऊन येतों मी.

माग झालं ते झाल. शेतातला माल आला, की भरतो तुमच्या दुकानात. आता अशी कानाला खडा लावून घेतलाय मीं. मारनार किंवा तारनार आता तुमीच, शेटजी." येवढे बोलून तें कुळ उठून गेलें.

अरविंद हा सर्व संवाद ऐकत होताच. तो शेटजींकडे पाहून त्याच्या अंतःकरणाचा ठाव शोधीत होता. पैशाच्या जरुरीने माणसाची स्थिति किती केविलवाणी होते, ह्याचे चित्र त्याच्या डोळ्यापुढे होते. खेड्यातील सावकार व कुळे ह्याचे परस्परसंबंध कशा प्रकारचे असतात ह्याची काहींशी कल्पना त्याला आली. तो विचारात पडल्याचे पाहून शेटजी म्हणाले,

"अशी सावकारी असते आमची, रावसाहेब! लग्नाचं काम आहे त्याचं, म्हणून जरा मऊ बोललो! नाही तर घरात उभे राहू देण्याची सुद्धा योग्यता नाहीं ह्याची. मागची बाकी थकली म्हणून कोर्टात जावं लागलं मला. खरी बाकी दे म्हणत होतो त्याला, म्हणजे राहिलेली सारी सूट घालतो तुला. पण ऐकतोय कुठं? वळिबाच्या नादान आला कोर्टात. सोसायटींतले रुपये घेऊन दिले वकिलाला आणि माझा जमाखर्च खोटा ठरवू लागला! पण मी काही कच्च्या गुरूचा चेला नव्हतो.

शेटजींचे बोलणें ऐकून अरविंदास एक शंका आली. ती शेटजींना विचारावी किंवा न विचारावी, ह्या विचारात प्रथम तो पडला, पण शेवटी मनाचा हिय्या करून तो त्याना म्हणाला,

"शेटजी, खरी बाकी दिली म्हणजे राहिलेल्या बाकीची सूट तुम्ही देणार होता, ह्याचा अर्थ मला समजत नाही. खरी बाकी दिली, म्हणजे दुसरी बाकीच राहाणार नाहीं. मग काय खरी नसणारी बाकी तुम्हाला वहींत दाखवावी लागते की काय?"

शेटजी थोडे हंसले व म्हणाले, "माफ करा. उगीच गैरसमज मात्र करून घेऊं नका, रावसाहेब! अडाणी लोकाशी आमचा व्यवहार. तेव्हा कागदी घालमेल थोडी करावी लागतेच आम्हाला! नाठाळ कुळाना वठणीवर आणण्यास आम्हाला दुसरा मार्ग तरी कुठे असतो?

" अशी घालमेल करण्यान तुमच्या अगावर बाजू येऊन तुम्ही पेचात नाहीं का सापडणार ? सरळ रस्ता सोडून आडमार्गाला लागण, केव्हाही धोक्याचच असणार ! "

" तुम्ही म्हणता ते सारं खर, रावसाहेब. पण करणार काय आम्ही ? गोरगरीब कुळं देतात बेतावेताने आमची बाकी. त्याकरिता कोर्टात जावं लागत नाहीं. पण बिलंदर कुळाकरिता मात्र असेच तोडगे करावे लागतात. वकील लोक कायदा शिकवितात ना त्याना ? गोड बोलून मुदत टळली कीं मग गुरकावूं लागतात असलीं कुळ आमच्यावर ! पण आम्हीही जेवढी खबरदारी घ्यावयाची तेवढी घेतोच आधीं ! "

" म्हणजे काय ? कायद्याच्या पेचातून तुम्ही कसे सुटता ? अशाने लाकाचा तुमच्यावरील विश्वास उडणार नाहीं का शेटजी ? "

" लोकाच्या विश्वासावर व त्याच्या निरक्षरपणावरच तर आमच्या सावकारीचा सगळा डोलारा ! आम्ही काय किंवा खेड्यापाड्यात सावकारीचा धदा करणारा दुसरा कोणीही काय कागदी मेळ बरोबर करून ठेवितोच. कायद्यात बाकी आणण्याकरिता आम्ही त्या कुळाच्या नावावर जमेचे व खर्चाचे कागदी व्यवहार करीत असतोच. वह्या चोख असल्या म्हणजे त्या कोर्टात टिकतात. म्हणून आम्ही सवडीने तशा वह्या लिहून ठेवितो. आणखी पुष्कळ पुष्कळ सावधगिरी ठेवावी लागते, रावसाहेब ! न करावी तर चालाव कस ? कोर्टात देण्याचे लहान लहान हप्त ठरवितात. आणि इतकेंही करून ते वसूल होण्याची पुन्हा दगदग ! "

शेटजींचे हें वाक्य संपते न सपते इतक्यात बळी पाटलाना घेऊन ते कूळ त्याच्या घरीं आले. त्या वेळीं अरविंदालाही तेथे पाहून पाटलानीं शेटजींबरोबर त्यालाही नम्रपणे रामराम केला.

पाटलाच्या पूर्वीच्या व आताच्या वागणूकीतील अतर पाहून अरविंदाला नवल वाटले.

तालुक्याच्या गावाहून घरी आल्यानतर पाटलाना बबीची हकिकत

समजली. ती त्याची अगदी आवडती मुलगी होती. ऐन वेळेला अरविंदाने निरलसपणाने केलेल्या मदतीचा परिणाम त्याच्या मनावर चागला झाला होता, म्हणून त्यांनीं नम्रपणे अरविंदाला रामराम केला. अरविंदानेही हें जाणलें व औपचारिक दोन शब्द बोलावे म्हणून तो म्हणाला,

" पाटील, आता मुलीची प्रकृति बरी आहे ना ? "

" अद्याप थोडा हात दुखतो आहे तिचा. काल रात्रभर आपल्याला तसदी पडली. मला आल्याबरोबर कळली सारी हकिकत. "

पुढे पाटील काहीं बोलणार इतक्यात मध्येंच ते कूळ शेटजींना म्हणाले,

" पाटलाना घेऊन आलोय, शेटजी. आता माझं काम करा. कागूद करायला जाण्यास आवशीस गाडी घेऊन येतो मी ! "

" तुला घाई झाली आहे फार. पण आम्हाला अगोदर पाटलाचा विचार घेतला पाहिजे. पैसे जमविले पाहिजेत. पैशाचे काम आहे हे ! अस घाईन होत असत का ?" शेटजी अगदी शातपणें म्हणाले. जितकी त्या कुळाची घाई होती, तिच्या अगदीं उलट शेटजींची शातता होती.

हे शेटजींचें बोलणे ऐकून पाटील म्हणाले,

" बर, पण सोसायटीच्या बाकीच कस करायच ? आमच्या गळ्याला तात लावून ठेविली आहेस तू ! देण फेडायचं नव्हत, तर कशाला आम्हाला गुतविलस ? करू नये ते करून बसलो मी. शेटजी, बघा तुमचं तुम्ही ! सोसायटीच्या पैशाची वाट लावल्याशिवाय मी नाहीं तुम्हाबरोबर कागदाला येणार ! मग दुसरा बघा रजिस्टरच्या ओळखीला कुणीही ! "

" तुम्ही येणार नाही ना ? बर !" शेटजी तुच्छतेनें म्हणाले. " कोणी उठाठेवी कराव्या असल्या कुळाबरोबर ! चोहोकडेच खाका वर करणार असले लोक ! "

कुळाचा जीव खालींवर होऊ लागला. ते पाटलाकडे व शेटजींकडे आळीपाळीनें कारुण्यपूर्ण नजरेने पाहू लागले. कोणासच पाझर फुटण्याचें चिन्ह दिसेना. दोघेही सावकारच ! पाटील सोसायटीचे चेअरमन म्हणून

व शेटजी तर बोलून चालून सावकार म्हणून. त्या उभयतानाही साव-कारीचा कैफ स्वाभाविकपणे चढला होता.

" मग काय ! " कुळ काकुळतीने बोलूं लागले, " माझ्या कुळाचा येल राखणार नाई तुम्ही पाटील ? पोराच लगीन झाल, तर येल राहील. पन तुमीच आडवून धरता पाटील ! "

" लगिनात चार पाण्याच्या घागरी आणण्याच काम साग आम्हाला. पण पैशाच नाही जमणार. पैशाच का झाड लागलाय माझ्या घरी ? दोन पैसे काढ शेटजींचे जादा व सोसायटीच देणही दे व लगीनही कर. "

पाटील सहानुभूतीचा आव आणून म्हणाले.

" पण मी पैसे कुठले देणार पाटील ? आणि कशाचे जिवावर ह्याला द्यावयाचे ? मागच्या बाकीचा हुकूमनामा हप्त्याहप्त्याचा आहे तयार. तो तरी वसूल होऊ द्या आमचा ! सारे पैसे मातीत घालून आमचा व्यवहार चालणार कसा ? " शेटजी पाटलाकडे पाहात म्हणाले.

कुळाचा जीव मात्र अर्धमेला होऊन गेला. त्याने पाटलाना एका बाजूस बोलावून फार गयावया केले. काहीं कानगोष्टीही केल्या. त्याचा परिणाम होऊन म्हणा किंवा कसेही म्हणा, पाटील शेटजींशीं हळू हळू बोलूं लागले. अरविंद गादीवर आडवा झालेला होता. त्याचे बोलणें पूर्णपणे त्याला समजलें नसले, तरी एकदरीत साराश मात्र त्याच्या लक्षात आला.

पाटलाचें म्हणणे असे होतें, की सोसायटीच्या बाकीसुद्धा शेटजीनी त्या कुळाला रक्कम द्यावी व काही दिवसानी सोसायटीचे कर्ज मंजूर करून शेटजींची रक्कम फेडावी. शेटजींचे म्हणणे असे की, मागील बाकी व आता द्यावी लागणारी रक्कम ह्याच्या दुप्पट रकमेचा दस्तऐवज कुळाने करून द्यावा व सोसायटीचे मिळेल तेवढे जास्तीच जास्त कर्ज घेऊन आपली सर्व बाकी फेडावी. अखेरीस होय, नाहीं, करिता करिता पाटलाना शेटजींचे म्हणणे कबूल करावें लागलें.

पाटलाच्या सोसायटीची दुर्दशा झाली होती. सेक्रेटरीने कागदी व्यवहार

बरोबर ठेविलेले असले, तरी सर्व व्यवहार अडाणी लोकाचे निशाणी-आगठे घेऊन केले असल्यामुळे त्यात घोटाळे फारच झाले होते. तशात तो सेक्रेटरीही काम सोडून गेला होता. त्यामुळे नाईलाजास्तव पाटील शेटजींच्या तत्रानेच कसा तरी सोसायटीचा कारभार पहात होते. वसुली करून बॅकेंत थोडाबहुत तरी भरणा करण्याचें प्रकरण त्याच्या अगदीं गळ्याशीं आले होते, त्यामुळे शेटजींचा कावा कळत असतांही पाटलाना त्याचे म्हणणे कबूल करावे लागले. कूळ तर अडचणींतच साप-डले असल्यामुळें, त्याला नाइलाजाने हे सर्व मान्य करावें लागलें.

नतर शेटजींनीं अरविंदास आणखी एक दोन निकालपत्राचे भाषातर करण्याची विनति केली, त्याकरिता आपल्या कागदपत्राचे रुमाल त्यानीं काढले. त्यातील दस्तऐवजावर ठिकठिकाणी निशाणी आगठेच अरविंदाच्या नजरेस पडले. तेव्हा शेटजींना त्याने सहज म्हटले,

" काय शेटजी ! तुमचा बहुतेक व्यवहार निशाणी आगठेवाल्याशींच दिसतो. ह्याना आपण काय लिहून दिल आहे, हें तरी समजतं का ? "

"तसं चागलं समजत हो त्योना ! "शेटजी म्हणाले." शिवाय न समजलं, तरी आम्ही त्याच्याशीं फार सवलतीने वागत असतो. "

शेटजीना आपली सचोटी अरविदास पटवावयाची होती. त्याना वाटत होते, की ह्या परक्या माणसासमक्ष जो व्यवहार झाला, त्यावरून कुळाशीं आपण फार जिकीरीने वागतों, अशी त्याची समजूत होईल म्हणून त्यानीं असें उत्तर त्यास दिलें.

" इतके दस्तऐवज तुमच्याकडे असले, तरी जमिनी काहीं तुमच्या ताब्यात नसतात ना ? ह्याचे पोट जर जमीनजुमल्यावर भरत नसेल, तर तुमचें देणे कसे फेडावे ह्यानीं ! पुढें मागे ह्याच्या जमिनीही तुम्हाला आपल्या ताब्यात घेण्याचा प्रसंग येईल, नाहीं का ! "

" बरोबर ओळखलेत, रावसाहेब." शेटजी म्हणाले, " पण आम्हाला जमिनींची जरुरी नसते. कारण जमिनीची मशागत त्याचे तेच करूं जाणे !

कितीतरी जमिनींचीं खरेदीखतें माझ्या नावचीं आहेत. पण जमिनी मात्र कुळाच्याच ताब्यात आहेत ! "

इतकें बोलून आपल्या म्हणण्याच्या समर्थनार्थ शेटजींनी पुष्कळ जमिनींची खरेदीखतें अरविंदास दाखविली. तीं पाहात असता एका खरेदीपत्रावर अरविंदाची नजर जास्त खिळून राहिली. थोड्या वेळाने अरविंद म्हणाला,

" मग काय, गावचा बराच भाग तुमच्या मालकीचाच दिसतो."

" सर्व दिसतो तो नावाचाच. " शेटजींनी उत्तर दिले " प्रत्यक्ष आम्ही जर ताबा चालवू लागलों, तर येथे आम्हाला कोणी राहूच देणार नाहीं, रावसाहेब. हा देश आहे. मुंबईच्या आसपासची वस्ती नव्हे ही ! तिकडे काय बहुतेक गावचे मालक सावकारच ! "

"पण समजा," अरविंद म्हणाला," सावकाराचं देणं इकडच्या लोकानी जमिनीची विक्री करून द्यावयाचं म्हटलं, तर गावच्या जमिनीचा कितवा हिस्सा विकावा लागेल ह्या लोकाना ? "

" रावसाहेब," शेटजी म्हणाले," निम्यापेक्षा जास्त जमिनी विकाव्या लागतील ! आमच्याच गावची ही स्थिति आहे, असं नव्हे. कोणतही खेड घ्या, तेथें अशीच स्थिति ! "

इतक्यात श्रीपती त्या ठिकाणीं पोस्टमनला घेऊन आला. त्या वेळी पाच वाजून गेले होते. अरविंदाच्या नावचे इन्शुअर्ड व इतर काहीं पत्रें होतीं, तीं त्यानें घेतली. शेटजींची काहीं पत्रे आलेलीं होतीं. तीं फोडून ते वाचू लागले. त्यातील एक पत्र त्याच्या मुंबईच्या वकिलाचे होते. त्या पत्रात अरविंदासंबधाने काहीं मजकूर होता. तो वाचून शेटजींना आश्चर्य वाटत होते. अरविंद इन्शुअर्डचे पाकीट फोडून त्यातील नोटा मोजून पाहात होता. ताबडतोब त्यापैकीं सखारामाच्या कापडाचे तीस रुपये त्यानें शेटजींच्या हवालीं केले. ते हातात घेत असता शेटजी म्हणाले,

" इतकी घाई कशाला ! माझे रुपये बुडतात थोडेच ! तुम्ही मोठे

आहात, हें मी जाणलंच होत. आमच्या वकिलाच पत्र आल आहे आताच. त्यात तुमची माहिती विचारली आहे. त्यानी काहीतरी लिहिलय झालं ! मी आता चागलं खरपूस उत्तर लिहितो त्याना. वकिलाला सारींच माणसं वाईट दिसतात. हा धद्याचा गुण बरं, रावसाहेब ! ''

" अस लिहिलंय तरी काय तुमच्या वकिलान ! का विनोद करता, शेटजी ! '' अरविंद उतावीळपणाने बोलला.

" रावसाहेब, मी का थोरामोठ्याची थट्टा करतो म्हणता ! बघा तुम्ही हे पत्र ! मग मी काय म्हणतो ते कळेल तुम्हाला ! ''

आपलीं पत्रें वाचून पाहण्याचे काम तसेच ठेवून अरविंदाने शेटजींच्या हातचे पत्र घेतले ते त्याने वाचले. त्याचा चेहरा गभीर झाला. त्याच्या अंतःकरणास वेदना होऊं लागल्या. तेथे बसणेसुद्धा त्यास दुःसह झाले. तावडतोब तो तेथून उठला. शेटजींकडे पाहून " येतों मी '' असें म्हणून तो श्रीपतीबरोबर झपाट्याने बाहेर पडला. शेटजी तोंडातून शब्द काढणार तोंच तो दाराबाहेर पडला देखील ! कागदपत्राचा पसारा तेथेच मोकळा ठेवून शेटजींना खोली सोडता येईना. त्याच्या वकिलाचें पत्र अरविंदाच्या हातातच राहून गेले.

अरविंद तडक निघाला, तो सखारामाच्या मळयावरून त्याची विचारपूस न करिताच पुढें चालला. वाटेत जिजाने त्याला हाक मारली, परतु त्याने तिकडे यत्किंचितही लक्ष दिले नाहीं. एवढेच नव्हे, तर श्रीपतीस घरीं जाण्यास सागून आपण थेट रामसीतेच्या डोंगराजवळील जगलात शिरला व तेथे एका वृक्षाखालील शिळेवर बसला. त्याचा उद्विग्न चेहरा त्याच्या मनातील दुःख स्पष्ट करीत होता. सुदर रोपट्याचें मूळ दुखावले तर त्याचा परिणाम पानाफुलावर होतोच नाहीं !

---

## प्रकरण बारावे.

# गुंफेतील भुताटकी !

अरविंद त्या शिळेवर बराच वेळ बसला होता. त्याचे मन फार हळवें होते. हळव्या मनाच्या माणसावर जगाच्या बऱ्या वाईट बोलाचा परिणाम तेव्हाच होतो. असे लोक जगाचे टक्के टोणपे खात खात नंतर खंबीर मनाचे बनतात. अरविंदाला असा जगाचा अनुभव अद्याप फारसा आलेला नव्हता.

तो एक सरळ मनाचा ध्येयवादी तरुण होता खेड्यापाड्यातील अज्ञ जनतेचा उद्धार झाल्याशिवाय राष्ट्राचे पाऊल पुढे पडणार नाही, शहरातील व्यासपीठावरून केलेल्या गंभीर वक्तृत्वाने खेड्याचा उद्धार होणार नाही, खेड्यापाड्यातूनच प्रत्यक्ष कार्य केले पाहिजे, असे जे थोर लोक म्हणत असत, त्याचे महत्त्व त्याला आता पटले होते. अकल्पित योगायोगाने शहरापासून दूर अंतरावरच्या खेड्यात येऊन तो पडला होता आणि तेथील परिस्थितीचे निरीक्षण करण्याची संधि त्याला मिळाली होती. माळावरील प्रदेशातून अनवाणी चालणाराना जसे पदोपदीं सराटे बोचतात, तसाच त्रास खेड्यापाड्यात कार्य करणाराना ग्रामकंटकापासून होतो, ह्याचा थोडा-बहुत अनुभव सोनगावातच त्याला मिळाला होता.

पण मुंबईच्या आपल्या चांगल्या परिचयाच्या एका मोठ्या वकिलाचाही आपल्यासंबंधाने गैरसमज कसा व्हावा, त्याने आपल्यावर अनैतिक असाही आरोप का करावा, ह्याचे कारण त्याने कितीही विचार केला तरी त्याच्या लक्षात येत नव्हते. ते त्या वकिलाचें पत्र त्याने पुन्हा पुन्हा वाचले, त्यातील एक दोन वाक्याची तर त्याला अत्यंत चीड आली. तो मनात म्हणूं लागला, ' त्या वकिलाला पत्र लिहावयाचे होते, तर त्याने मलाच

का लिहू नये ! त्याचा गैरसमज मीं दूर केला नसता का ! शेटजी त्याचे पक्षकार असतील, पण त्याच्यावर इतका विश्वास टाकण्यात आपण मोठी चूक करीत आहोंत, असे त्याला का वाटलें नाहीं ?"

एकाद्या आकस्मिक प्रकारानें प्रथम मनाला उद्वेगाचा झटका बसला, तरी थोडा वेळ गेल्यानंतर त्याचा जोर कमी कमी होऊं लागतो, तसाच प्रकार अरविंदाचा होऊं लागला. त्यानें पुन्हा एकदा वाचण्याकरितां तें पत्र हातीं घेतलें.

जो मजकूर शेटजींना क्षुल्लक स्वरुपाचा वाटला, त्याच मजकुरानें त्याच्या अतःकरणास घरें पडत होतीं. लोकापवाद सहन करण्याची त्याच्या मनाला सवय झाली नव्हती.

त्यानें त्या पत्रावरून पुन्हा नजर फिरविली. तो मनाशीं विचार करू लागला. त्यावेळी त्याच्या मनात विचाराचे काहूर उठलें. इतक्यांत ज्या आम्रवृक्षाखाली तो बसला होता, त्यावरील पक्ष्यानीं टोचा मारलेलें एक फळ त्याच्यासमोर पडले. पक्कदशेस येऊं लागलेलें तें फळ आता पालापाचोळ्यात विलीन होऊन जाईल आणि त्याचा गोड आस्वाद चाखण्याचें भाग्य त्या पक्ष्याला नाहीं व दुसऱ्या कोणालाही नाहीं, ह्याचें त्याला वाईट वाटलें. त्याने वर त्या पक्ष्याकडे पाहिले. त्या पक्ष्याची नेहमींची किलबिल चालू होती. पण अरविंदाला त्या वेळीं वाटले, कीं तो पक्षी हेटाळणीच्या स्वराने आपल्याला हसतच आहे !

त्या पक्ष्यावरील आपली नजर फिरवून तो समोर पाहू लागला. अगदी समोरच फळाच्या भारानें लवलेली कवठीची फांदी त्याच्या नजरेस पडली काहीं पक्षी तीवरील फळावर टोंच्या मारीत होते, पण त्या फळाचें भरभक्कम कवच त्या टोचाना दाद देत नव्हते. हा प्रकार पाहून त्याला वाटलें, कीं ह्या फळासारखें आपलें मन भक्कम असलें म्हणजे आपणालाही असल्या लोकापवादाची पर्वा वाटणार नाहीं.

वकिलाच्या पत्रातील जो मजकूर त्याच्या मनाला जास्त लागला होता,

तो असा होता —

" अरविंद नावाच्या आमच्या मित्राचे वास्तव्य तुमच्या गावीं बरेच दिवस आहे. तो एका सुंदर तरुणीला तुमच्या गावी पोहोचविण्याकरिता ठाण्याहून गेला. वास्तविक तो तात्काळच परत यावयाचा. परंतु तो अद्याप आला नाहीं. तो त्या तरुणीच्या पाशातही अडकलेला असावा, असा आम्हांस बळकट संशय येतो. तरी खरी हकिकत कळवावी आणि आमच्या मित्राची कानउघाडणी करून त्याचा नैतिक अधःपात थांबवावा व त्याला मुंबईस परत पाठवून द्यावे.... . ......"

त्या पत्रावरील ओळींवरून त्यानें पुन्हा नजर फिरविली व तो मनात म्हणू लागला,

" काय आचरटपणा हा ! माझा अधःपात होत आहे, हें त्याला मुंबईत बसून कसें समजलें ? कल्पनेचे डोलारे उभारण्यास त्याला कोणता आधार मिळाला ? जिजा कोणत्या परिस्थितीत सापडलेली होती ही गोष्ट मधुकरास माहीत होतीच. अशा अप्रसिद्ध माणसाकडे त्यानें अशी चौकशी करणें मित्र म्हणविणारास शोभते का ? जिजा सुंदर आहे. होय. ती तशी आहे, पण माझा नैतिक अधःपात होत आहे, असें लिहून मजवरच नव्हे, तर त्या निष्पाप तरुणीवर कुत्सित हल्ला करून तो आपला स्वतःचाच नैतिक अधःपात करून घेत नाहीं का ? किंवा ह्याच्या बुडाशीं काहीं कारस्थान आहे ? विमलला तुसडेपणाने मीं जे पत्र लिहिलें, त्याची प्रतिक्रिया अशा स्वरूपात होते कीं काय ? पण, छे ! मीं कसेंही लिहिलें असलें, तरी विमल असें कारस्थान रचण्यात सामील होणार नाहीं. तिचें मजवरील प्रेम असें लेचेंपेचें नाहीं. माझ्या पत्राने तिला राग आला असेल, पण भलताच संशय घेऊन अशा कपटनाटकात ती मुळींच सामील होणार नाहीं. मग ह्या वकील मित्रानें असें का लिहावे ! "

अरविंदानें आपला मस्तकाला पुष्कळ शीण दिला; परंतु ह्या घडलेल्या गोष्टीची कारणपरंपरा त्याला नीट जुळविता येईना. ' असेल त्या मित्राची

एक चमत्कारिक लहर झाले ! ' असे मनात म्हणून त्याने एक सुस्कारा टाकला.

त्यावेळीं त्याचा हात सहज खिशात गेला. शेटजींच्या घरी जे इन्शुअर्ड पत्र आले होते, तें परस्पर बॅंकेनेच केलें होते शिवाय दुसरे एक पत्र होते, ते त्याने अद्याप फोडलेंच नव्हते ! हात खिशात गेल्याबरोबर त्याच्या हाताला ते पत्र लागले त्याने ते चटकन् बाहेर काढले व फोडले. त्यातील मजकूर तो वाचू लागला. त्याबरोबर त्याच्या मनःक्षोभ वाढू लागला पत्राचे वाचन त्याने कसेबसे पुरें केले त्या पत्राने त्याचे डोकें अधिकच भणाणले ! एखाद्या सुरुंगाचा स्फोट झाल्याबरोबर कातळाच्या जशा ठिकऱ्या ठिकऱ्या उडून जातात, तशी आपल्या मस्तकाची स्थिति होते, की काय असें त्याला वाटू लागले

ज्या दुसऱ्या पत्राने अरविंदाचे मस्तक इतके भडकले, ते पत्र मधुकराचे होते ! त्यातील मजकुराने त्याच्या मनास अत्यंत वेदना होऊ लागल्या वकिलाच्या पत्रानें अगोदरच त्याच्या मनास धक्का बसला होता, त्यात ह्या पत्रामुळे भर पडून तो अगदी वेड्यासारखा झाला !

" तुझ्या पत्रानंतर विमलनें व आम्ही पुष्कळ विचार केला कसलीच तोड निघेना. शेवटीं तू लिहिल्याप्रमाणे जहागीरदारीण होण्याचें तिनें पसंत केले आहे. .. .. "

वरील मजकूर त्या दुसऱ्या पत्रात होता. आपल्या पत्रातील खरा हेतु कोणालाच कळला नाहीं, ह्याबद्दल त्याला अत्यंत दुःख झाले व नकळत त्याच्या डोळ्यात अश्रु उभे राहिले.

त्या वेळी रातकिड्याची किर किर सुरू झाली. वृक्षलतांची हालचाल बंद होऊन त्यांनी स्तब्धता स्वीकारली. दाट काळोखामुळें त्या अरण्यातील भीषणतेने उग्र स्वरूप धारण केलें. पण अरविंदाची मनःस्थिति इतकी बेभान झाली होती, कीं त्या भीषणतेचा परिणाम त्याच्या मनावर मुळीं सुद्धा होत नव्हता !

पण थोडया वेळानें अरविंद ज्या शिळेवर बसला होता, तिच्या पुढून एक प्राणी मोठी गर्जना करीत आडवा निघून गेला त्यामुळे त्याचें चित्त एकदम ठिकाणावर आले. एर जंगलात काळोख पडेपर्यंत तो कधीं बसत नसे. त्यामुळे त्या ठिकाणची रात्रीची भीषणता त्याच्या मनाला जास्त भासू लागली. तो उठला. जंगलातून एक एक पाय तो जपून टाकू लागला. वृक्षाच्या दाटीमुळे काळोखाच्या काळेकुट्टपणास भरती आली होती. त्यामुळे त्याला मार्ग शोधणें कठिण पडू लागले. पाच पचवीस पावले टाकीपर्यंत त्याचे अंतःकरण एकसारखे धडधड करीत होते! परंतु पुढे हळू हळू धीर येऊ लागला त्याला सरळ मार्ग सापडेना. बराच वेळ तो त्या जंगलातून भटकत होता, तरी त्याला त्यातून बाहेर पडता आले नाही. इतकेच नव्हे, तर तो पुन्हा पहिल्या जागीच आला

मनात गोंधळ उडालेला असता माणसाने कितीही धडपड केली, तरी इष्ट प्रगति होत नाहीं, असा एक विचार त्या वेळी त्याच्या मनात झटकन येऊन गेला. पुन्हा जास्त सावधपणे तो मार्ग शोधू लागला. शेवटीं एक-दाचा ठेचाळत ठेचाळत तो जंगलाच्या बाहेर आला!

इतक्यात त्या रस्त्याने श्रीपती येत असलेला त्याला दिसला. त्याच्या हातीं कंदील होता. तो त्याची वाट पाहात तेथेच उभा राहिला.

श्रीपती झपाट्याने येत होता. आता वाराही जोरानें वाहू लागला होता त्यामुळे त्याच्या हातचा तो चौकोनी जुनाट कंदील विझला. अगदी जवळ आल्याबरोबर अरविंद त्याला म्हणाला,

"श्रीपती, पुष्कळ उशीर झाला तुला. कसल्या कामात होतास?"

ते शब्द ऐकताच श्रीपतीस फार आश्चर्य वाटले व तो म्हणाला,

"इतक्या काळोखात तुम्ही इथ कस? का परत आमच्याकडेच चालला होता दादा!"

अरविंद काहीच बोलला नाहीं. ते दोघे वाट चालू लागले. थोडया वेळानें श्रीपती म्हणाला,

" दादा, असं काय झालंय तुम्हाला आज! जिजीने कितीतरी हाका मारल्या तुम्हाला घरावरून जाताना. पण तुम्ही तोंडही फिरवलं नाहीं ! "

" काही नाहीं रे, श्रीपती ! " अरविंद खिन्नतेनें म्हणाला.

काहींतरी आकस्मिक कारणामुळे आज दादाची मनःस्थिति ठिकाणावर नाहीं हे त्यानें ताडलें व म्हणाला,

" पण दादा, इतका वेळ कशापाई जंगलात बसला तुम्ही? एकादं जनावरू यायचं उड्या मारीत! मलाही येळ झाला निघायला! जिजा म्हणाली, दादाना आज घरीच घेऊन ये चलता का परत घरीं ! "

'आता घरीं कशाला ? ' अरविंद म्हणाला "चल, आपण रामगुफेकडेच जाऊ. आज तुला नव्या गोष्टी सांगणार आहे मी. तुझे सवंगडी केव्हापासून येऊं लागणार आता पुन्हा ? "

' दादा, चार दिवस त्याना शिकण्यात गम्मत वाटत होती " श्रीपती बोलू लागला, " म्हणून हौसेनं येत होते ते ! पण ते आता अळंटळं करू लागले आहेत. चार अक्षरं येतात त्याना, पण रोज वाचलं नाही तर विसरून जातील, म्हणून मी त्याना बोलावतो. पण अजून मेळच बसत नाहीं. तुम्ही सरकारी हुकूम आणा, म्हणजे आपोआप येतील ते ! "

श्रीपतीने खरी स्थिति वर्णन केली. लोकांची हौस सतत टिकविण्या-सारखी आकर्षकता तरी कार्यक्रमात पाहिजे, किंवा सरकारी दडपण तरी पाहिजे, ही गोष्ट अरविंदाच्या मनाला पटली.

ते पुढे चालले झपाझप पावलें टाकीत त्यांनीं रामगुफा गाठली. श्रीपती दारास कुलूप लावून गेला होता, म्हणून तो ते उघडण्यास गेला. परंतु त्या वेळीं दार उघडेच होते आपणच कुलूप लावण्यास विसरलों, असें त्याला वाटून तो न बोलता आत शिरला त्याला कंदील सांपडेना. मूळच्या ठिकाणीं कंदील नव्हताच, तर सापडणार कसा ? काड्याच्या पेटीचा त्याने शोध केला, पण तीही सापडेना. तो फार बुचकळ्यात पडला. अशा वेळीं आपल्या खिशात चकमक असती, तर तिचा

कितीतरी उपयोग झाला असता, असे त्याला वाटले

श्रीपती कदील शोधीत होता त्या वेळी अरविंद तेथे न थांबता राम कुंडावर गेला. त्यानें हातपाय स्वच्छ धुतले मस्तकावर पाणी थापटलें व शांतपणें नेहमींच्या शिळेवर आसनस्थ झाला आज त्याच्या मनाला अत्यंत त्रास झाला होता, त्यामुळे काहीं वेळ ध्यानधारणेत घालवावा म्हणजे मन शांत होईल अशा समजुतीनें तो तेथें बसला. परंतु मन चंचलच ते! आज मुळींच आवरेना विमलसंबंधींचे व मुंबईहून आलेल्या पत्रासंबंधींचे विचार त्याच्या मनात गोंधळ घालीत होते. तो प्रयत्नवादी तरुण होता. निग्रहानें चित्त ठिकाणावर आणण्याचा तो प्रयत्न करीत होता. काहीं वेळ ती गोष्ट साध्यही होई, परंतु नेहमींची शांति त्याला त्या वेळीं लाभेना. अशा प्रकारें किती वेळ गेला, हें त्याला कळले नाहीं!

तो वद्य सप्तमीचा दिवस होता त्या वेळीं पूर्व दिशा उजळूं लागली. काहीं वेळानंतर तिच्या भालप्रदेशीं चन्द्रमा शोभा देऊं लागला तारकारूपी तेजस्वी रत्ने त्या शोभेंत अप्रतिम भर घालूं लागलीं. शीतल वायुलहरींनीं अरविंदाचें मस्तक आता शांत होऊं लागलें त्याने आपले नेत्र उघडले त्या वेळचा तो देखावा पाहून त्याला अवर्णनीय आनंद झाला.

पण हा आनंद फार वेळ टिकला नाही कारण अरविंदाच्या अंगावर लहान लहान खडे येऊं लागले त्याने सभोवतीं नजर फिरविली. परंतु खडे कोठून येतात, ह्याचा त्याला अंदाज करिता येईना. थोड्या वेळानें करवंदेंही अंगावर येऊं लागलीं आणखी काहीं वेळानें पक्ष्यांनीं चोचा मारलेलीं आम्रफळेंही त्याच्याजवळ येऊन पडूं लागलीं. अरविंद दिङ्मूढ झाला. त्याने श्रीपतीस हाक मारली, पण त्याचा पत्ता नव्हता. त्याच्या अंतःकरणात थोडीशी भीतिही उत्पन्न झाली!

पुढे एका झाडाआड होत असलेली हालचाल त्याच्या नजरेस आली. एक काळीकभिन्न आकृति आपल्याकडे येत असलेली त्याला दिसली. ती हळू हळू एक एक पाऊल टाकीत येत होती. आता मात्र अरविंदाच्या

मनात फार भीति उत्पन्न झाली. ती आकृति जवळ आली, तर काय उपाय करावा, ह्या विचारात तो होता. पण इतक्यात " दादा, दादा " अशा हाका ऐकू आल्या. तो श्रीपतीचा शब्द ऐकून अरविंदास धीर आला. ती आकृतिही श्रीपतीचे ते शब्द ऐकल्याबरोबर थबकली. वळणावळणाने वाट काढीत जंगलात अदृश्य झाली. अरविंदाजवळून जाताना मात्र त्याला पुढील उद्गार ऐकू आले

" माकाड म्हनतुया आमाला, तवा बघ. आता माकडानं काय केलय त्य ! शिरप्या नसता, तर आनिकबी माकडचेस्टा दाविली असती ! "

हे उद्गार ऐकल्याबरोबर अरविंदाची भीति पार निघून गेली. तो धिमे धिमे रामगुंफेकडे येऊ लागला. श्रीपतीने आपला कंदील लावला. तो खोलीत शिरला. तेथील एकदर देखावा पाहून त्याला प्रथम आश्चर्य वाटले. नतर त्याला भीतिही वाटू लागली ! सर्व सामान अस्ताव्यस्त फेकून दिलेले होते ! सर्व खोलीभर कोंबडीची पिसे व हाडकें पडलेली होती ! कंदील ठिकाणावर नव्हता. त्याने तावडतोब आपला पाय बाहेर काढला. बरोबर आणलेली शिदोरी तो पाहू लागला. तो काय ! भाकरीचे तुकडे चोहोंकडे पसरलेले होते ! दुधाचे भाडे एका कोंपऱ्यात उपडें पडलेले होते ! ह्या सर्व प्रकारामुळे त्याची घाबरगुंडी उडाली ! तो अरविंदास जास्त जोराने हाका मारू लागला. त्याचा स्वर कंपित झाला ! इतक्यात अरविंद तेथे आला.

" काय, श्रीपती ! इतका घाबरलास का ? इतका वेळ काय करीत होतास ? " अरविंदाने शातपणे विचारले.

" दादा, दादा ! हथ भूत आलं दिसतय. बघा तर तुमची खोली ! हथ काहीं तरी पाप झाल्याशिवाय कोणी भूत यायच नाहीं, दादा ! " श्रीपती घाबरट स्वरात म्हणाला.

अरविंदाने खोलींतील देखावा पाहिला. त्याच्या लक्षात खरी स्थिति आली होती, म्हणून त्याला त्याचे काहीं आश्चर्य वाटले नाहीं.

" इतका वेळ तू होतास तरी कुठे ? मघा तर असें झाले नव्हते ना ! "

"कुणाला ठावं मघा काय होत ते!" श्रीपती बोलू लागला. "मला काड्याची पेटी गवसना म्हणून पुन्हा घरीं गेलो व पेटी घेऊन आलों. इथ पाहातो तों, भुताचा सारा कारभार! बघा तरी हे भाकरीच तुकड व दूधही भुतानं पिऊन टाकल कीं!"

अरविंदास हसू आले. त्यामुळे श्रीपती पुन्हा म्हणाला, "दादा, हसताय कसल! मी तर उगदीं भ्यालोय आन् तुमी तर हसताय! तुम्ही म्हणता भुत न्हाइती. आता तर तुम्हाला दिसतोय की नाहीं त्याचा खेळ?"

"काय सागाव श्रीपती तुला! आता मी रामाचा जप करून सारी भुताची भीति नाहीशी करतो तुझी!" अरविंद हसत हसत म्हणाला.

श्रीपती काहीच बोलला नाहीं. तो स्वस्थ विचार करीत बसला. भुताची कल्पना त्याच्या मनातून जाईना. शेवटीं अरविंदानें शेटजींच्या येथें घडलेली व आता ऐकलेली सारी हकिकत त्याला सांगितली. तेव्हा त्याची भीति कमी झाली व तो म्हणाला,

"दादा, मघाच जर सागता, तर त्याला जिताच पुरला असता!"

"श्रीपती!" अरविंद म्हणाला, "तू आता काहीं गडबड करू नकास. तो बच्चा अगदीं आडदांड आहे. वेड्याशीं भांडून आपल्याला का वेड व्हायच आहे? तो त्या शेटजींनाच वळतो, ह्याचे कारण शेटजीच युक्तिवान् दिसतात!"

"शेटजीला थरथर कापतो तो! काय कसब शेटजीच आहे, हें कळत नाहीं आम्हाला!"

"कसब कसल म्हणतोस? शेटजीचा धंदा सरळ असतो का रे? तुझ्या जमिनीची तर काहीं भानगड त्यानी केली नाहींना?"

श्रीपती घोटाळ्यात पडला. तो काहीं बोलणार इतक्यात अरविंदानें तो विषय बदलला. आणि आपणच साफसफाई करू लागला. त्यामुळे श्रीपतीही त्याच कामास लागला म्हणून ते बोलणे तेथेंच थांबले.

---

## प्रकरण तेरावे

# आना कागूद, करतु आंगट !



दुसरे दिवशी सकाळीं अरविंदाचे व्यवहार नेहमीप्रमाणे सुरू झाले. श्रीपतीचे मन मात्र अस्थिर होते. अरविंदाच्या रात्रीच्या बोलण्यावरून आपल्या जमिनीसबंधी शेटजींनी काय घोटाळा केलेला आहे, हे जाणण्याची उत्कंठा त्याला लागलेली होती. त्यामुळे सकाळीं घरी जाण्यास त्याचा पाय तेथून निघेना. अरविंदाच्या नित्यक्रमात व्यत्यय आणून मध्येच त्याला विचारणे श्रीपतीस योग्य वाटेना. त्या दिवशीं अरविंदाचा वेळही ध्यानधारणेंत बराच गेला गाईचे दूध आणण्याची वेळही टळून गेली. शेवटीं, बऱ्याच वेळाने तो तेथून निघाला. तो जात आहे, हे अरविंदाच्या नजरेस आल्याबरोबर तो त्याला म्हणाला,

" श्रीपती, आपण आता सायंकाळी पुष्कळ बोलत बसू. आज आपल्या तरुण मित्राना घेऊन येण्यास चुकू नकोस हो ! "

" आज दादा, आणतोच सान्याना कमही करून ! बच्चाला हात दाखवायला सार जमविलच पाहिजे मला ! "

" तसला अविचार मात्र आता करायचा नाहीं, ह ! आणखी मीं तुला सांगितलेली हकिकतही कोणाला सांगू नकोस लक्षात राहील ना तुझ्या हे ! "

श्रीपती काहीं न बोलताच वाट चालू लागला. त्याच्या मनात बच्चा व शेटजी हेच त्या वेळी घोळू लागले. तो एक एक पाऊल उचलीत उचलीत कसातरी आपल्या झोपडीजवळ आला व आपल्या गाईच्या गोठयाकडे वळला. तेथे धार काढणें चालू होते. धार काढणाऱ्या व्यक्तीचा स्वर कानीं आल्याबरोबर त्यास आश्चर्य वाटले. जिजाचे व त्याचें बोलणे गोठींत

चाललेले ऐकून त्याच्या संतापाचा पारा चढला. तो कुडाच्या आड उभा राहून त्याचा संवाद ऐकू लागला. त्या वेळीं जिजा म्हणाली,

" बच्चाजीराव, मला नव्हत वाटल, तुमचा स्वभाव इतका चांगला असल अस ! मला धार काढू न देता, तुम्हीच काढू लागलात. आता रामगुफेंत दूधही पोंचवावयास जाणार म्हणता तुम्ही ? "

" कामाच काय, माज्या हातचा मळ है ! लगबग पळत जाईन धरम-शाळत अन् दूद देऊनशान तवाच परतबी येईन ! मी काय, शिरप्या है वाटत ? इतका दीस आला तरीबी त्यो भटकतुया जंगलामदी ! "

" तुम्ही काम कराल, म्हणूनच सांगतें ना तुम्हाला मी ! श्रीपतीला आहे कुठं कुणाची काळजी ! तुम्ही आता आलात म्हणून दूध तरी पोंचेल वेळेवर ! "

शेटजी गावाला गेले, कीं बच्चाचा पाय घरी ठरत नसे. कालच्या रात्रीची उडालेली गमत ऐकण्याकरिता मुद्दाम शेटजींची बाकी मागण्याच्या मिषानें तो श्रीपतीकडे आला होता. तेथें जिजाला एकटीच पाहून घुटम-ळला. तिचे आईबाप शेतात काम करण्याकरिता गेले होते. तिलाही गोड बोलून त्याच्याकडून काम करवून घ्यायचें होतें. सुंदर तरुणीच्या गोड वाणीने कोणास भुरळ पडत नाहीं ? मग आडदांड बच्चाला तरी का पडू नये ?

" दूद तर नेतुयाच मी ! पन आनकी कायबी न्यायच असल तरीबी नेईन मी ! मी आगचुकार सिरप्या नव ! " दुधाची चरवी खालीं ठेवीत बच्चा म्हणाला.

आपल्याला अगचुकार म्हटल्याबरोबर श्रीपतीच्या मनाचा भडका उडाला.

" तुम्ही आगन्तुकार नाहीं, हे मला ठाऊक आहे. श्रीपतीची आणि तुमची बरोबरी कशाला ? कामाचा ढीग पडला, तरी तुम्ही तेव्हाच तो उडवून द्याल ! येताना कालचे दुधाच भांडं घेऊन या म्हणजे झालं ! " जिजा बच्चाला फुगविण्याच्या हेतूने म्हणाली.

श्रीपतीला तिच्या बोलण्यातील मर्म लक्षात आले नाहीं. ती बच्चाची

स्तुतिच करीत आहे, असे त्याला वाटले. त्यामुळे तिच्यासबधीं त्याचे मन कलुषित झालें. बच्चासारखा दुष्ट मनुष्य आपल्या घरीं यावा व जिजाशीं त्याने लाडीगोडी लावावी, ह्याबद्दल त्याला अत्यत राग आला. त्याला आता तेथे उभे राहवेना. पण बच्चा निघून गेल्याशिवाय आपण तेथून हलू नये, असा त्यानें विचार केला वायुवेगानें दुधाचें भाडे घेऊन बच्चा जो पळाला, तो दिसेनासा झाला !

थोडया वेळाने श्रीपती घरात आला जिजाने त्याला पाहिल्याबराबर ती एकदम म्हणाली, " आज इतका वेळ का लागला ? दादाना दूध न्यायच नव्हत वाटत ? "

" तुमच बच्चाजीराव आहेतच तुमच पडल ते काम करायला ! शिरप्या आगचुकार, त्याला काळजी नाही कशाची ! "

श्रीपतीची वक्रोक्ति लक्षात येऊन जिना म्हणाली,

" इश्श, चोरून ऐकलेल खरच मानावयाच वाटत ? "

" तोंडावर खर कोण बोलत असत ! पाठीमाग माणूस खरं बोलत ! "

" पण मी का आगचुकार म्हणत होतें, तुम्हाला ? "

" तूं नाहीं म्हणालीस, पण माझ्यापेक्षा बच्चाजीराव चागला म्हणाली नाहींस वाटत ? आता वाईट माणसान कशाला राहावा इथ ? मी बाबाना व काकूना सागून आपला वेगळा राहतों आता ! " श्रीपती रागात बोलला.

" दूध पोचवायला उशीर होईल, म्हणून मी बोलत होते काहींतरी ! मीच जाणार होतें तिकडे, पण काल दादा रागावल्यासारख दिसल म्हणून नाहीं गेले मी ! "

" मग काय बच्चा न बोलावता आला वाटत इकडे ? "

" सहज तो तुमचा शोध करीत आला व मी काम करतों म्हणाला. "

" लुच्चा कुठला ! काल त्यान रामगुफेत काय गेर केल, ते ठाऊक आहेत का तुला ? "

" काय बाई, काय केलन रामगुफेत त्यान ? तुम्ही होता ना तिथ ? "

" सागण्यासारख नाहीं ते ! दादानीं कुणाला साग नको, म्हटलय मंग. पण जिजा, बच्चा चागला दिसतो ना तुला ? "

इतक्यात सखारामबाबा झोपडींत आले. श्रीपती गोठ्यात जाऊन कपिलेच्या पाटीवरून हात फिरवू लागला. खोडही डरकळी फोडू लागला, म्हणून तो त्याच्याजवळ जाऊन त्याची पोळी चोळू लागला

थोडया वेळाने बच्चा धावतच परत आला. जिजाला हाका मारीत तो झोपडींत शिरू लागला. पण सखारामबाबा तेथे असल्यामुळे तो थबकला. बाहेरूनच जिजाला उद्देशून म्हणाला, ' दूद पोचवूनशान आलया मी ! "

" कालच भाड नाहीं कुट आणल तें ! "

बच्चा काहीं बोलला नाहीं त्याने दुधाचे भाडे म ितल होते कोठे ? कालच्या प्रकारामुळे अरविंदास तोंड दाखविण्याची त्याची छातीच नव्हती. रामगुफेच्या बाहेरील बाजूस दूध ठवून तो परत आला होता. त्यामुळे तो जिजाच्या प्रश्नाला काय उत्तर देणार ? तरी पण तो म्हणाला,

" भाड आनील शिरप्या ! तत पडलाय लोळत गाडवासारका ! "

हे शब्द ऐकल्याबरोबर श्रीपती अत्यत क्रुद्ध झाला तो बाहेर आला त्याने बच्चाचे मनगट जोराने पकडलें व तो दात ओठ खात म्हणाला,

" काय म्हणालास ? पुन्हा बोल बघू ! तुझी जीभच तोडून टाकतों आता ! अधारातला चोर नव्ह मी ! "

बच्चा थरथर कापू लागला. त्याच्या तोंडातून शब्द उमटेना. सखाराम व जिजा श्रीपतीची समजूत करू लागले. त्यामुळें बच्चाला जोर चढला. तो मनगट सोडवून घेण्याचा प्रयत्न करू लागला. श्रीपती त्याला आता लोळविणार असे वाटू लागलें, तेव्हा सखाराम दोघाच्या मध्यें पडला. त्यामुळें श्रीपतीचा नाइलाज झाला. त्यावेळीं जिजाही म्हणाली,

" जाऊं द्या. शहाण्या माणसान असल्याच्या नादीं कशाला लागाव ! जर का तुम्ही लवकर आला असता, तर बच्चाजीरावाना त्रास कशाला पडला असता ! "

जिजाच्या ह्या बोलण्याचा अर्थ श्रीपतीस चागला समजला नाहीं. त्याला वाटले, ती बच्चाचीच बाजू घेत आहे. त्यामुळे तो तिच्याकडे सशयी नजरेनें पाहू लागला. इतक्यात सधि साधून बच्चा निसटला व त्यानें घराकडे धूम ठोकली

श्रीपतीच्या प्रयत्नाने तरुण मडळी रामगुंफेत पुन्हा जमू लागली, पण त्याना लिहिण्यावाचण्यात विशेष गोडी वाटेना. अरविंदाला आरभीं वाटत होते, की खेड्यातील लोकाना साक्षर करण्याचे कार्य आपल्याला लवकर करता येण्यासारखें आहे. लोकाच्या आरभीच्या उत्साहावरून तसे वाटणे साहजिकही होते. पण पुढे तो उत्साह टिकत नसतो ह्याची जाणीव त्याला आता जास्त जास्त स्पष्ट होऊ लागली.

चार आठ दिवसानतर शिक्षण घेणारा एक एक तरुण गळू लागला ह्याचे कारण मात्र आता वेगळें होते. नारूच्या साथीनें सोनगाव व्यापून गेले होते. गावच्या पडक्या विहिरींतील पाण्याचा प्रताप आता मूर्तिमत दिसू लागला ! थोड्या अतरावरून लोक जर पाणी आणते, तर ही साथच मुळीं उद्भवली नसती निदान गाळून पाणी पिते, तरीही ह्या साथीचा प्रसार झाला नसता. पण अज्ञान, आळस, हट्टीपणा इत्यादि शत्रूंपुढें त्या लोकाचें काही चालतच नसे. शिवाय शरीरातील ताकद दारिद्र्यामुळें उत्तरोत्तर कमी झालेली, मग साथींच्या रोगास वावरण्यास सर्व रान मोकळें सापडल्याशिवाय कसे राहणार ?

अरविंदाचें लक्ष आता ह्या रोगाचा प्रतिकार करण्याकडे लागले. त्याकरिता त्याने मुबईहून औषधे मागविलीं. तो नित्य गावात जाऊन आजारी मडळींची शुश्रूषा करी. हरिजनवस्तीतील लोकाना अन्न मिळण्याची पंचाईत, पण त्याहेशा अत्यत दुःखद गोष्ट म्हटली, म्हणजे त्याना पिण्यास पाणी मिळण्याचीही मारामार ! ही स्थिति पाहून त्याचे अंतःकरण अत्यंत कळवळलें.

ज्याना सुखवस्तु म्हणून खेड्यात समजावयाचें, त्याचे रोजचें जेवण

म्हटलें म्हणजे प्रत्येक वेळच्या दोन दोन भाकरी व कसले तरी दोन दोन वाडगे कालवण, ह्यापेक्षा जास्त नसे गरिबाला एक एक भाकरी मिळाली म्हणजे मिळविली. शहरात एका वेळच्या लागणाऱ्या चहाच्या खर्चात ह्याची सबंध दिवसाची गुजराण होत असली, तरी अद्याप ह्या लोकाच्या अंगीं जी शक्ति आहे तेवढी शक्ति व काटकपणा श्रीमंत म्हणविणाऱ्या शहरातील व्यक्तींच्या अंगीं क्वचितच असतो, हीही गोष्ट प्रत्यक्ष निरीक्षणाने त्याच्या लक्षात आली

रामगुंफेजवळ अरविंदाने एक मंडप तयार केला त्यात अगदीं गोरगरीब आजारी लोकाना तो तेथे ठेवू लागला ह्या लोकसेवेमुळे अरविंदाच्या मनाला समाधान वाटू लागले मधुकराच्या व वकिलाच्या पत्रामुळे त्याच्या मनावर झालेला विकृत परिणाम हळू हळू लोप पावत चालला

त्याच अवधीत लोकाना गोष्टी लागेल व ते लवकर वाचू लिहू शकतील अशी एक योजना त्याने आखली. शब्दाचे व वाक्याचे गट त्याने असे बनविले, की लोकाच्या परिचयाचे शब्द त्यात यावेत त्याना परिपोषक अशी चित्रे बनवून हे सर्व काम मॅजिक लॅटर्नने करावे असे वाटलें आणि त्या वेळी त्याला एकदम आठवले, की विमलला चित्रकलेचा नाद आहे. तिने गिरणीतील शाळा चालविण्याचे कामही केलेले आहे. तेव्हा आपली योजना तिच्याकडे पाठवून ह्या योजनेस लागणारे साहित्य मुंबईस लवकर तयार करवून घ्यावे. आपल्या इकडील अनुभवाचे सुंदरसे पत्र तिला लिहिलें म्हणजे ती हे काम आस्थेने करील, असेंहि त्याला वाटून त्याने तिला पत्र लिहिण्यास आरंभ केला.

पण त्या वेळीं त्याच्या मनातील नाजूक भावना आंदोलन पाऊं लागली. तो मनात म्हणू लागला, " मुंबईस न जाता इकडे येण्यात आपली चूक खरोखर झाली नाहीं का ! आपल्या हट्टाने तिच्या मनास वेदना झाल्या नसतील का ! तिचे खरें प्रेम होते; का आपल्याला तो भास होत होता ! जर तें प्रेम निर्व्याज व स्वर्गीय असते तर पाच सात महिन्यात त्याचा ओघ

दुसरीकडे कसा वळता ?" त्याने खेददर्शक सुस्कारा टाकला. इतक्यात श्रीपती तेथे आला.

त्याला शेटजींच्या कारवाईबद्दल अरविंदाशी बोलावयाचे होतें. तो म्हणाला, "दादा, माझ्या जमिनीसंबधान शेटजींनी काही भानगड केली, असं म्हणाला होता ना तुम्ही ?"

"बर, मग ? शेटजींवर तुझा विश्वास आहे ना ?"

"विश्वास आहे सगळ्याचा. पण शेटजी आहे, तो !

"अरे, जमीन गहाण लिहून दिली आहेस, की खरेदी लिहून दिली आहेस त्याना ?"

"खरेदी लिहून द्यायला इतका खुळा नाही शिरप्या ?"

"तुला कागद वाचता येत नव्हता ना ? मग कोणी वाचून दाखविला असेल, नाही !"

"कागद वाचून दावला तर ! माझ्या जमिनीच्या चारी बाजूच्या जमिनी लिवल्यात त्यात ! माझा आंगठा घेतलाय भर कचेरींत !"

"अरे, जमीन जर खरेदी लिहून दिलेली असलीस व ती शेटजींनी विक्रीस काढली तर तू काय करशील ?"

"शिरप्या जिता असताना कोण त्याची जमीन इकताय बघू !"

शेटजींच्या घरी श्रीपतीच्या नावचे खरेदीखत प्रत्यक्ष अरविंदाने पाहिले होते, त्यामुळे पुढे काय बोलावे ह्या विचारात तो पडला. इतक्यात एक ससा त्या रामगुफेजवळून धावत चालला. त्याच्या मागे दोन शिकारी कुत्रे लागले होते. साहजिकच त्याचे लक्ष तिकडे गेले. श्रीपती तेथून उठला. व ते कुत्रे शिकार कशी पकडतात हे पाहूं लागला. अरविंदही श्रीपतीच्या मागोमाग गेला. सशास पकडण्याच्या बेतात एक कुत्रा होता, इतक्यात ससा झपाट्याने डोंगराच्या चढणीवर अत्यंत वेगाने धावला व एका जाळीत अदृश्य झाला. ते शिकारी कुत्रे संतापाने भोकत त्या जाळींभोवतीं घिरट्या घालू लागले.

अरविंदास वाटलें, कूळ व सावकार ह्यांची अशीच स्थिति आहे. एकादें कूळ सावकाराच्या हातून निसटू शकेल, पण एकंदरींत तो अपवादच.

त्या वेळीं तिसरा प्रहर टळून गेला होता. आकाशात मोठमोठे काळे ढग येऊन दिनराजाबरोबर आंधळ्या कोशिंबिरीचा खेळ खेळत होते. पायथ्याच्या मैदानात गुराखी ढगाच्या सावलीमागें धावत होते. कांहीं वेळाने ते काळे ढग पूर्व दिशेला एकत्र होऊन पुन्हा पुढे पुढें चाल करून येऊ लागले. आकाशात ते गर्जना करू लागले. युद्धाच्या आघाडीवर आरंभीं तोफांचा जसा गडगडाट होतो, त्याप्रमाणे पश्चिम दिशेस चाललेल्या दिनराजावर हे ढग चाल करून जात असता गर्जना करीत आहेत, असे त्या वेळीं वाटत होते!

आता गुराख्याची व गाईवासराची धावपळ सुरू झाली. वळिवाचा पाऊस केव्हा पडेल, याचा नियम नसतो. जो पडतो, तो अत्यंत जोराने पडतो संसारातील आपत्तीचें असेंच आहे ती केव्हा येईल याचा नियम नसतो. एकाद्या दुर्दैवी कुटुंबाच्या मागे ती आली, की ती त्याला सळो का पळो करून सोडते

सखारामाच्या मागे अशीच संकटपरंपरा लागली होती. त्याला नाहक कारागृहवास भोगावा लागला तो सुटून आला तेव्हा तो मूर्च्छित पडला. आज तर कांहीं कामाकरिता भर उन्हाचा तो चावडींत जाऊन घरीं परत येत असता त्याला भयंकर ताप भरला. त्याच्या तापाचा जोर इतका वाटला, कीं तो बरळू देखील लागला! सखारामाच्या बरळण्यानें राधाबाईची कंबरच खचली. जिजा मोठ्या धीराची खरी, परंतु तीही अत्यंत घाबरली. अलीकडे ती अरविंदाकडे जात नसे, पण ह्या वेळीं विशेष विचार न करिता जी घरातून, तडक बाहेर पडली ती रामगुरूंकडे धावली!

अर्धा अधिक मार्ग आक्रमण केला नाहीं, तोंच भयंकर गडगडाट झाला. त्यामुळे तिच्या शरिरातून एक भीतीची चमक निघून गेली. इतक्यात गाराचा वर्षाव सुरू झाला. तिच्यावर त्याचे आघात होत होते तरी

तरी तिचें पाऊल पुढेंच पडत होते. पायथ्याशी पोहोचेपर्यंत ती नखशिखात ओलीचिंब झाली. नेसलेलें वस्त्र पिळीत पिळीत, झाडाखालीं थाबत थाबत, ती टेकडी चढू लागली. वारा इतका भयंकर सुटला होता, कीं वृक्ष उमळून पडत आहेत, की काय असे वाटत होतें. त्यामुळे पाऊस कमी होईपर्यंत तिला एखाद्या झाडाखालीं थाबण्याची सोयच नव्हती.

तशा स्थितींत ती रामगुफेपर्यंत आली. तिने "दादा" अशी हाक मारली.

आतील बाजूस अरविंद व श्रीपती बसलेले होते. श्रीपतीने जमा करून आणलेल्या गाराचा ते दोघेही स्वाद चाखीत होते. अशा वेळीं तेथे कोणी येईल, अशी त्याना कल्पनाही नव्हती.

ओळखीचा शब्द कानी पडल्याबरोबर ते दोघेही बाहेर आले. वस्त्र ओले चिंब झाल्यामुळे तिचे रेखीव अवयव स्पष्ट दिसत होते. तिचे अप्रतिम लावण्य त्यामुळे खुलले होते. निसर्गानें मुखकमल धुवून टाकल्यामुळे मुखावरील कांति उजळली होती. जर का त्यात मधुर स्मिताची भर पडली, तर स्वर्गीय देवताच मानवरूपाने तेथे अवतरली आहे असा भास झाला असता ! पण तिचे वदन इतके म्लान आले होते, कीं ते पाहताच कोणालाही तिची करुणा यावी. तिचे तेजस्वी नेत्र अश्रूंनीं भरून आले होते.

अरविंद बाहेर आल्याबरोबर एकदम ती त्याला म्हणाली,

" दादा बाबाना फार ताप भरला आहे. बडबडही करूं लागले आहेत. आई फार घाबरली आहे म्हणून आले मी. पण मेल्या पावसानेही हीच वेळ साधली ! तुम्हाला आमचा किती किती त्रास होतो. देवालाही आमची दया येत नाहीं अजून ! "

तिचे ते केविलवाणे शब्द ऐकताच व तिच्या नेत्रातून गळूं लागलेले अश्रुबिंदु पाहताच अरविंदाचेही हृदय भरून आलें. झटकन तोंड फिरवून तो औषधाची बॅग तपासून तींतील औषधे पाहू लागला.

श्रीपती घोंगडी घेऊन झपाट्याने घराकडे चालू देखील लागला.

आता पावसाची सरही बंद झाली. वाऱ्याचा जोर कायमच होता. अरविंद कपडे करूं लागल्याबरोबर जिजान एका बाजूस जाऊन आपला पदर अगदी घट्ट पिळून काढला. अरविंदानें अंग पुसण्यास तिला टॉवेल आणून दिला पण ती म्हणाली,

" मी अंग पुसत नाहीं. आम्हां शेतकऱ्यांना उन्हा पावसाचं काहीं वाटत नाहीं ! "

इतक्यात झटकन ती रामसीतेचें दर्शन घेण्यास गेली. अरविंद पुढे चालला. शेवटी झोपडीत अरविंद व जिजा एकदम येऊन पोहोंचलीं. श्रीपती अगोदरच तेथें आलेला होता.

सखारामबाबा आपलें धोगडें फेकून देऊन झोपडीच्या एका कोपऱ्यात वरळत पडले होते. श्रीपती त्यांना तेथून उचलून आणून धोगडीवर निजवीत होता.

इतक्यात अरविंद झोपडीत शिरला. त्याबरोबर सखाराम त्याच्याकडे पाहून डोळे गरगर फिरवीत किंचाळला.

" हा, या. आनकी आगट पाइजती काय तुमास्नी ! आना कागूद करतु आगट ! आनता का नाई ? "

अरविंदाला त्या उद्गाराचें आश्चर्य वाटलें. तो मुकाट्यानें त्यास उपचार करण्याच्या तयारीस लागला.

प्रकरण चौदावे.

# भाई भय्यासाहेब !

[illegible]

[illegible] प्रकृतीस गुणकारक फार [illegible] आज थोडी स्वस्थता वाटत [illegible]

[illegible] जाऊ " त्यांनी [illegible] मोटार तयार ठेवण्याची सूचना दिली

[illegible] डाव्या बाजूस चौपाटीकडे चार पाचशे लोकांच्या [illegible] एका वक्त्याचे भाषण चालू होते तो वक्ता त्यांच्या माहितीचा [illegible] भाषण वक्तृत्वपूर्ण, जोरदार व हावभावयुक्त असे होते.

[illegible] मधुकर व विमल मोटारीतून खाली उतरली

तो वक्ता नेहमी हॅट वापरीत असे, परंतु त्या वेळी त्याचे मस्तक उघडे होते. डोक्यावरील केशकलाप भांग पाडून चापून चोपून व्यवस्थित ठेविलेला होता. त्याचे नेत्र पाणीदार होते त्याचा चेहरा व आवाज असा होता की प्रथमदर्शनींच त्याची श्रोत्यावर छाप पडे.

त्याचे भाषण संपत आलेले होते, शेवटी तो म्हणाला,

" खऱ्या स्वातंत्र्याचा व समतेचा उदय व्हावयाचा असेल, तर समाजातील विषमता व भेदभाव रसातळास नेली पाहिजेत, भांडवलशाहीचा निःपात झाला पाहिजे; ह्याकरिता शेतकरी व कामकरी यांची संघटना झाली पाहिजे, त्याशिवाय राष्ट्राचा उद्धार होणार नाहीं ! "

वक्त्याचें भाषण सपलें. टाळ्याचा कडकडाट झाला. मधुकर दूर उभा आहे, हे त्याच्या नजरेस आले होते. त्यामुळे दुसऱ्या वक्त्याचे भाषण सुरू होताच, तो जो तेथून निसटला तो मधुकराजवळ आला. उची सिगारेट पेटवीत तो म्हणाला,

" एकूण आज तरी तुम्ही आमच्या भाषणास हजर होता हें आमचं भाग्यच म्हणावयाचें ! "

" अहो, आम्ही नसलो तरी आमचे प्रतिनिधि तुमच्या वक्तृत्वाचा लाभ घेतातच की नाही ! " मधुकर मिस्किलपणे हसला.

" कोण प्रतिनिधि ? विमलाताईच का ? ताईसाहेब, आपण आमच्या सभास हजर असता एकूण ! हे मला नव्हत ठाऊक ? खरोखर मी आभारी आहे आपला ! "

विमल व मधुकर हसूं लागलीं पण त्या वक्त्यास त्याचा बोध होईना. तो जरा घुटमळला. मधुकरानें त्याच्या पाठीवर थाप मारून तो म्हणाला,

" भाई भय्यासाहेब, चौपटीवर जमा झालेले बहुतेक लोक आमच्या-सारखेच नाहीत का ? सायकाळचे वेळी आपापल्या व्यापातून मोकळे झाल्या-मुळे येथे हवा खाण्यास ते जमतात आणि एकाद्या वेळीं तुमच्यासारख्याच्या मोहक वक्तृत्वाचा लाभ घेतात झाले सहजासहजीं ! मग त्याना आमचेच प्रतिनिधि म्हणण्यास काय हरकत आहे ! "

मधुकर पुन्हा हसू लागला. भय्यासाहेब मात्र थोडेसे हिरमुसले. त्याच्या-कडे एकवार दृष्टि टाकून विमल मंदस्मित करीत एक एक पाऊल ती पुढें टाकूं लागली. इतक्यात ते मोटारीजवळ आले. त्या वेळीं मधुकर म्हणाला,

" चला, भय्यासाहेब, जरा फेरफटका मारून येऊं. "

अर्धी सभा सोडून जाणे योग्य नाहीं, हे त्याच्या लक्षात आले. ग दिनानतर अशा सभाचा धूमधडाका भय्यासाहेब व त्याचे सहकारी यांनी चालू ठेविला होता. तेव्हा आरंभीं त्यानीं आढेवेढे घेतले. शेवटीं विमल-कडे पहात ते म्हणाले,

"बरे तर, येतो मी. तुमच्यासारख्याचा गैरसमज नाहीसा करणं हेही आमचं कामच आहे!"

मोटार मलबार हिलवर वळणे घेत चढू लागली. दोन्ही बाजूच्या हिरव्यागार कृत्रिम वनश्रीची मजा विमलच्या नेत्रांना आल्हादकारक वाटत होती. टेकडी चढत असलेल्या हौशी तरुण-तरुणींजवळून मोटार भरकन निघून जाई. त्या वेळी कित्येक तरुणी झटकन एका बाजूस होण्याकरिता आपल्या प्रियकरांना लगटत हे दृश्य पाहून विमल गालातल्या गालात हसे!

मलबार हिलवरील बागेत ही मंडळी हिंडू लागली. भय्यासाहेब व मधुकर बोलत होते. विमलही मधून मधून त्यात भाग घेत होती. तेथील विविध रंगांची विलायती हसरीं फुले प्रत्येकाचे स्वागत करीत होती. उंची उंची वस्त्रे परिधान केलेल्या तरुणी इतस्ततः फुलपाखराप्रमाणे बागडत होत्या. गोंडस बालके हिंदोळ्यावर झोके घेत होतीं. आजूबाजूस ठेवलेल्या आसनांवर बसून युवयुवतींच्या गुलगुल गोष्टी चालल्या होत्या.

बराच वेळ बागेत फिरल्यावर एका बाजूच्या बाकावर हे त्रिकुट विश्रांतीकरिता बसले. थोडा वेळ सर्वच स्तब्ध होती. पण ह्या स्तब्धतेचा भंग भय्यासाहेबांनी केला. ते मधुकरास म्हणाले,

"तुम्ही आमच्या चळवळीची चेष्टा करिता. कार्ल मार्क्सच्या ग्रंथांची आरंभीं अशीच हेटाळणी झाली. पण आता युरोपातच काय, तर सर्व जगभर त्याच्या तत्त्वज्ञानाचा जयजयकार होत आहे, मग हिंदुस्थानच जगाला अपवाद आहे वाटतं!"

"कार्ल मार्क्सच्या किंवा दुसऱ्या कोणाच्या तत्त्वज्ञानाबद्दल आम्ही हेटाळणी करतो, असें तुम्हाला का वाटावें? आम्ही हसतो ते एवढ्याकरिताच कीं, तुम्ही आपल्या देशाच्या परिस्थितीचा, संस्कृतीचा विशेष विचार न करिता, चौपाटीवर काय किंवा आणखी कोठे काय, व्याख्यानबाजीकरिता हुबेहूब त्याच्या विचाराची नक्कल करिता." मधुकर शांतपणे म्हणाला.

" पण दादा, लोकापुढे नवीन विचाराचीं भाषणे करूं नयेत, असे का तुझें म्हणणे आहे ! " विमल मध्येच म्हणाली.

त्या वेळीं कॉमरेड भय्यासाहेबांनी तिच्याकडे कौतुकाने पाहिले

" भाषणे करू नयेत, असे कोण म्हणतो, ताई ? चौपटीवर जमलेल्या लोकात शेतकरी किंवा कामकरी कितीसे होते ? ज्याच्यात संघटना करावयाची त्याच्यापुढे भाषणे नको का व्हायला ? " मधुकर म्हणाला

" आम्ही काय, गिरणीकामगारापुढे आपले विचार सागतच नाहीं वाटते ? तुमच्यासारख्या भांडवलवाल्याना हे समजते कशाला ?" भय्यासाहेब चिडून बोलले.

" ठाऊक आहे मला पुष्कळ ! हिंदी उद्योगधंदे आताच कोठे पाय धरू लागले आहेत, तों तुमच्या एकांगी चळवळीने ते सपशेल बसतील. कारखान्यातील कामकरी तरी समाजात कितीसे आहेत ? पाचपचवीस शहरें वजा केली तर इतरत्र तुमच्या समजुतीप्रमाणे कामगार आहेत कितीसे ? "

" पण त्याचे हक्क त्याना समजावयास नकोत का ? त्याच्यात चळवळ झाल्याशिवाय भांडवलवाले शुद्धीवर येतील असे का तुम्हाला वाटते ? " भय्यासाहेब जोराने म्हणाले.

" मुबईच्या चळवळी आम्हाला ठाऊक आहेत पुष्कळ त्यात मचमच फार. शेतकरी का असल्या शहरात दिसतात ? कोट्यावधि शेतकरी खेड्यातच आहेत नाही का ? तेथे तुमच्यासारखे जातात कुठे ? " विमल भय्यासाहेबाना उद्देशून म्हणाली.

भय्यासाहेब उत्तर देण्याच्या विचारात होते. पण वेळ बराच झाल्यानें मधुकर उठला. त्याबरोबर सर्वच चालू लागले. तेथून मुंबापुरी सुंदर दिसत होती. ताऱ्याप्रमाणे सर्वत्र विद्युद्दीप चमकत होते. त्या बागत प्रवेशद्वारापाशीं आल्यावर मुंबापुरीचा तो देखावा पाहून विमल म्हणाली,

" मला वाटते, हे विद्युद्दीप नव्हत, तर सुंदर रत्नाच्या माळाच मुंबापुरीच्या कंठात शोभत आहेत ! "

" मला वाटते हीं रत्नें खरीं. पण भाडवलशाहीने ही मुंबापुरींत आपले वभव दाखविण्याकरिता ठिकठिकाणीं टागली आहेत ! " भय्यासाहेब हसत हसत म्हणाले.

भय्यासाहेब जहागिरदार ही एक अजब व्यक्ति होती. त्याचे आडनाव जहागिरदार होते, पण सध्या त्याच्या जहागिरीचा कोणालाच पत्ता लागत नव्हता ! त्याचे सर्व शिक्षण ण्या-मुबईसच झालेले हो. शास्त्रीय विषयाची त्याना अत्यत आवड होती एम् एस्सी. झाल्यानतर संशोधनात जन्म घालवावा असा ह्याचा प्रथम बेत होता. ह्या आवडीमुळेच अनेक कष्ट सोसून त्यानी एकदोन वर्षे युरोपात घालविली होतीं. जर्मनींत त्यांनी जे ज्ञान सपादन केले, त्याचा उपयोग मायदेशी येऊन करावयाचा, असा त्याचा प्रथम विचार होता. पण रशियात प्रवास करून आल्यावर त्याच्या विचाराची दिशा पालटू लागली.

तथापि मुंबईस आल्यानतर जर्मन पद्धतीने निरनिराळीं औषधे बनवावी व तीं अगदीं स्वस्त दरात हिंदुस्थानातील डॉक्तराना पुरवावीं, असा त्याचा हेतु होता. गेलीं एक दोन वर्षे ह्याविषयीं त्याची धडपड चालली होती. परतु त्याची कल्पना यशस्वी करण्याला ज्या भाडवलाची जरुरी होती, ते भाडवल अनेक खटपटी करूनही त्याना मिळेना. कित्येक भाडवलवाल्यानीं आरंभी आशा दाखवून पुढे त्याना तोडघशी पाडले. अगोदरच सधन वर्गाचा ते तिरस्कार करीत असत, त्यात ही अधिक भर पडून अलीकडे पाच सहा महिने भाडवलशाहीचे त द्वेष्टे बनू लागले होते !

मोटारीत बसताना विमलच जवळ भय्यासाहेब बसले. विमलनेही आपली अनिच्छा दर्शविली नाही. शेवटीं ती मंडळी मधुकराच्या बंगल्यापर्यंत पोहोचली. भय्यासाहेबानीं मधुकराशीं हस्तांदोलन केले. साहजिकच त्यानीं विमलपुढे हात केल्यावर तिला आपला हात पुढे करावा लागला. तो स्पर्श तिला आकर्षक वाटला !

भय्यासाहेबास पोचविण्यासाठी मोटार सरदारगृहाकडे गेली. विमलची

दृष्टि ती दिसेनाशी होईपर्यंत तिकडे होती. त्यामुळे मधुकर बंगल्यात अगोदर केव्हा शिरला, हें तिच्या लक्षात आले नाहीं.

मधुकर बंगल्यात येताच त्याला त्याचे स्नेही गोडाबे वकील याची आलेली एक चिट्ठी मिळाली. ‘ सोनगावच्या शेटजींचे आलेलें पत्र पाहण्याकरिता तुम्ही इकडेच याल तर बरें, ’ असे तींत लिहिले होते.

मधुकराने गोडाबे वकिलाकडून अरविंद मुंबईस परत यावा ह्या हेतूने सोनगावच्या शेटजींना एक पत्र लिहविले होते त्याचेच उत्तर आले असेल हे जाणून मधुकर घाईनें तिकडे निघून गेला.

विमल येऊन कोचावर बसली. आज काय असेल तें असो, तिचे चित्त मात्र त्या वेळीं अस्वस्थ झाले होते ! ती आपल्याशीच विचार करूं लागली, “ मोटारींत भय्यासाहेबाना चिकटून बसण्याने आपले शरीर पुलकित का व्हावे ? त्याच्या मोहक वाणीकडे आपलें चित्त का वेधावे ? त्याच्या हस्तादोलनाने आपणास आनद का वाटावा ? त्याचे व आपले विचार पटून आपल्या मनात हा स्नेहभाव उत्पन्न झाला, का त्याचे सौंदर्य, मोहक वाणी किंवा भरदार शरीरयष्टी याचा आपल्या मनावर परिणाम झाला ?

अरविंदाचा व आपला लहानपणापासून सहवास आहे म्हणून तर आपला प्रेमविवाह ठरला ना ? असे असता असे वाटणें म्हणजे आपल्या मनाचा कमकुवतपणा नव्हे का ? अशा कमकुवतपणानें आपण त्याचा विश्वासघात करीत नाहीं का ?

पण अरविंदाचे वर्तनही विश्वासघाताचे घडले नाहीं का ? काय म्हणे, ‘ तूं जहागीरदारीण खुशाल हो. ’ काय हे उद्दाम लिहिणे ? मी कोणीकडे वाहवत चालले ? जनताजनार्दनाची मनोभावें सेवा करणे, हें त्याचें ध्येय नाहीं का ? त्याने आपले विचार मला पटवून दिले नव्हते का ? मग मीच का त्याचा पिच्छा पुरवावा ? जर पिच्छा पुरवला तर त्याने तुसडेपणानें का लिहू नये ?

आपण आपल्या दृष्टीने विचार करितो. ज्याच्याबरोबर जन्म घालवा-

वयाचा त्याच्या दृष्टीनेंही विचार करावयास नको का ! त्याला मी चचल म्हणतें, पण आज तरी माझेही मन चचल झालें नाहीं का ? आज आपलें चुकलें खरें. मनावरचा आपला ताबा आज ढिला झाला खरा.

मग त्याची निवृत्ति कशी करावी ? भय्यासाहेबापासून दूर राहावे किंवा त्याच्या सहवासास न भिता मनाने खंबीर रहावें. मनाची खरी कसोटी दुसऱ्याच मार्गांत नाही का ?"

इतक्यात आईसाहेबांची हाक तिला ऐकू आली. त्या दार उघडून आत आल्या व म्हणाल्या, " विमल, काय करीत बसली आहेस ? किती तरी वेळ झाला, आज जेवायच नाही वाटत ? मधुकर पुन्हा बाहेर जाऊन आला तरी तू आपल्या खोलींतच ! तो पाटावर जाऊन बसला देखील !"

" आई, आले ह मी ! "

तोपर्यंत आईसाहेब भोजनाच्या खोलीत गेल्या देखील. त्या खोलीत तिने पाय टाकताच मधुकर एकदम म्हणाला,

"या ताईसाहेब, कसल्या विचारात होता तुम्ही ?" विमलला लाजल्यासारखें झाले, पण पुढे कोणींच काही बोलले नाहीं.

अरविंदाच्या पूर्वीच्या पत्राने विमलची निराशा झाली असली, तरी तिने धीर सोडला नव्हता. पुन्हा मात्र तिने त्याला पत्र पाठविले नव्हते. तिचे मन तिला सागत होते, कीं काहीं काळाने तो शुद्धीवर येईल. त्याचीं मधुकरास जीं पत्रे येत, त्यावरून तो आपल्या इच्छित कार्यात गढून गेला आहे, हे तिला कळत असे.

माणसाला उद्योग नसला, म्हणजे त्याच्या मनात अनेक बरेवाईट विचार धुमाकूळ घालीत असतात, ह्याची तिला पुरी जाणीव असे. त्यामुळें ती कोणत्याना कोणत्या कार्यात स्वतःला गुतवून घेई. महिला मडळाचें कार्य जरी मंदावले असले, तरी ती त्यात चैतन्य आणण्याचा प्रयत्न करी. व्याख्यानबाजीची तिला हौस नसे. प्रत्यक्ष कार्य करणे तिला आवडे.

तिला चित्रकलेचा नाद लहानपणापासूनचा होता. वेळ सापडेल तेव्हा

ती आपल्या खोलींत चित्रे काढीत बसे तिच्या काहीं चित्रांना चित्रकला-प्रदर्शनात बक्षिसेही मिळाली होती. तिच्या खोलींत तिचीं चित्रे शोभिवंत चौकटींत बसविलेलीं, जिकडे नजर टाकावी, तिकडे दिसत असत

आज ती असाच एक देखावा रेखाटण्यात रगून गेली होती इतक्यात आईसाहेबांनी तिच्या नावचे एक पाकीट आणून दिले तिने कुंचली बाजूस ठेविली. पाकिटावरील अक्षर नजरेस पडल्याबरोबर ती उल्हासित झाली

ते पत्र वाचीत असता तिच्या मनात विस्मय व आनंद यांच्या लहरींवर लहरी उठू लागल्या. आईसाहेब हा सर्व प्रकार पाहात होत्या, त्या म्हणाल्या

" कुणाचं ग पत्र आलय विमल ? "

" आई, अरविंदाचच आहे ! इतके दिवस स्वारी करत्या कार्यात गुंतली होती, हे बघ किती छान लिहिल आहे ते ! "

नंतर ती आपल्याशीच विचार करीत बसली. त्या वेळी आईसाहेब पुन्हा म्हणाल्या,

" अरविंदावरचा तुझा राग गेला वाटत सगळा ! मी म्हणत नव्हतो की तो तसा नाही म्हणून ? "

" आई, तुला वाटत तसल पत्र नाही हे ! लोकांना साक्षर करण्याच्या कामातील अडचणी त्यान ह्या पत्रात लिहिल्या आहेत ! आणि त्याला पाहिजेत ती चित्रे तयार करण्याबद्दल तो मला लिहीत आहे "

इतक्यात आईसाहेबांकडे कोणी आल्याची वर्दी मिळाल्यामुळे त्या आपल्या खोलींत निघून गेल्या. विमलने पुन्हा ते पत्र वाचले. नंतर अरविंदानें सुचविलेल्या योजनेत कोणती भर घालावी, मोठमोठ्या अक्षराचे लहान लहान तक्ते व पुस्तके हीं कशी तयार करावी, त्यात विविध गोष्टी व व्यवहारातील प्रसंग कसे आणावेत अशा प्रकारच्या चिंतनात ती असता तिच्या खोलीत मधुकर आला.

तिला अरविंदाचे पत्र आले असेल ह्याची त्याला कल्पना नव्हती.

त्याला आलेल्या पत्रातही अरविंदाने आपली योजना दिली होती. ती

विमलच्या मदतीने लवकर तयार करावी आणि उत्कृष्ट प्रकारचा मॅजिक-लॅटर्नही खरेदी करून पाठवावा वगैरे मजकूर त्याचे पत्रात होता.

मधुकराने ते पत्र विमलला दिले व तो आरामखुर्चीवर स्वस्थ पडला. तिने तें पत्र समग्र वाचले. तिच्या पत्रातीलच योजना त्यात होती, परंतु तिच्या पत्रात प्रौढ लोकाना साक्षर करण्याच्या कामीं आलेल्या अडचणींचे जे सुंदर वर्णन केले होते, ते त्यात नव्हते हे पाहून अरविंदाने आपल्यावर जास्त विश्वास ठेविल्याबद्दल तिला अभिमान वाटला आपल्या पत्राचा सुगावा लागू न देता, दादा काय म्हणतो ते ऐकावे म्हणून पत्र वाचून ती स्वस्थ बसली.

"काय, ताई, अरविंदाचे पत्र समजलेना तुला, तुझ्या मदतीची याचना करू लागला हा! स्वारी वळणावर येऊ लागली, असं नाही का वाटत तुला?"

"काही तरी दादा म्हणतोस! ताकापुरतं दिसतंय रामायण मला ह्यात."

"ताई, जरा दम धर. तो धावतच मुंबई गाठतो कीं नाहीं ते पाहा!"

"मला तसं वाटत नाहीं, दादा! आपण जाऊ या एकदा त्या खेड्यात!"

"पण तशी वेळ तर येऊ द!"

"वेळ कसली यायची? मी कितीतरी दिवस म्हणते, जाऊ या आपण, पण तुझाच बेत होतोय कुठं!"

"ताई,मग असं करू या. त्याला काहीं न कळविताच आपण जाऊ. त्याच्या योजनेची तयारी मात्र कर तू लवकर. जायचं ठरलं, म्हणून तूं मनात मोहक चित्र काढीत बसू नकोस हो!" मधुकर हसत बोलला.

दुसऱ्या दिवसापासून विमलची धादल सुरू गेली. अरविंदाने लिहिलेल्या योजनेप्रमाणे चित्रे काढण्याचे काम तिला करावयाचे होते ही चित्रे मोठीं कठिण होतीं असे नाहीं. एक चित्र काढावयाचे, त्याच्याखाली त्या चित्राच्या नावाचा शब्द मोठ्या अक्षरानीं लिहावयाचा, असे कितीतरी प्रकार तयार करावयाचे होते.

पहिलेच चित्र रामाचे असून त्याच्याखालीं ‘ राम ’ हा शब्द लिहावयाचा होता. दुसरे चित्र सीतेचे असून त्याखालीं ‘ सीता ’ हा शब्द लिहावयाचा होता. अरविंदाची ही आपली सरळ कल्पना होती. पण चित्र रामाचें आहे, हे पटकन कसे ओळखावे याचा विचार ती करूं लागली. त्याचा पोशाक, त्याचे धनुष्य, त्याचा मुकुट हीं कशीं काढावीं, हें ठरविल्यानंतर सीतेसबधींचा तिचा विचार सुरू झाला. श्रीराम सन्निध असले तर सीता ओळखता येईल. रामाशिवाय सीता रेखाटावी तरी कशी ह्या विचारात ती असता तिला असे वाटले, की पहिलेंच चित्र राम आणि सीता याचें असावे व त्याखाली ‘ श्री राम सीता ’ असे शब्द लिहावें. एकटा राम व एकटी सीता आरभी रेखाटण्याची कल्पना तिला पटेनाच.

तिने चित्र तयार करण्यास सुरुवात केली. ह्या चिंतनात आपला किती काळ गेला हेही तिला समजलें नाही. तब्बल दोन तास विचार केल्यानंतर तिने कामास सुरुवात केली. इतक्यात मधुकर तिच्या खोलीत आला. तो हसत हसत म्हणाला,

“ ताई, कामाला सुरुवात झाली का ? कोणतें चित्र काढले आहेस दाखीव तरी आम्हाला ! ”

“ दादा, पी हळद कीं हो गोरी ! असच का तुला वाटतं चित्राविषयीं ?”

“ मग ताई, सकाळपासून तूं करीत होतीस तरी काय ? ”

तिने प्राजलपणे श्रीराम सीता याच्या चित्रासबधानें कोणच्या अडचणी उत्पन्न झाल्या, सीतेचे किवा रामाचे पृथक् चित्र आरंभी काढणे कसे योग्य नाहीं, अरविंदाची कल्पना कशी चुकली, आपण काय करावयाचे ठरविले आहे, इत्यादि विचार मोठ्या रसभरित रीतीने त्याला सागितले.

तें ऐकून मधुकर मोठ्यानें हसूं लागला. त्या वेळी विमल म्हणाली,

“ दादा, हसण्यासारखें रे काय मी म्हटल ?”

“ ताई, तुझे विचार चुकीचे वाटले म्हणून मी हंसलों असें का वाटले तुला ? निरक्षर लोकाना साक्षर करण्याकरिता त्याचे चित्त वेधावें, म्हणून ना

अरविंदाची ही योजना! ही चार आठ दिवसात तयार करून आपणाला त्याऱ्याकडे जावयाचें आहे ना! कलेच्या दृष्टीने चित्रे तयार करावयाचीं म्हटलें, तर किती तरी दिवस लागतील ह्या कामाला! आणि जर चित्रें तूच तयार करूं लागलीस तर केव्हा काम उरकेल कोण जाणे! मला हसूं का आलें, हें आलें का तुझ्या ध्यानात आता?"

"हो, दादा, तुझं म्हणण खरं दिसतं. काम लवकर झाल पाहिजे हें खरं. मग काय कराव म्हणतोस तूं?"

"एकादा धंदेवाईक चित्रकार हें काम आठ दिवसात पुरें करून देईल. जरूर तर तो ह्या कामाला वाटेल तितकीं माणसे लावील!"

मधुकराची योजना तिला पसत पडली, मात्र श्रीराम सीता, राम व सीता तीन चित्रें तयार करण्याचे काम तिने आपल्याचकडे घेतले.

दुसऱ्या दिवशीं ती चित्र काढीत बसली असता सध्याकाळीं पाच वाजता खोलींतील घंटा वाजू लागली. आपल्या चित्रावर पडदा टाकून ती दाराकडे वळली. तिनें दार उघडले, तो डोकीवरची हॅट हातात घेऊन भय्यासाहेबानीं "गुड ईव्हिनिंग, ताईसाहेब" म्हणत खोलींत प्रवेश केला

विमलने स्मित करून त्याचें स्वागत केले.

"पुरा झाला का एकादा नमुना तुमचा ताईसाहेब? फोटो काढून त्याची स्लाईड् बनवावयाची आहे ना! काम तर लवकर आटोपले पाहिजे. मधुकराचा तगादा आहे माझ्यामागे." भय्यासाहेब म्हणाले.

तुम्ही स्लाइड् बनविणार का! मला नव्हतं ठाऊक हे! तुम्ही ही कला केव्हा शिकलात!"

"ही कसली कला! खरी कला चित्रें काढण्याची. चित्रकार आपल्या चित्रात जिवंत जीवन ओतीत असतो. फोटो काढणारे काय, नक्कल करीत असतात पुढें असणाऱ्या देखाव्याची!"

"पण फोटो काढण्याला वेळ फार थोडा पुरतो. पण चित्राचं काम असं झटपट उरकत कुठं!"

ह्या बोलण्यावरून एकही चित्र पुरे झाले नाहीं, हे भय्यासाहेबाच्या लक्षात आले तरीही ते हसत हसत म्हणाले,

" कोणत चित्र तयार झाल आहे, हे दाखविता का आम्हाला ! "

तिने नाइलाजाने चित्रावरील पडदा दूर केला. ते चित्र अपुरे होते. फक्त श्रीरामाचे मुखमडल तिने रेखाटले होते. चित्रातील कौशल्य पाहून भय्यासाहेबाना फार आनद झाला ते चित्र पाहण्याकरिता ते विमलच्या अगदी सन्निध गेले तिने तो पडदा आपल्या हातानेच वर धरला होता त्यामुळे तेथून तिला हलता येत नव्हते. शिवाय बारीक सारीक भाग पाहून त्यासबंधाने भय्यासाहेब तिच्या कलेची तारीफ करीत होते. चित्राकडील दृष्टि वळवून कुतूहलतेने तिच्याकडे ते मधून मधून नजर टाकीत होते.

इतक्यात आईसाहेब खोलीत आल्या त्यांचीही नजर चित्राकडे गेली. त्या वेळीं त्या कौतुकाने म्हणाल्या,

" विमल, अरविंदाचं चित्र काढतेस वाटत ? चेहरा अगदीं हुबेहूब साधलाय बर ! " विमलच्या लाजऱ्या मुखावर स्मित झळकू लागले.

खरोखरच श्रीरामाचे चित्र ती अरविंदाच्या फोटोवरून काढीत होती कोणत्याही देवतेचे चित्र काढताना चित्रकाराच्या डोळ्यापुढे जो नमुना असेल, तोच कुंचलीतून निर्माण व्हावयाचा. श्रीरामाच्या चित्राला अर-विंदाच्या नमुन्यापेक्षा दुसरा नमुना तिच्या डोळ्यापुढे येतच नव्हता आईसाहेबाना काहीं तरी उत्तर द्यावे म्हणून ती म्हणाली,

" इश्श् काही तरी म्हणतेस आई ! "

त्यानंतर आईसाहेब भय्यासाहेबाना म्हणाल्या,

" भय्यासाहेब, पाहिलेत का विमलचा ओढा अरविंदाकडे किती आहे तो ! पण तो कुठं भिकार खेड्यात जाऊन बसलाय, इकडे येतच नाहीं म्हणतो ! "

" येईल हो ! त्यानें तेथे चागली जनसेवा चालविली आहे. मला देखील त्याची योजना ठीक दिसते. " भय्यासाहेब म्हणाले.

आईसाहेबाना भय्यासाहेबांचे हे म्हणणे रुचले नाही त्या म्हणाल्या, " अरविंद काय आणि तुम्ही काय एकाच माळेचे मणी ! कसली जनसेवा करिता कुणाला ठाऊक ? देवाच्या दयेने सुखाने राहण्यासारखी स्थिति असता रानावनात माणसानं भटकावं, हे आम्हाला बरं नाही दिसत ! "

आईसाहेबांचा कल जाणून भय्यासाहेब म्हणाले, " आईसाहेब, नका करू काळजी अरविंदाची ! आम्ही सारे तिकडे जाणार आहोत, तेव्हा आणू त्याला खेचून इकडे ! "

" करा, बाबानो, तुम्ही म्हणता तसं. पण मला नव्हतं वाटलं, अरविंद असा वागेल असं ! "

आईसाहेबांच्या डोळ्यांत पाणी आले. त्या तेथून उठून गेल्या त्या वेळीं विमल म्हणाली, " खरच का येणार भय्यासाहेब तुम्ही आमच्या-बरोबर ? आलात तर तुमचे शेतकरी कशा स्थितींत आहेत ते तुम्हाला दिसतील तरी ! "

विमलच्या म्हणण्यातील खोच भय्यासाहेबांच्या लक्षात आली. तिच्या सहवासात त्याना गोष्टीही वाटू लागली होती. पण तावडतोब होकारार्थी उत्तर देणे शहाणपणाचे नाही, हे लक्षात घेऊन ते म्हणाले,

" आपण पुन्हा याचा विचार करूं. मला आता एका मीटिंगला जायचे आहे बरं, येतो मी. चित्रे मात्र लवकर पुरी करा हो ! "

भय्यासाहेब विमलकडे पाहात हसत बोलले व झटकन् निघून गेले.

अरविंदाच्या योजनेप्रमाणें चित्रें, अक्षरे, वाक्ये तयार होत होतीं. भय्यासाहेब त्याच्या स्लाइड्स बनवीत होते. काही शिक्षणशास्त्रज्ञांचाही वेळोवेळीं सल्ला घेऊन त्यांच्या सूचना अमलात आणल्या जात होत्या.

मजुरांच्या चाळींत भय्यासाहेब मॅजिक लॅटर्न घेऊन जात व त्या निरक्षर लोकाना ह्या साधनानी कितपत अक्षरओळख होते ह्याचा पडताळा पाहात. सदीप शिकविण्यानें प्रौढ लोकाना अक्षरओळख तेव्हाच होते, ह्याचा त्याना अनुभव आला.

लोकाच्या परिचयातील गोष्टी तयार करून त्या त्याना बोलपटाच्या रूपानें दाखवून जर शिक्षण दिले तर त्याचा अत्यंत उपयोग होईल, असें त्याना वाटले. मुंबईच्या गिरणीमालकानीं मजुराकरिता अशी योजना करावी, म्हणून त्यानें लेखही लिहिले, पण गिरणीमालकाचे लक्ष तिकडे जाते कशाला !

त्याने मजुरात मिसळून त्याच्या भाषेत पाच दहा गोष्टी तयार केल्या, मधुकराच्या मदतीने त्यानें मोठ्या टाईपात त्याचीं पुस्तके छापून घेतलीं. आदले दिवशीं लॅटर्नच्या साहाय्याने शिक्षण द्यावें व वाचण्याकरिता समजलेल्या अक्षराचा उपयोग ज्यात आहे अशीं गोष्टींचीं पुस्तके त्याना द्यावीं, ह्या रीतीने अगदीं निरक्षर लोकानाही वाचनाची गोडी वाटूं लागली.

मधुकराच्या सल्ल्यानें खेड्यातील लोकाना साक्षर करिताना उपयोगी पडेल अशी साधी फिल्मही त्यानें तयार करविली. मधुकरानें सढळ हातानें ह्या कामीं खर्च केला.

विमलचीं चित्रे शेवटीं एकदाचीं पुरीं होऊन त्याच्याही स्लाईड्स भय्यासाहेबानीं बनविल्या. मजुराच्या चाळींतील अनुभव भय्यासाहेबानीं तिला सागितल्यामुळे प्रौढ स्त्रियानाही याचा उपयोग किती होतो, हे पाहाण्याचे तिने ठरविले. भय्यासाहेब व विमल यानी तोही प्रयोग करून पाहिला. त्यात चागले यश येत असल्याचे पाहून विमलला अरविंदाच्या योजनेची उपयुक्तता पटली आणि त्याच्या कार्याविषयीं तिला कौतुक वाटूं लागले. ''

आता अरविंदाकडे जाण्याची त्याची पूर्ण तयारी झाली. भय्यासाहेबही विमलच्या आग्रहावरून सोनगावीं जाण्यास तयार झाले.

विमलच्या सहवासाचा परिणाम भय्यासाहेबावर निराळाच झाला होता. मधुकराची सापत्तिक भरभराट उघड उघड दिसत होती. तिचें प्रेम सपादन झाले, तर आपले इच्छित मनोरथ साध्य होतील व सापत्तिक अडचणी नाहींशा होतील, असें त्याना जास्त जास्त वाटूं लागलें !

आईसाहेब भोळ्या भावानें त्याच्याजवळ बोलत बसत. मधुकरावरही त्याच्या गोड वाणीचा परिणाम झाला होता. सोनगावच्या शेटजींनी गोडाबे वकिलाना अरविंदाविषयीं पाठविलेले पत्र मधुकरानें भय्यासाहेबाना दाखविले होतें. अरविंदाची चेष्टा करण्याला ते पत्र उपयोगी पडेल; असे मधुकराला वाटत होतें.

पण भय्यासाहेबाना त्या पत्राने गोड आशा उत्पन्न केली. विमलच्या नजरेस ते पत्र गुपचूप पडले, तर अरविंदाविषयीं तिचे मन कलुषित होईल आणि मग आपल्याकडे तिचे मन वळेल असे त्याना वाटले. त्यानीं ते पत्र युक्तीने आपल्या ताब्यात घेतले. त्या पत्रातील मजकूर विमलला कळू नये अशी मधुकराची इच्छा होती.

आता दुसरे दिवशींच निघावयाचे होते. विमलनें आपले सामान व्यवस्थित बांधून घेण्याची तजवीज केली. मधुकराच्या खोलींत जाऊन ती त्याचेही कपडे, पुस्तकें, ट्रंकात भरू लागली.

मधुकर कांहीं कामासाठीं बाहेर गेला होता. ही संधि साधून भय्यासाहेबानी ते पत्र विमलच्या नजरेस येईल, अशा रितीने मधुकराच्या टेबलावर ठेवून दिले. विमल कामाच्या धादलीत होती. त्या पत्राकडे तिची नजर जाईपर्यंत, तेथे जवळच कसल्यातरी कामाच्या निमित्ताने भय्यासाहेब घुटमळत होते. शेवटीं तिची नजर त्या पत्राकडे गेली.

त्या पाकिटावरील पत्ता गोडाबे वाकिलाचा होता. पण त्यावर ठळक अक्षरानीं ‘ सोनगावचे आलेलें पत्र ’ असें भय्यासाहेबानीं लिहून ठेविलें होतें. पाकिटातील पत्र वाचावे, असा तिला मोह झाला. ती पत्र वाचीत आहे, हे दिसल्याबरोबर भय्यासाहेब हास्य मुखानें तेथून बाहेर पडले.

ते मोडींतील पत्र अडखळत अडखळत ती वाचूं लागली. तो मजकूर वाचीत असता तिचे हृदयाचे ठोके जोरानें पडूं लागले. चेहरा मलूल झाला. हतबुद्ध होऊन तिनें टेबलावर डोकें टेकलें. तें पत्र असें होतें—

सोनगाव, वैशाख व॥ १०

जयगोपाळ वि. वि.

तुमचें पत्र पावलें. तुमच्या पत्राचे उत्तर कसे लिहावें, ह्याचा विचार आम्हाला पडला होता. पण तुम्हाला खोटें कसें लिहावे ! जें आहे ते लिहितों. त्याचा राग मानू नका.

अरविंद नावाचे रावसाहेब आमच्या गावीं आहेत. माणूस फार चागला आहे. आम्हाला त्याचा फार उपयोग होतो. आमच्या गावच्या जिजा नावाच्या तरण्याबाड पोरीला ते एकटेच घेऊन आले. परक्या माणसाशीं खेड्यातील पोरी बोलतही नसतात. पण त्याच्याबरोबर ती नेहमीं असते. एकदा तिचें लुगडेही याच्या मठींत गावच्या लोकाना सापडले. तेव्हा ह्याना लोक मारायला उठले. पण आमच्या वजनामुळें ह्याना मार बसला नाहीं. आम्ही रावसाहेबाना पुष्कळ सागतो, नाद सोडा पण साहेब ऐकत नाहींत. पण आपण काळजी करू नये. आम्ही येथे आहोत, म्हणून त्याच्या केसाला धक्का लागणार नाहीं. खरा मजकूर लिहिल्याबद्दल राग मानूं नये. कळावें हा जयगोपाळ.

आपला,

वीरचंदशेट

## प्रकरण पंधरावें.

# संशयांचें जाळें.

इकडे सोनगावीं अरविंदाला सखारामाच्या प्रकृतीकडे चार पाच दिवस चांगलेच लक्ष द्यावे लागले. मोठ्या शहरात जरूर तीं औषधे मिळण्याची जशी सोय असते, तशी अशा खेड्यात कोठून असणार व वैद्यकीय मदत अशा गरिबाना कशी मिळणार? एकाद्या मोठ्या शहरातून रोगी तपासण्याकरिता जरी फाटका तुटका डॉक्टर अशा गावीं आणावयाचा म्हटला तरी दहावीस रुपये खर्च करावे लागतात. सखारामासारख्या माणसाला असा खर्च करणे शक्य कसे होणार! ह्या सर्व गोष्टींची जाणीव अरविंदाला चांगलीच झाली. गोरगरिबाच्या उपयोगीं पडण्यातच आपले आयुष्य घालवावे, असें त्याचें ध्येय होते. अशा कामीं पदराला चट्टा लावून घेण्याची त्याची ऐपत व इच्छाही होती, म्हणून शक्य त्या उपायानीं त्याने सखारामाची शुश्रूषा चालविली.

सखारामाला थोडें बरें वाटू लागल्यानंतर 'आना कागूद, करतु आगट' असे जें तो आजारात बरळत होता, त्याचें कारण काय असावे ह्याचा तपास अरविंदाने चालविला. तेव्हा त्यास असे कळलें, कीं त्या दिवशीं भर दुपारीं पाटलानीं सखारामास चावडीवर बोलावून नेऊन एकदोन कागदावर त्याला आगठे करण्यास सांगितले. त्या वेळीं तो म्हणाला,

" मला कागूद वाचून जिजा दावील, तवाच मी आगटं करीन. "

" सखारामबाबा, तुम्हाला म्हातारचळ तर नाहींना लागल! " पाटील हेटाळणीच्या स्वरात बोलूं लागले. " पोरीला विचारून तुम्ही आगठे करणार! सरकारदरबारीं आपल्या पोरीला तुम्ही नेणार! काय बघा!

चार माणसानी भराभर आगठे दिले. पुढे सारासूट मिळाली, तर आम्हाला देणार वाटन त्यातली कुणी ! "

पाटलाच्या ह्या बोलण्याने सखारामाला आपला अपमान झालासा वाटला. त्याने कपाळाला आठ्या घालीत त्या रागाच्या भरात कागदावर आगठे दिले व तो तडक उन्हातून आपल्या मळ्याकडे वळला.

अपमानानें भडकलेले मस्तक व उन्हाचा तीव्र ताप ह्याचा परिणाम आधींच खंगलेल्या त्या म्हाताऱ्यावर फार वाईट झाला त्याला फणफणून ताप भरला. त्या तापातच तो चावडींतील गोष्टी बडबडू लागला.

सखाराम आजारी असता त्याच्या मळ्यातील कामधंद्याची आबाळ होऊ लागली. लहर येईल तेव्हा श्रीपती मोट धरी. त्या वेळीं सगळीं कामें बाजूस सारून जिजा पिकास पाणी पाजण्यास जाई. त्याच्या मर्जीस आले तर तो जनावराना चारापाणी करी, नाहींतर तें काम जिजालाच उरकावे लागे

एके दिवशीं श्रीपतीनें सकाळींच मोट धरली. जिजा रताळयास पाणी पाजीत होती. दहा वाजण्याच्या सुमारास काम आटोपत आले विहिरीच्या पाटालगतच्या वाफ्याना पाणी लाविले होते.

त्या वेळीं तिने काचा घातला होता. कबरेस पदर खोविला होता तिचे काळेभोर केस भुरभुर उडत होते. मध्येंच ती आपल्या मनगटाने ते मागे सारीत होती. त्या वेळीं श्रीपतीची नजर तिच्याकडे गेली. ती ओणवी होऊन बाध फोडीत होती व तोंडानें ' ही एक आस मनिं उरली, कन्हय्या बजाव बजाव मुरली ' हें पद गुणगुणत होती. तिच्या मधुर आवाजाने श्रीपती मोहित होऊन गेला.

त्यानें नुकतीच मोट सोडली होती. कुंडींतील पाण्यानें तो हात धूत होता. त्याची नजर तिच्याकडे खिळली होती. तिची नजर कामाकडे होती शिवाय ती गाणें गुणगुणण्यात रंगून गेली होती. त्या वेळी तिचे शरीर, आवाज हीं सारींच आकर्षक होतीं. बोलण्यापेक्षा काहीं तरी कृति करून तिची नजर आपल्याकडे वळवावी, असें त्याच्या मनानें घेतलें.

त्यानें कुंडींतील पाणी तिच्या अंगावर शिंपडण्यास सुरुवात केली. तिला त्या थंडगार तुषारांनीं बरें वाटलें. पण आपल्या कामांतून मात्र तिनें दृष्टि चळविली नाहीं. पुन्हा तिच्या अंगावर एकसारखे पाण्याचे तुषार येऊं लागले. त्या वेळीं तिनें चोरट्या नजरेनें त्याजकडे पाहिलें. ती खुदकन् हसली. तिच्या मुखावर पडलेले तुषार मोत्याप्रमाणें चमकत होते. जणूं काय, मोत्यांच्या मुंडावळ्याच त्या!

तिनें बोलावें अशी श्रीपतीची फार इच्छा होती. ती अत्यंत चतुर होती. त्या वेळच्या बोलण्यानें त्याला अतिप्रसंग करण्याचा मोह होईल असें तिला वाटलें, म्हणून ती स्तब्ध राहिली. त्याला तें आवडलें नाहीं तो टोचक स्वरांत तिला म्हणाला,

'जिजे, माझ्याकडे बघतेस तरी कशाला? बच्चाजीरावाची राणी होणार तू! शिरण्या आपला हमाल राबतोय झालं!"

तरीही ती बोलली नाहीं. पण तिनें असा एक वक्र कटाक्ष त्याजवर फेकला, कीं त्यामुळें त्याला पुढें बोलणें अशक्य झालें. तो रागावून तेथून निघाला. इतक्यांत तिला आठवण झाली, कीं दोनतीन वाफे पाणी न पाजतां ठेविले आहेत, त्यांतील रताळीं उकरण्यास त्याला सांगावें. म्हणून ती हसत हसत म्हणाली,

"पाटील, चाललांत कुठं? रताळ्याचे दोन तीन वाफे उकरा कीं! टोपलीभर रताळीं शेटजींच्या येथें नेऊन मला तेल, मीठ आणलं पाहिजे!"

"आतां तोंड उघडलं वाटतं? सांग आतां बच्चाजीरावाला तुझ्या!"

श्रीपतीनें तिला टोमणा मारला व तो पुढें चालूं लागला. आणखी एकादी हांक ती मारील नंतर आपण परत जाऊं, असें त्यानें मनाशीं ठरविलें होतें. श्रीपतीचे शब्द जिजाच्या वर्मी लागले होते. त्यामुळें पुन्हा हाक मारावी किंवा न मारावी ह्या विचारांत ती घुटमळली. इतक्यांत रायबा व बच्चाजीराव त्या विहिरीवर आले. त्यांनीं श्रीपतीचे शब्द ऐकले होते.

सखाराम आजारी पडल्यापासून रायबाची ये, जा, त्याच्या घरीं वाढली

होती. शेटजींच्या दुकानातील किरकोळ सामान आणून देण्याचे काम त्यांनीं बच्चाला सांगितलें होते. बच्चा आडमुठा खरा, परंतु जिजानें सांगितलेलें काम तो अगदीं तत्परतेनें करी.

जिजाच्या तोंडून शब्द बाहेर पडण्यापूर्वीच बच्चाने तेथे असलेली कुदळ हातीं घेतली. कोरडे वाफे पाहून तो ते उकरू देखील लागला. श्रीपती हळू हळू पाय उचलीत होता. थोड्या वेळाने त्याला असे वाटूं लागलें, कीं परत जाऊन वाफे उकरावे म्हणून त्याने मागे वळून पाहिले त्या वेळीं वाफा उकरण्याकरिता कुदळ हातीं घेतलेली बच्चाची धिप्पाड मूर्ति त्याच्या नजरेस पडली त्याबरोबर त्याची तळपायाची आग मस्तकास गेली. परत जाऊन बच्चाला हात दाखवावा व जिजाची फजिती करावी, असेही त्याला वाटले. परंतु रायबा तेथे आहे, हे पाहून तो पुढेच चालू लागला त्या वेळीं त्याचें मस्तक भडकले होते. कोठे जात आहोत, हे त्याच्या लक्षात येत नव्हते. उन्हाचा ताप वाढू लागला. त्याच्या नसानसातून संतापही भडकूं लागला. वेडा बिचारा! अडाणीच तो! प्रसंग किती क्षुल्लक! आणि त्याने मनःसंताप तो किती करून घेतला! पण त्याचे विचार, त्याचे आचार, त्याच्या भावना हीं त्याच्या शिक्षणाच्या व संस्कृतीच्या दृष्टीने पारखल्यास तो वेडा कसा म्हणावा!

उन्हाळपावसाने कित्येक ठिकाणीं पाण्याचीं डबकीं साचलीं होतीं. चालता चालता चुकून त्यातील एकात त्याचा पाय घसरला व तो पडला. तेव्हा तो जरा भानावर आला. तरीही तो तसाच पुढे चालूं लागला. थोड्या अंतरावर गेला नाहीं, तोंच त्याला माळावरून एक मोटार येत असलेली दिसली. तिचे त्याला आश्चर्य वाटलें व त्या रोखानेंच तो चालू लागला.

ती मोटार मंद गतीने चालली होती. वाटाड्या वाट दाखवीत होता. वाटेंतील खाचखळग्यानीं व दगडाधोंड्यानीं ती एकसारखी खालींवर होत होती, त्यामुळे तिचे धक्के आतील माणसाना जाणवत होते. तीं माणसें

घामाघूम झालीं होतीं. ' हुश्श् ' ' हुश्श् ' करून हातरुमालाने तीं घाम पुसीत होतीं. मोटारींत बसण्यापेक्षा पायीं चालणेच बरें, असें त्याना वाटत होतें. पण पुढे सपाट माळरान दिसल्यामुळे मोटारीचा वेग जरा वाढला. थोड्या अंतरावर ती मोटार गेली नाहीं, तोंच चिखलाच्या एका डबक्यावरून त्या मोटारीची चाकें गेलीं. त्यामुळें त्यातील घाण त्या डबक्याजवळ एका झाडाखाली बसलेल्या बाईच्या अंगावर उडाली. ती बाई एकदम ओरडली, " अयाई, मेलग बाई मी ! '

शहरच्या रस्त्यावरून अशी मोटार भर वेगाने जाती, तर ती केव्हाच दृष्टिआड झाली असती ! परतु ती वाट आडवळणी होती. त्या बाईच्या ओरडण्याने आतील माणसेंही हादरल्यासारखीं झालीं. अपघात झाला कीं काय, अशी त्याना भीति वाटली. मोटारींतील साहेबी टोपीवाला गृहस्थ खालीं उतरून चौकशी करू लागला. त्यामुळे त्या बाईस जास्तच जोर चढला. ती मोठमोठ्याने ओरडू लागली. तिच्या ओरडण्याचा आवाज ऐकून श्रीपती तिकडे धावत गेला ती चिमाच होती. त्याला पाहून ती म्हणाली,

" या धटिंगनान मोटार माज्या आंगावर घातली बघ, शिरप्या ! मोटा आलाय तालेवार ! "

मोटारींतील सुदर पोशाक केलेल्या स्त्रीकडे व साहेबी पेहराव केलेल्या गृहस्थाकडे पाहून श्रीपती चिमास म्हणाला.

" चिमा मावशे, साहेब हायती ते ! तुला लागलं बिगलं नाहीं ना ? साहेबासगं कशाला भांडा ? "

" हैत माहिती असल गावटी साहेब मला ! म्हमईत गल्लोगल्लीं हिंडत्याती ! मी भिते व्हय त्येना ? " चिमा क्रुद्ध नजरेने त्याच्याकडे पाहात बोलली.

" आम्हाला वाट कळली नाहीं म्हणून ह्याना त्रास झाला. माफ करा." मोटारींतील एक गृहस्थ म्हणाला व तो मोटारींतून खालीं उतरला. त्याने चिमाच्या हातावर दोन रुपये व श्रीपतीच्या हातावर एक रुपया ठेविला.

" साहेब, मला कशाला रुपया ! मी तुमचं काय काम केलय ? माझी चाकरी घ्या काहीं तरी, मग मला वाटल्यास पोटाला द्या. तसा रुपया नको मला ! " श्रीपती म्हणाला.

त्याच्या सौजन्याने मोटारींतील मडळींना समाधान वाटलें. िमाला त्याचे म्हणणें रुचत नव्हते. ह्या लोकाची भली खोड मोडली, असे तिला वाटत होतें. ती मुबईचे पाणी प्यालेली बाई होती. तिला तेथील श्रीमंत लोकाचा बेगुमानपणा माहीत होता. ह्या ठिकाणीं हे लोक नम्र का झाले हे ती जाणत होती.

पण श्रीपती हा सरळ मनाचा खेडवळ तरुण होता. त्याला शहरचें वारे लागलेले नव्हते श्रमाशिवाय कोणाचा पैसा घेणे त्याला पसंत नव्हते. शिवाय हे साहेब लोक दिसतात, त्यात एकादा मोठा अधिकारीही असेल असे त्याला वाटत होते. अधिकाऱ्याच्या उपयोगी पडणे हे आपले काम आहे असें खेड्यातील भोळसर लोकाना वाटतें, त्यापैकींच तो एक होता. म्हणून तो म्हणाला,

" साहेब, आपल्याला कुठ जायच आहे ? चावडींत जायच असेल तर दुसऱ्या वाटेन गेलं पाहिजे. "

" तुमच्या डोंगरात रामाच देऊळ आहे ना ? तेथे आम्हास जावयाच आहे.आमचा वाटाड्या आहे, पण त्याला सरळ रस्ता माहीत नाहीं. तुम्ही आम्हाला दाखवता का वाट ? " मोटारींतील साहेब म्हणाला.

" हो, हो ! मी दाखवितों तुम्हाला चांगली वाट. तो बघा, झाडी दिसते तिथं जायचं आहे. "

" तेथें आता कोणी असेल का ? " मोटारीतील स्त्रीने प्रश्न केला.

" अरविंददादा तिथ आहेत. आज मी कसा पागल झालों ! तिकडे जायच सोडून कुठ तरी चाललो होतों. " श्रीपती पश्चात्तापपूर्वक बोलला.

" बर झाल, तुम्ही आलात म्हणून आम्ही संकटांतून निभावलों ! " मोटारींतील स्त्री म्हणाली,

नंतर त्या स्त्रीकडे नजर टाकीत चिमा म्हणाली,

" बाईसाब, मंबी म्हमईहून आताच आले. दमून गेले म्हनून झाडाखालीं थोडी टेकले. चिखलान आग भरलं, म्हनून मला राग आला. जळ्ळी माजी जीबच लई वगाळ ! "

चिमाची टकळी आणखी पुढे चालणार होती. परतु श्रीपतीने ' चालवा मोटार माझ्यामागून ' असें म्हणून तो पळूं लागला.

त्या वेळी उन्हाचा ताप अधिकच वाढला होता. डोंगरातील झाडी मनोहर दिसत असली, तरी माळावरील ताप कमी करण्यास ती समर्थ नव्हती. त्या झाडीकडे सर्वांचे लक्ष लागले होते. मोटारींतील स्त्रीला तो उष्मा असह्य झाला होता. तिला उद्देशून तिच्याजवळील तरुण म्हणाला,

" ताई, दुःखाचा चटका बसल्याशिवाय सुखाच्या झुळुकेची किंमत कळत नाहीं, म्हणून मला वाटते, ह्या डोंगरावरील थडगार हवेचे मोल कळावे, ह्याकरिताच पायथ्याशी उष्मा अधिक भासत असावा ! "

" दादा, तू म्हणतोस ते काही खोटे नाहीं. थंडगार वाऱ्याची झुळूक शरिराला सुखद होईल, पण भडका उडालेल्या मनाला ती सुखदायक वाटेल की नाही, ह्याचा काय नियम सांगावा ! "

विमलच्या ह्या बोलण्याने तिच्या मनात उडालेली खळबळ मधुकराच्या लक्षात आली. तिला समाधान वाटावे, म्हणून तो बोलूं लागला.

" ताई, मुंबईहून आपण निघालो, ती वेळ किती मजदार होती ! रात्रीचा आपला डाक बंगल्यातील मुक्काम किती आनंदात गेला ! सकाळीं देखील सडक सुटेपर्यंत मुळींसुद्धा त्रास झाला नाही. हे आडवळणी ठिकाण. सरळ सडक तर राहोच, पण धड वाटही नाही. मध्येच त्या बाईचा त्रास, तशात उन्हाचा कहर, म्हणून तुझें मन त्रासलेले दिसते. टेकडीवर गेल्यावर तुझे मन अगदीं शांत होईल. "

थोड्या वेळानें मोटार थांबली. ह्यापुढें ती जाऊ शकणार नाहीं, असे श्रीपतीनें त्याना सांगितले. गायरानात आलेले बाळगोपाळ मोटारीभोंवतीं

जमा झाले. ते आनंदानें नाचू लागले. श्रीपतीनें सर्व सामान बाहेर काढलें व गुराखी मुलाजवळ एक एक डाग दिला. त्यानेही स्वतः भले मोठे दोन बोजे डोक्यावर घेतले

सर्वांनीं टेकडीवर चढण्यास आरंभ केला. त्या मंडळीना एक एक पाऊल उचलणें जड जात होते. पुढे जेव्हा गर्द शीतल छाया लागली, तेव्हा त्याचा श्रमपरिहार होऊं लागला. श्रीपतीच्या सागण्यावरून काहीं मुलानीं ताजीं ताजीं करवंदें त्याना दिलीं. हे लोक मोठे श्रीमत आहेत, ही कल्पना त्याना तेव्हाच आली. साहेबी पोशाकावरून त्याच्या मोठेपणात फारच भर पडली त्यामुळे त्याना खूष करण्यासाठीं त्या मुलाची अहमहमिका लागून राहिली.

टेकडी चढून जाताच थडगार वाऱ्याने सर्वांचा थकवा निघून गेला. त्यानीं स्वच्छ पाण्यानें हातपाय धुतले यानतर मधुकर श्रीपतीस म्हणाला,

" अरविद या नावाचा इसम येथे आहे म्हणून तुम्ही म्हणत होता ना ? '

" साहेब, " श्रीपती म्हणाला, " त्याना बोलावून आणू का इकडे ? किंवा चलता त्याच्याकडे ?"

" आपणच जाऊ तिकडे. " मधुकर म्हणाला.

विमलने आपले पातळ साफसूफ केले. केशरचना ठाकठीक केली. मधुकर, विमल व श्रीपती हीं रामगुफेकडे निघालीं. भय्यासाहेब गादी पसरून तेथेंच एका वृक्षाखालीं कलंडले.

रामगुफेजवळ येई तो सर्वत्र शात वातावरण होतें. तेथे आत अरविदा-बरोबर कोणीतरी बोलत आहे, हें श्रीपतीनें ताडले. म्हणून खोलींत एकदम न शिरता श्रीपतीनें बाहेरूनच म्हटले,

" दादा, तुमच्याकड पाहुण आल्याती. "

ते शब्द ऐकल्याबरोबर अरविंद झटकन् बाहेर आला. त्याने कमरे-भोवतीं पचा गुंडाळलेला होता. खाद्यावर टॉवेल टाकला होता. त्याची मुद्रा प्रसन्न होती. शरिरावर तपस्येचें तेज विलसत होतें.

त्याने मधुकराकडे पाहिलें. त्याचा हात आपल्या हातात घेतला. विमल-कडे पाहून त्याने अत्यत मधुर स्मित केले. ते दृश्य पाहिल्यावर विमलचे शरीरही पुलकित झाले. ती तोंडातून शब्द काढणार, इतक्यात त्या गुंफेतून पदर व्यवस्थेनें घेऊन एक तरुणी बाहेर पडली.

तिच्या टपोऱ्या डोळ्यातील तेज अप्रतिम होते ओघळलेले अश्रु पुसून काढल्यामुळे तिच्या कपोलावर उत्पन्न झालली लाली अत्यंत आकर्षक दिसत होती. तिला त्या खोलींतून बाहेर पडताना पाहून मधुकराला अत्यत आश्चर्य वाटले. विमल त्या स्त्रीकडे कठोर दृष्टीने पाहू लागली. त्या तरुणीची स्थितिही मोठी केविलवाणी झाली. ती तर पाहुण्याना पाहून फार चकित होऊन गेली!

विमलचे शरीर कंपायमान होऊं लागले. तिने त्या तरुणीवरून आपली दृष्टि अरविंदाकडे वळविली. तिची सतप्त मुद्रा पाहून त्यालाही अत्यन आश्चर्य वाटले तिचे ओठ एकसारखे थरथरू लागले. आत्मसंयमन कर-ण्याची तिने अगदी शिकस्त केली तथापि मनात भरून आलेल्या क्रोधाचा आवेग तिला आवरता येईना. तिचे नेत्र लाल झाले. त्यातील अग्नीला शात करण्याकरिताच की काय, ते अश्रूंनी भरून गेले. तिच्या तोंडातून एकही शब्द बाहेर पडेना

शेवटीं ' विमल ' एवढेच शब्द अरविंदाच्या तोंडून बाहेर पडले, त्या वेळीं तिच्या क्रोधाचा पारा प्रमाणाबाहेर चढून ती चवताळली व ती अरविंदाकडे पाहात क्रोधाने म्हणाली,

" ग्रामसेवेच्या बुरख्याखालीं असले ढग चालविलेस इथं ? मला मात्र सपशेल फसविलंस अं ! "

पुढे तिचा कंठ भरून आला. तिच्या तोंडातून शब्दच उमटेना. ती मटकन् खालीं बसली. तिने डोळ्यास पदर लाविला!

* * *

काय चमत्कार पहा ! एकाद्या हरिणीने स्वसंरक्षणार्थ धावत धावत

जाऊन एकाद्या गुहेचा आश्रय करावा व थोडा समाधानीचा सुस्कारा टाकावा, तोंच तिच्या कानावर वाघिणीची डरकाळी ऐकू यावी. एकाद्याने उन्हाच्या तापानें त्रासून शीतल छायेचा आश्रय करावा, पण ताबडतोब तेथे त्याला विंचू डसावा. उन्हातान्हातून दमून भागून आलल्या एकाद्या धेनूला सुंदर जलनिर्झर दिसावा व तिने आतुरतेने त्या पाण्यास तोंड लावावें, तोंच त्या उष्णोदकाच्या निर्झराचा तिच्या तोंडास चटका बसावा.

तशीच स्थिति जिजाची झाली. ती सकाळपासून काम करून थकली होती. श्रीपतीच्या टोचक शब्दांनीं तिच्या मनाला अत्यंत त्रास झाला होता.

बच्चानें रातांळीं उकरल्याबरोबर तिने त्याच्याबरोबर एक टोपलीभर रातांळीं शेटजीच्या दुकानीं पाठविलीं व दुसरीं टोपलीभर ती घरीं घेऊन आली. घरी येताच श्रीपतीने न्याहारीदेखील केली नाहीं, हे तिच्या लक्षात आले. दूध घेऊन तो अरविंदाकडे गेला असेल, असें तिला प्रथम वाटलें. पण दुधाचे भांडे घरींच असल्याचें तिच्या नजरेस पडल्याबरोबर रागामुळें अरविंदाकडे दूध नेण्याचेंही त्याला भान राहिले नाहीं, हे तिच्या लक्षात आलें.

त्यामुळे ती श्रीपतीची व अरविंदाची शिदोरी घेऊन भर उन्हात रामगुफेकडे निघाली. त्या वेळी तिच्या पायास व मनासही चटके बसत होते. ती मनात म्हणू लागली, " श्रीपतीच्या अशा वागणुकीचा काय अर्थ समजावा ? आईबाप आजारी असता बच्चाने मदत केली, त्याबद्दल त्याचे उपकारच मानावयास पाहिजेत. श्रीपतीला जर कामाचा इतका उरक असता, तर बच्चाची मदत तरी कशाला घ्यावी लागली असती ! एकाद्याबरोबर बोलले, कीं पापबुद्धि उत्पन्न झाली, असें श्रीपतीसारख्याना का वाटावें ! शिक्षणानें मन सुसंस्कृत झालें नाहीं, हे त्याचे कारण, कीं आपल्या हाडीमासीं खिळलेल्या चालीरीतींचा हा परिणाम ! अशा माथेफिरूपणाने प्रेमाच्या माणसाच्या मनास किती त्रास होतो, ह्याची कल्पना त्याला का येऊं नये ! "

आपल्या आईबापाची स्थिति किती करुणास्पद झाली आहे, ते दारिद्र्यानें कसे गांजून गेले आहेत, त्यांच्या जमीनजुमल्याबर नजर ठेवून कोण

कसे व्यूह रचीत आहेत, ह्या विचारानीं तिच्या अंगावर शहारेच आले. श्रीपतीवर आपली सर्व भिस्त, परतु त्याचेंही असें वर्तन पाहून आता आपणास आधार तरी कोणाचा आहे, ह्या विचारात ती असतां तिच्या डोळ्यापुढे एक मूर्ति दिसूं लागली.

ती मूर्ति शात, तेजस्वी, करुणपूर्ण दृष्टीची, सयमी अशी होती. ती कोणा एकाद्या देवतेची नसून ती ज्याला खऱ्या भ्रातृभावाने 'दादा' म्हणून संबोधीत होती, त्या अरविंदाचीच होती. त्या पुरुषाच्याच सहवासानें श्रीपतीला अक्षरओळख झाली, त्याच्या स्वभावास थोडे बहुत योग्य वळण लागले, त्याच्यापुढे आपल्या दुःखाचा पाढा वाचावा, असे तिच्या भाविक मनाला वाटले. म्हणून ती श्रीपती व अरविद याची शिदोरी घेऊन रामगुफेकडे निघाली. तेथे गेल्यावर श्रीपती तिला दिसला नाहीं. म्हणून ती जास्तच उदास झाली. जड पावलाने ती रामगुफेंत शिरली व ती अरविंदाची शिदोरी तेथें ठेवूं लागली.

जिजा शिदोरी ठेवीत असता अरविद कळकळीने तिला म्हणाला, " श्रीपती आज नाहीं वाटतं घरीं ? ताई, तूं उन्हातान्हाचा किती त्रास घेतलास हा ! सखी बहीणदेखील इतकी काळजी घेणार नाही. दमलीस फार तूं ताई, बैस जरा. थोडा विसावा घे आधीं ! "

हे कळकळीचे शब्द त्याच्या तोडून बाहेर पडताच जिजाचे अतःकरण भरून आले. आपले दुःख त्याच्यापुढें ओकावें, असे जरी तिला वाटत असलें, तरी संकोचामुळे तिच्या तोडातून काहीं केल्या शब्द बाहेर पडेनात. ते पाहून अरविंदाला जास्तच करुणा आली व तो प्रेमळपणें म्हणाला,

" ताई, आपल्या वडील भावाला एकादी गोष्ट सागायला इतका संकोच का बरं ? तुझ्या बाबाची व आईची प्रकृति बरी आहे ना ? मग तुला इतक वाईट कशाबद्दल वाटतं ? "

अरविंदाच्या ह्या प्रेमळ शब्दानीं तिच्या डोळ्यातून अश्रु मात्र झपाट्यानें वाहूं लागले. शेवटी ती बोलूं लागणार तोंच श्रीपतीने हाक मारली.

तीही अरविंदामागून खिन्न मनानें रामगुफेतून बाहेर आली. त्या वेळींच विमलने संतापानें काढलेल्या उद्गाराचा रोख आपल्यावरच आहे, हें चटकन् तिच्या लक्षात आलें. त्यामुळे ती अत्यत क्रुद्ध झाली. तिचा म्लान चेहरा लाल झाला. एकाद्या अपरिचित श्रीमत स्त्रीने एकदम असे बोलावे, ह्याचें तिला राहून राहून आश्चर्य वाटले. विमल खालीं मान घालूनच बसली होती. तिनें जर त्या वेळीं जिजाकडे पाहिले असते, तर आपल्या शब्दाचा परिणाम एका निष्पाप तरुणीवर किती झाला, हे तिच्या ताबडतोब लक्षात आलें असत. त्या स्त्रीस सणसणीत उत्तर द्यावे, म्हणून तिचे ओट हालू लागले. थोडेसे आत्मसंयमन करून ती गभीरवाणीने म्हणाली,

" तुम्ही थोरामोठ्याच्या असाल आणि आम्ही अत्यत गरीब असू, तरी पण तुमच्यासारख आमच मन हलक नाहीं, बाईसाहेब ! दादासारख्या देवमाणसाशीं बोलताना असले घाणेरडे शब्द तुमच्या तोंडून निघतात तरी कसे ! तुम्हाला भाऊबहिणी नाहींत वाटत ! "

मधुकर जिजाकडे पाहू लागला. हा सर्वच प्रकार त्याला चमत्कारिक वाटला. विमल एकदम असें बोलेल, ही त्याला कल्पनाही नव्हती. तो काहींतरी बोलण्याच्या विचारात आहे, इतक्यात भय्यासाहेब तेथें आले. त्या वेळीं विमल उठली. त्यामुळें शिष्टाचाराच्या दृष्टीनें सर्वच वातावरण शात झालेलें दिसलें, तरी पण संशयाच्या जाळ्यात जो तो गुरफटला होताच !

---

## प्रकरण सोळावें.

# विविध दृश्यें !



दुसऱ्या दिवशीं सर्वच मंडळी अत्यंत गडबडींत होती. मुंबईहून रवाना झालेलें सामान येऊन पोहोचलें होतें. तें पाहण्यांत अरविंदाचें चित्त मग्न होऊन गेलें होतें. मॅजिक लॅटर्नची व्यवस्था व इतर साहित्याची योजना त्याच्या मनाप्रमाणें झाली होती. प्रत्येक वस्तु किती काळजीपूर्वक बनविली आहे हें भय्यासाहेब सांगत होते. लहानसा डायनॅमो व त्याला लागणाऱ्या सर्व वस्तु पाहून अरविंद थक्कच झाला !

विमल काय किंवा अरविंद काय, ह्या दोघानाही संशयपिशाचानें पछाडलें असल्यामुळें तीं पूर्वीप्रमाणें मोकळेपणानें बोलत नव्हतीं. मधुकरानें विमलचीं श्रीराम, सीता यांचीं चित्रें अरविंदाला दाखविलीं व तो म्हणाला,

"विमलच्या निघण्याच्या वेळच्या घाईवरून मला वाटलें, रामाच्या पुनर्भेटीस जाणाऱ्या सीतेचीदेखील इतकी धांदल उडाली नसेल !" मधुकर स्वतःच हसूं लागला.

त्यावेळीं त्याच्याकडे रागानें पहात विमल म्हणाली,

"कसली रे, दादा, चेष्टा तुझी ! सीता काय आणि तिची भेट काय, कांहीं तरी म्हणतोस झालं. खरं काय तें ज्याचं त्यालाच समजतं."

"हें मात्र खोटं नव्हे, विमल," अरविंद म्हणाला, "अगदीं शांतपणानें मनाशीं विचार केला, म्हणजे ज्याचें त्याला खरें काय तें कळतें. पण विचार न करितां बोलणाराला खरें कसें समजेल !"

त्याच्या बोलण्याचें मर्म तिच्या लक्षांत आलें व ती थोडी विरमली. भय्यासाहेबांची सामान सोडण्याची धांदल चालूच होती. मजुरांच्या

चाळींत शिक्षणाचा प्रयोग यशस्वी झाल्याचे त्यांनी अरविंदास सांगितले व येथेही आज तो प्रयोग करण्याचा आपला हेतु त्यांनीं त्यास कळविला. श्रीपती तेथे हजर होताच. रामसीतेच्या पटांगणातील मंडपात रात्रीं साहेब चित्राची मजा दाखविणार आहेत, अशी वर्दी त्याने गुराख्यांना दिली. ते ही बातमी ऐकून उड्या मारीत परतले गावांत गेल्याबरोबर ती बोलकी जाहिरात गावभर पसरण्यास वेळ लागला नाहीं. रामसीतेचा डोंगर गावांतील लोकांना अगदी जवळ वाटत असे. स्त्रीपुरुषांची गर्दी रात्रीं आठ वाजल्यापासून तेथे लोटू लागली.

त्या जमावांत लंगोट्याचाच भरणा मुख्य होता. स्त्रियांचा भरणाही कांहीं कमी नव्हता. त्यांच्या अंगावरील फाटकींतुटकीं वस्त्रे पाहून निमलला त्यांची फार दया आली. गरिबी कशास म्हणतात, ह्याची कल्पना मुंबईत गाद्यागिरद्यांवर लोळणारांना येणे शक्य नाहीं. प्रत्यक्ष खेड्यापाड्यां तून हिंडलें पाहिजे, हे तिला पटू लागलें.

अरविंदाच्या योजनेप्रमाणे भय्यासाहेबांनीं श्रीरामाचीच सोप्या भाषेत कथा सांगून मॅजिक लॅटर्नच्या सय्याहाने चित्रें दाखविण्यास सुरुवात केली. श्रीरामाचे चित्र पाहिल्याबरोबर सर्वांनीं हात जोडले. लगेच त्यांनी सीतेचे व नंतर श्रीरामसीतेचे चित्र दाखविले. हात जोडण्याचा प्रकार चाललाच होता. मधुकर व भय्यासाहेब यांना ह्या भाविकपणाचे हसू येत होते.

चित्राच्या साहाय्याने शब्द दाखविणें व नंतर नुसता शब्दच दाखवून त्याचा उच्चार करवून घेणें हें काम चालू झाले. ते लोक देवाच्या नावाचा उच्चार आनंदानें करीत होते. त्या त्यांच्या वृत्तीचा फायदा पुढें निरनिराळ्या शब्दांचा उच्चार करण्याकरितां झाला. लोकांचा उत्साह कमी होऊं लागल्याबरोबर ते काम अरविंदाने हातीं घेतलें आणि आपल्या गोड व प्रेमळ वाणीनें पुन्हा सर्वांचें लक्ष वेधून टाकले.

त्या दिवशींचा कार्यक्रम संपला. पाटील व शेटजी हे गंमत पाहण्याच्या हेतूनें आले होते. शेवटीं, शेटजी आपल्या गोड वाणीने अरविंदास म्हणाले,

" साहेब, फार छान शिकविलं तुम्हीं ह्या अडाण्याना. गावातच हे चागलं जमेल. तेथें तेव्हाच लोक गोळा होतील. अजून आठ पंधरा दिवस पाऊस काहीं पडत नाहीं, तेवढ्यात चार अक्षरं तरी येतील लोकाना!"

" हरकत नाहीं; आम्हाला गावातच काम करावयाचं आहे. पाहुणे काय, चार आठ दिवस राहतील. पण पुढें मी आहेंच ना ! " अरविंद म्हणाला.

" असले पाहुणे आमच्या गावाला येतात कशाला ! आता हुरडाही नाहीं. पण रताळ्याची हडी मात्र मोठी गोड असते. पाहुण्याना आपल्या घरीं बोलवा, शेटजी ! " पाटील हलकेच शेटजींना म्हणाले.

" उद्या आपले पाय लागू द्या आमच्या घराला, " शेटजी पाहुण्याना उद्देशून बोलू लागले, " आमचं गाव तर बघा ! असले पाटील आमच्या गावाला आहेत, म्हणून आमचा निभाव तरी लागतो ह्या गावात. "

शेटजींच्या आग्रहावरून त्याच्या निमंत्रणाचा स्वीकार करण्यात आला. जवळच श्रीपती होता. त्याला एका बाजूस बोलावून रताळीं आणून देण्याचा शेटजींनीं हुकूम केला. सर्व निघून गेले; नंतर श्रीपती म्हणाला,

" रताळीं आमचीं आणि तीं शेटजी पाहुण्याना देणार ! मग दादा येथंच हंडी करूं या कीं; शेटजींकड कशाला ? "

" तुझा सावकार आहे ना तो ! " अरविंद म्हणाला, " तेव्हा जाऊं या उद्या त्याच्याकडेच ! मग करूं एकादे दिवशीं बकुळीखालीं दुसरी हंडी ! पण काय रे, श्रीपती, आज जिजा आली नव्हती इकडे ! सखारामाची प्रकृति बरी आहे ना ? "

" हा सखाराम कोण रे ? " काहीं आठवलेंसें वाटून मधुकर म्हणाला.

" आपला वॉर्डर सखाराम, आणि त्याचीच मुलगी ही जिजा." अरविंद गंभीर स्वरात म्हणाला.

" तो सखाराम याच गावचा का ? " मधुकर म्हणाला; " ठाण्याच्या स्टेशनवर भेटली तीच मुलगी जिजा होय ? आणि तो तिचा पदर ओढणारा

मनुष्य ह्या गावचा पाटील ! सखाराम केव्हा सुटला कैदेतून ? फारच गरीब ! पण तो कैदेत पडला ह्यात त्याचा कांहीं अपराध होता का रे, अरविंद ? तू आता ह्या गावातच र्‍हाहेस, तेव्हा कळली असेल तुला खरी हकिकत ! ”

“ ते एक मोठं पुराणच आहे, मधुकर. खेड्यातले ग्रामकंटक अशा गरीब माणसाना चैन पडूं देतात का ? तेच वाद उत्पन्न करितात, कोणाकडून तरी गुन्हे घडवून आणतात, व तेच आपल्या स्वार्थाच्या आड येणाराना तुरुंग दाखवितात. पण आपल्यासारख्याना तेच सभ्य वाटतात व गावचे पुढारी म्हणूनही तेच मिरवितात. फार काय सागाव ? खेड्यापाड्यात प्रति-सृष्टि निर्माण करणारे प्रतिब्रह्मदेव तेच असतात. थोडे दिवस जर येथं तुम्ही राहिलात, तर दिसेल तुम्हाला मी म्हणतो हे खर कीं खोट ! ”

शहरातील श्रीमंत गृहस्थ खेडेगावीं आला, म्हणजे त्या गावातील लोकाना विशेष कुतूहल वाटतें. त्यालाही खेड्याच्या मोकळ्या हवेचे व लोकाच्या गरीब स्वभावाचें प्रथम प्रथम कौतुक वाटत असतें. आमच्या मुंबईहून आलेल्या मडळींची मोटार, त्याचे शहरी पेहेराव व त्याचा इतमाम त्या गावातील लोकाना चकित करून टाकण्यासारखा होता. ते कोणी तरी फार मोठे लोक आहेत अशी शेटजींची व पाटलाची खात्री होण्यास फार वेळ लागला नाही.

अरविंदाला मॅजिक् लॅटर्नच्या साहाय्याने लोकाना शिक्षणाची गोडी लावण्याचें काम साधावयाचें होतें. त्यामुळे दुसऱ्या दिवशीं गावातच सदीप व्याख्यान देण्याचे त्यानें ठरविलें. त्याप्रमाणे आता पाटलाकडून लोकाना वर्दी मिळाली.

रात्री आठ वाजण्याच्या सुमारास पाहुणे मडळी गावात जाण्यास पायींच निघाली. अरविंद अगोदरच पुढें गेला होता. रजनीनाथ तुरळक तुरळक मेघपक्तींतून मार्ग काढीत धावत चालला होता. मद मद वायु वाहात होता. त्यामुळे मडळीना मार्ग आक्रमण करणे मोठ्या आनदाचे वाटत होते. मधुकर व श्रीपती हे बोलत बोलत पुढे चालले होते. विमलचे पाऊल

मंद गतीनें पडत होतें. भय्यासाहेब तिच्याहीपेक्षा हळूहळू चालले होते. चंद्राकडे पाहून त्यांच्या मनात एक सुंदरशी कल्पना आली व त्यांनीं आपली गति वाढवून विमलला गाठले व ते हसत हसत तिला म्हणाले,

" विमल, ह्या चंद्राला कोणाची ओढ लागली आहे म्हणून हा असा मारखा धावत आहे बरं ? "

" त्याचा हेतु मला कसा समजणार, भय्यासाहेब ? " विमलनेंही हसत हसतच उत्तर दिलें.

भय्यासाहेबाना अपेक्षित उत्तर मिळाले नाही, तरीही ते पुढे म्हणाले,

" विमल, ती चित्रा तारका पाहा. तिच्या ओढीमुळेच ह्याची धावपळ चालली आहे, असे नाहीं का तुला वाटत ? "

भय्यासाहेब झपाझप पावले टाकीत आहेत ह्याचे कारण आपले आकर्षण होय हा त्यांच्या बोलण्यातील अतस्थ हेतु जाणून विमल म्हणाली,

" पळत असेल आकाशात त्या तारकेच्या ओढीन रजनीनाथ बिचारा ! पण मला वाटतं, कीं जर तो ह्या लोकी असता, तर कदाचित् तारकाच त्याच्यामाग आपण होऊन धावती ! "

आणि खरोखरच विमल झपाझप पावले उचलूं लागली. आपल्या मनाची अरविंदाकडे असलेली ओढ त्याना कळावी, म्हणूनही तिने आपला वेग कदाचित् वाढविला असेल. ह्या वेळी भय्यासाहेबाना काही तरी सुंदर व मधुर बोलावे, आणि आपला आशय जास्त स्पष्ट करावा, असे वाटत होते. मनातील विचार कसे प्रकट करावे ह्या चितनात ते गर्क झाले असता, पूर्वेस विजा चमकूं लागल्या. विमलही त्या वेळीं झपाट्याने पुढें गेली व तिने मधुकरास गाठले. तेथे सखारामाच्या मळ्याजवळ शेटजी व बच्चा गावातून आलेले त्याना भेटले. श्रीपतीस पाहिल्याबरोबर शेटजी एकदम त्यावर उसळले,

" शिरप्या ! रताळीं आमच्या घरीं नेऊन दिलीं नाहीस ? इतकं बेगुमान वागून चालणार नाही, समजलास ! "

" मी मोकळा नव्हतो, शेटजी ! कामातच होतो. बच्चा मोकळा होता तुमचा. त्याला उकरायला सांगायची कीं नाहीं ? " श्रीपती म्हणाला.

" मी चाकुर लागलुया तुजा व्हय, शिरप्या ? तुजा सावकार त्यो. तू कर काम त्येच. माजं खेटर अडलया तुजं काम करायला ! " बच्चा मध्येच खेंकसून बोलला.

श्रीपतीला ह्यामुळे राग आला. तो दोन पावलें पुढें टाकून जोराने म्हणाला, " मी कुणाचा पण चाकर नाहीं. तूच शेटजींचा गुलाम आहेस."

" शिरप्या, तोंड आवरून बोल. तुला मीं काम सांगितल होत. तूच करायला पाहिजे होत तें ! चल जा आता. रताळीं उकरून आण आधीं."

शेटजी जोराने बोलले. श्रीपती नाइलाजाने परतला. त्या वेळीं शेटजी पाहुण्याना म्हणाले,

" चला आपण पुढ जाऊ. चावडीपुढ तमाम लोक जमा झाले आहेत. रावसाहेबानीं चित्रें दाखविण्यास सुरुवातही केली आहे. मी येणार नव्हतों, पण हीं आडमुठी माणस वेळेवर काम करतील तर शपथ ! "

गेल्या रात्रीं शेटजी परत गेल्यानंतर श्रीपतीने सांगितलेले भय्यासाहेबाना आठवले, म्हणून त्याची शहानिशा करून घेण्याकरिता ते म्हणाले,

" जर तुमचच ते शेत असेल, शेटजी, तर मात्र त्याचा आडमुठेपणा दिसतो खरा ! "

" हे लोक आडमुठे ह्यात काय संशय ? " शेटजी बोलूं लागले, " श्रीपतीला जमीन आहे कुठ ? सारी जमीन माझी. उगीच उपाशी मरेल तो म्हणून त्याच्याकडे ठेवली आहे झाल ! मग सांगा, मालकान सांगितलेल काम कुळानीं करायला नको का ? "

" त्याच्या तरी हातीं काय लागत असेल, शेटजी ? " शेतकऱ्याची कड घेऊन भय्यासाहेब म्हणाले. " त्यानीं रात्रंदिवस शेतात खपाव आणि आयता माल तुमच्या पदरात टाकावा. ह्यात खरा फायदा तुमचाच."

" पण पैसा ओतावा लागतो ना आम्हाला ? फुकट कोणी कोणाला

देत नाहीं, साहेब ! आणि गेलेला पैसा काढण्यास कोण जीव तोडावा लागतो ! तालुक्याच्या, जिल्ह्याच्या आणि मुबईच्या वकिलाच्या पदरात किती पैसा ओतावा लागतो, हे टाऊक आहे का तुम्हाला, साहेब! मुंबई-च्या गोडाबे वकीलसाहेबाना विचारा, मींच त्याची धन किती केली ती!" शेटजी जोरानें म्हणाले.

विमलला गोडाबे वकिलाचे नाव ऐकल्याबरोबर एकदम सोन-गावच्या पत्राची आठवण झाली. तें पत्र पाठविणारे शेटजी हेच असावेत अशी तिनें अटकळ बाधली. नतर ती मधुकराला म्हणाली,

"तुझे स्नेही गोडाबे वकील ह्या शेटजींच्या माहितीचे दिसतात, दादा!"

हे विमलचे शब्द ऐकून शेटजींना जास्त हुरूप आला व ते म्हणाले,

"आमच्या माहितीचे आहेत ते चागले. आम्हाला त्याचीं नेहमीं पत्र येतात, बाईसाहेब ! "

विमलचा चेहरा खिन्न झाला. मधुकरालाही ह्या विषयावर बोलणे नको होतें. थोड्याच वेळात ते गावात आले. लॅटर्नचा उपयोग केल्यानें लोकाची करमणूक होऊन अक्षरओळख चागली होते, असा अनुभव अरविंदास आला. मात्र जास्त वेळ शिक्षण दिल्यास तें कटाळवाणे होईल, असे त्याला वाटले. म्हणून तो फिल्म दाखविण्याकरिता भय्यासाहेबाची वाट पाहात होता.

इतक्यात भय्यासाहेब आलेच. त्यानी ताबडतोब आपले काम सुरू केलें. फिल्मकरिता सुंदरशी गोष्ट निवडली होती. त्या गोष्टीच्या साराशातील काहीं शब्द अगोदर झालेल्या शिक्षणक्रमाला धरून होते. ते शब्द काहीं वेळ पडद्यावर राहावे, अशी योजना फिल्ममध्ये केली होती. त्यामुळे ते लोक भराभर शब्द वाचूं लागले. त्या वेळीं अरविंदाला आपल्या तयार केलेल्या योजनेचा अभिमान वाटला.

शक्य तितक्या लवकर अक्षरओळख व्हावी, म्हणून कापडावर अक्षरें व शब्द काढलेलें भरपूर साहित्य मुबइहून आणविले होतें. तें दुसरे

दिवशीं देवळात व चावडींत लावावयाचे आहे, कोणींही येऊन तें वाचावें, अशी अरविंदानें लोकाना विनति केली. थोड्या दिवसात पुस्तकें वाचून दाखविणारास मुबईच पाहुणे निदान एक एक रुपया बक्षीस देणार आहेत, असेंही अरविंदाने लोकाना जाहीर केले. त्यामुळे तरुण मडळींना आनंद झाला. अशा रीतीने त्या रात्रीचा कार्यक्रम सपला.

नतर शेटजीच्या अत्यत आग्रहामुळे ही मंडळी त्याच्या घरीं रात्रीं दहाच्या सुमारास आली. तेथे श्रीपती व जिजा ह्यानी उकडहडीची तयारी केली होती. गावातील नमुनेदार रुचकर आंबेही शेटजींनी पैदा केले होते. परत जाण्याची घाई त्या मडळीनी पुष्कळ दाखविली, परतु शेटजीच्या लाघवी भाषणामुळे व पाटलाच्याही आग्रहामुळे त्या मडळींस उठता येईना. पाटलाचे वडील पोवाडे रचणारे चागले शाहीर होते. त्यांनीं आपल्या कवनाचीं बाडेच्या बाडे लिहून ठेविलेली होती. वडिलांनीं केलेले पोवाडे पाटील उत्तम रितीनें म्हणत असत. रात्रीच्या वेळेखेरीज पोवाडे म्हणण्यास रंग येत नाहीं अशी त्याची समजूत होती.

त्या वेळीं पाटलानीं आपला उत्तम प्रकारचा डफ आणविला व त्यावर एक दणकेबाज थाप दिली. पाटील आपल्या गावी चारचौघात पोवाडे म्हणत नसत, कारण आपली कला जाणणारे लोक त्या गावीं नाहींत अशी त्याचीं समजूत होती. त्यामुळे पाटलाचे पोवाडे ऐकण्याचे प्रसग गावातील लोकाना फार थोडे येत असत.

पाटलानीं वीरासन ठोकले व ते शेटजीच्या माडीवरील मडळीपुढें पोवाडे म्हणू लागले; त्या वेळीं शेटजीच्या घराबाहेरील बाजूस तुफान गर्दी लोटली होती. पाटलाचा आवाज पहाडी होता. त्यामुळे दूर अतरावरील लोकानाही तो स्पष्ट ऐकू येत असे.

आपल्या घराण्यातील पूर्वजानी मराठ्याचे काळीं कोणकोणते पराक्रम गाजविले ह्या वर्णनाचा पोवाडा त्यानी प्रथम म्हटला. त्यातील आरभींचे चरण पुढीलप्रमाणे होते—

आम्ही राव मोठे शिलदार। होतो सरदार। हातीं तरवार।
दाविला हो हात आम्हीं गनिमांस। घेतला सूड तयांचा खास।
राखिलें मराठ्यांच्या नांवास। जीऽऽ जीऽ जीऽ जी ॥

पोवाडा म्हणत असता त्याच्या नसानसातून वीरश्री उचंबळून येत होती. योग्य प्रसंगांचे आविर्भाव त्यानीं इतके उठावदार केले, कीं त्यामुळें आमच्या मंडळींच्या अंगीं देखील स्फुरण चढल्यासारखें झालें. आजच्या पोवाड्यानी त्याच्या मनात ज्या भावना उसळल्या व त्यामुळें त्याना जो आनंद वाटला, तसला आनद मुंबईत नाटकेंसिनेमा पाहून देखील त्याना यापूर्वीं वाटला नव्हता !

एक पोवाडा सपल्यानंतर आपल्या घराण्याच्या झालेल्या दुर्दशेचा जो दुसरा पोवाडा पाटलानीं म्हटला, त्यातील पहिले चरण पुढीलप्रमाणे होते.—

आतां आम्ही चटणि भाकरी। खातों भलिबुरी। धरितों हातीं कुरी।
जाहलो हो महाग दमडीस। घेतले हो हातीं कलमास।
आतां आमुचा जाच गरिबास। जीऽऽ जीऽ जीऽ जी ॥

ह्या पोवाड्यानें आमच्या मंडळींचीं अंतःकरणे पिळवटून निघालीं. तरवार गेली. पराक्रम संपला. वैभव नाहींसें झाले. हातीं नागर आला व चार रुपयाची पाटीलकी घेऊन—पराक्रमानें नव्हे—कलमबहादुरीने लोकाच्या माना कापण्याचा दुर्धर प्रसंग आला, वगैरे त्याच्या वडिलानीं पोवाड्यात जें वर्णन केलें होते, तेंही त्यानीं तन्मय होऊन म्हणून दाखविले.

त्यानतर त्या भागातील वीर स्त्रियानीं केलेल्या पराक्रमाचे पोवाडे त्यानीं म्हटले. त्यामुळे अज्ञात इतिहास ठिकठिकाणीं कसा विखुरलेला आहे, ह्याची मंडळींना चागली कल्पना आली. शिवाय अशा पोवाड्यांचा उपयोग साक्षरताप्रसाराच्या कामीं करून घेतल्यास लोकांचें लक्ष वेधण्यास त्याचा फार उपयोग होईल, असेही अरविंदास वाटलें.

एक वाजण्याची वेळ येऊन ठेपली. सर्वांचे डोळे झोपेकरिता चुरचुरूं लागले. कार्यक्रम संपवावा असें अरविंदानें शेटजींना सुचविलें. पाटील तर

ऐन रंगात आले होते. श्रीपती त्या पोवाड्यानीं तल्लीन होऊन गेला होता. बच्चा एका बाजूच्या कोपऱ्यांत घोरत पडला होता. स्त्रियाच्या पराक्रमाच्या वर्णनानें जिजाला नवचैतन्य प्राप्त झालें होतें. तिनें हळूच श्रीपतीकडे पाहिलें. त्या वेळीं आपणा उभयताच्या मनात भाव एकच आहे, असें तिला पूर्णपणें पटले.

पाटलाचे पोवाडे चालू होतेच. परंतु त्या वेळीं विजा चमकूं लागल्या. भयंकर गडगडाट होऊं लागला. जोराचें वादळ सुटलें. घरावरचीं कौलें उडून जातात कीं काय असे वाटूं लागलें. वृक्ष इतक्या जोरानें हेलकावे खाऊं लागले, कीं वाऱ्याच्या सोसाट्याबरोबर त्याच्या हेलकाव्याचा येणारा आवाज मंडळींच्या मनात भीति उत्पन्न करू लागला. वृक्ष मोडून पडल्याचे कडाड्ड् असे आवाजही मंडळींच्या कानीं येऊं लागले.

त्या वेळीं पाटलाना पोवाडे म्हणण्याचें काम बंदच करावे लागले. त्यानी थाटात मुजरा केला. शेटजी व मधुकर आदिकरून मडळी एका बाजूस गेली व शेटजींनीं आणून दिलेले चादीचे कडें मधुकरानें पाटलाच्या हातात घातले. थोड्या वेळानें इतका भयकर गडगडाट झाला, कीं क्षणभर सर्वांचे कान बधिर झाले. कोठेतरी वीज पडली, असें जो तो म्हणू लागला. पर्जन्य इतका जोराचा पडत होता, कीं त्या वेळीं आकाशच फाटलें कीं काय, असें वाटू लागले ! ह्या आकस्मिक प्रकाराचे सर्वांना आश्चर्य वाटले. अरविंदाचें मन मात्र अत्यंत अस्वस्थ झाले. त्याला गोरगरिबाची त्या ठिकाणची राहणी माहीत होती. लोकांचे फार हाल होतील, हे तो जाणत होता.

अशा स्थितींत काहीं वेळ गेला. तो पाऊस काहीं पावसाळ्याचा झिमझिम पडणारा नव्हता. अद्याप मृग लागण्यास थोडा अवधि होता. देशावरच्या भागात असा वळवाचा पाऊस रात्रीच्या वेळीं क्वचित् पडतो. पण त्या रात्रीं मात्र त्यानें थोड्या वेळात कहर उडवून दिला. एका तासानें मेघनादही बंद झाला. इतका वेळ चंद्रमा आकाशात दडलेला होता, परंतु आता त्यानें आपल्यावरील मेघाचा बुरखा झुगारून दिला. ठिकठिकाणच्या पाण्याच्या

डबक्यात त्याचें प्रतिबिंब पडलेलें होते. जणू काय, लोकाचे हाल पाहण्याकरिताच तो पृथ्वीवर अवतरला होता !

ह्या थोड्या वेळात गोरगरिबाची किती दैना उडाली हें कांहीं विचारूच नका. गोप्याच्या कुटुंबावर तर आकाशच कोसळलें होते. तो त्या वेळीं धावत धावत शेटजींच्या घरीं आला व पाटलाना रडव्या स्वराने हाका मारू लागला. त्याचा शब्द ऐकून पाटील माडीवरून म्हणाले,

" गोप्या, आमच्या घरून आलास काय रे ! घरात जिकड तिकड गळलं असेल. गुर पण काकडली असतील. धान्य तर भिजल नाहीं ना ! "

" जोहार मायबाप, पाटीलसाब. इकड खालीं या. माझी बायकु आता जगत नाई. माजं नसीब फुटलं आता !" गोप्या रडव्या स्वरात म्हणाला.

अरविंदाने हे बोलणे ऐकले. तो गोप्याकडे धावत गेला. गोप्यानें रडत रडत सागितलेली हकिकत त्याने ऐकली. तो झटकन् वर आला. त्यानें आपली औषधाची बॅग हातात घेतली. त्याची चाललेली हालचाल श्रीपती व जिजा पाहात होतीं. अरविंदाबरोबर निघण्याची श्रीपतीनेही तयारी केली.

त्या वेळीं अरविंद विमलला म्हणाला,

' चलतेस का मजबरोबर ! गरीब बायामाणसावर आपत्तींचा कडेलोट झालेला दिसत आहे. "

"नको,नको," शेटजी म्हणाले,"त्याना कशाला नेता अशा वेळीं ! कांहीं नाहीं होत अशाना ! सकाळीं पाहता येईल. तुम्ही तरी कशाला जाता आता !"

" तूंच फार तर जाऊन ये, अरविंद," मधुकर म्हणाला, " आतां ताईला अशा भयकर वेळीं कशाला नेतोस बरोबर ! "

" बायामाणसाची जरुरी दिसते मला, दादा ! " जिजा बोलूं लागली, " मी येतें तुमच्याबरोबर. अशा वेळी बाईसाहेबाना नका देऊं तसदी. जाताना खाचखळगे फार आहेत. खेड्याच जिण त्याना कस ठाऊक असणार ! "

तिचे ते शब्द ऐकून व तिने निघण्याकरिता काचा मारून पदर

खोंवलेला पाहून, काय असेल ते असो, विमलला जावेसे वाटूं लागले.

" चल तर, येतें मीही ! " विमल म्हणाली.

तिच्या शब्दात नाखुपीची छटा दिसत होती. तथापि अरविंद काहीं बोलला नाहीं. ती निघाल्याबरोबर शेटजींखेरीज सर्वच मडळी बाहेर पडली. पाटील सर्वांच्या पुढें झाले. गोप्या आपल्या घराकडे लंगडत लंगडत धावला.

रस्त्यावरील डबक्यातून मार्ग काढीत काढीत ही मडळी गावाबाहेर पडली. जिजाच्या सुटसुटीत साडीमुळे तिला पाऊल उचलण्यास जड जात नव्हते. विमलला मात्र आपली साडी आवरता आवरता पुरेवाट झाली.

गावाबाहेर पडल्यावर अधुक झोंपड्या दिसूं लागल्या. अगदीं टोंकाला गोप्याचे घर होते. त्यामुळे त्या झोंपड्याजवळून जाणे सर्वांना भाग होते. सर्वत्र चिखल झालेला व घाणीचा दर्प सुटलेला होता. त्यामुळे त्या शहरी मंडळींना पाऊलही पुढे टाकवेना.

तेथे सर्वत्र पोराबाळाची रडारड चालली होती. कोणत्याही झोपडींत औषधालाही कोरडी जागा दिसत नव्हती. पुरुषाच्या अंगावरील वस्त्र म्हणजे अब्रूरक्षणार्थ त्यानी घातलेली लगोटी. तसलीच स्त्रियाची अवस्था. हे श्रीमत लोक अशा भयकर वेळीं आपल्या बाजूस आलेले पाहून आश्चर्याने ज्यानीं त्यानीं तोंडात बोटें घातली. काही झोपड्यात मिणमिण प्रकाश देणारी राकेलची चिमणी तेवत होती. तिच्या शेजारींच फाटकीं तुटकीं लकतरे, फुटकीं मडकीं, झोपडींतून टिपटिप ठिबकणाऱ्या थेंबापासून संरक्षण करून घेण्याकरिता त्या दिवलीभोवतीं फेर घालून बसलीं होतीं.

ही सारी स्थिति पाहात पाहात मंडळींचे एक एक पाऊल पुढें पडत होतें. त्या वेळीं प्रत्येकाच्या तोंडातून च् च् असा दुःखदायक शब्द बाहेर पडल्याशिवाय राहात नव्हता !

अखेर गोप्याच्या घरकुलापुढे मंडळी आली. तेथील अवस्था तर काय वर्णावी ! पोरानीं रडून रडून आकात माडला होता. घरात पाचचार बाय-कानीं गर्दी करून पोराना बाहेर काढल्यामुळे तीं चिखलात लोळत होतीं.

त्याचीं जनावरे जवळच्या झाडाखाली बाधलेलीं होतीं. तें झाड मोडून पडल्यामुळे तीं त्याखालीं चेंगरून गेलीं होतीं. हा सर्व प्रकार पाहिल्याबरोबर पाटील म्हणाले,

" साहेब ! मघा वीज कडाडली ती येथेच पडली बर का ? जनावर मेलीं, आता पंचनामा केला पाहिजे मला ! "

आणि खरोखरच भयकर गडगडाट होऊन त्या झाडावर वीज पडली होती. तें झाड तर मोडून पडलेच, पण त्याखालीं एका छपरात बाधलेल्या बकऱ्या मेंढ्याही मरून गेल्या. त्या भयकर आवाजानें गोप्याच्या बायकोचा गर्भपात होऊन ती त्या झोपडींत पावसानें चिंब झालेल्या रकट्यावर मूर्च्छितावस्थेत पडली होती. त्यामुळेंच आयाबाया तेथें गोळा झाल्या होत्या.

गोप्या पुढे सरकला. मागून अरविंद व त्याच्या मागोमाग जिजा मदतीकरिता धावली. विमललाही आता राहवेना. तीही पण पुढे झाली. परिचारिकेच्या शिक्षणाचा उपयोग तेथे कसा करावा, हे तिला समजेना !

\+ + +

गोप्याच्या घरात निजण्यास जागा नसल्यामुळें बाजूच्या जनावराच्या छपरात त्याचें एक आठ दहा वर्षांचें पोर निजले होते. घरातील घोटाळ्यामुळे तिकडे अद्याप कोणाचेंच लक्ष गेले नव्हते. पाटलानीं पाच दहा लोकाना बोलावून त्या झाडाच्या फाद्या दूर कराविण्याचें काम सुरू केले. मृत जनावरें ते लोक बाहेर काढू लागले. त्या वेळीं त्या मंडळींच्या मनास एकदम धक्का बसला. गोप्याचे तें पोर तेथें त्याना मेलेले आढळलें. सर्वांचीं अंतःकरणे दुःखानें पिळवटून निघालीं.

गोप्याच्या कानावर ही हकिकत जाताच तो धावत येऊन आपल्या पोरास मिठी मारून आकात करूं लागला. त्या वेळची ती त्याची करुण स्थिति पाहून सर्वांचे डोळे भरून आले.

थोड्याच वेळात नजरेस आलेल्या विविध दृश्यानीं त्या मडळींच्या मनात खळबळ उडून गेली असल्यास त्यात नवल तें कोणतें ?

---

## प्रकरण सतरावें.

# नवी नवरी !



आमची मंडळी शेटजींच्या घरीं परत आल्यानंतर बच्च्याला सर्व हकिकत कळली. त्याबरोबर तो तडक आपल्या घरीं आला. चिमाला त्याने जागें केलें. तिला सर्व हकिकत सांगितली. गोप्याबद्दल तिला वाईट वाटलें, पण जिजाबद्दल ती फणफणत बोलली,

" जिजी इतक्या रातीची म्हारवाड्यात गेली व्हती म्हनतोस ! कार्टीनं अगदीं ताळतंतर सोडलंय, रादेला खपत तरी कसं ! म्हमईत असं थेर चालूं दिलं नमतं म्या तिचं ! "

चिमाची बडबड आणखीही चालणार होती, पण त्या वेळीं रायबा जागा झाला व त्रासिक स्वरात म्हणाला,

" चिमे, काय वटवट चालविलीस एवढ्या रातीं ! "

" मगा कडाड झालं तवा इज पडली म्हारवाड्यात !" चिमा म्हणाली, " गोप्याची बायकु आन् प्वारबी मेलं, बाबा. "

" अरर ! लइ वंगाळ झालं, " रायबा हळहळत म्हणाला, " गोप्याची बायकु पन् बायकु. लई हाल काडलं तिनं ! एवडा तुकडा पाटींत टाकला, कीं सांगाल ते काम करायची. रामा ! रामा ! गरिबाचा मोटा घात झाला. पन चिमे, आता तुला सांगाया कोन आलं इतक्या रातीं ? "

" बच्चा आलाय. जिजावी गेली व्हती म्हारवाड्यात म्हनतुया तो ! " चिमानें उत्तर दिलें.

" इतक्या रातीं कशाला जाव तरन्याताट्या पोरीनं तकड ! " रायबा म्हणाला. " कली मातला म्हनत्याती हेंच खरं ! "

" चिमा अक्का, " बच्चा म्हणाला, " अग, सिरप्या म्हनत व्हता जिजी सिवली त्या म्हारनीला ! "

" काय बाई म्हनावं या जिजीला ! " चिमा जळफळत बोलली. " कार्टीला घेऊन तरी ये, बच्चा. "

" अक्का, तूंच घेऊन ये तिला, " बच्चा गुरगुरत बोलला. " शिरप्या-संगं गोस्टी करीत बसलीया ती ! "

चिमा शेटजींच्या घरीं गेली. जिजाला पाहिल्याबरोबर तिनें तोंडाची सरबत्ती सुरू केली,

" कार्टे, म्हारवाड्यात रातीच्या येळी कशाला गेली व्हतीस मरायला ? चल घरीं, चार ताब्ये ओतते तुज्या डोसक्यावर ! "

हे कर्कश शब्द ऐकून जो तो चिमाच्या तोंडाकडे पाहूं लागला. जिजा मात्र शांतपणें म्हणाली,

" मावशी, मी एकटीच नव्हते गेले तिकडे. दादा आणि ह्या बाई-साहेबही होत्या बरोबर. गोप्यावर दैवाचा केवढा घाला पडला, तुला ठाऊक तरी आहे का ? अग माणसं तितकीं सारखींच. कसला विटाळ आणि कसलं काय ! "

" फार शानी दिसत्येस ! इटाळ कालव शेटजींच्या घरात. "

" जा, जिजे, " शेटजी म्हणाले, " तुझ्या मावशीचं बोलणं खरं आहे. आमच्या घरात विटाळ कालवूं देणार नाही मी ! "

त्या वेळीं कोंबडे आरवूं लागले. श्रीपतीला गुराढोराची आठवण झाली. तो मळ्यात निघून गेला.

आमची मंडळी बिछान्यावर कलंडली. त्या वेळीं मंद शीतल वारा वाहूं लागला. अशा वेळीं स्वाभाविकपणें झोंप लागावयाची, पण रात्रीं पाहिलेल्या हृदयभेदक दृश्यामुळें कोणासही स्वस्थता वाटत नव्हती, म्हणून झोंप लागेना. त्या वेळीं भय्यासाहेब म्हणाले,

" मधुकर, काय तो भयंकर देखावा! माझ्या डोळ्यापुढें जशाचा तसा

उभा आहे अजून ! ते लोक तरी काय ! यमयातनेच्या कल्पना काल्पनिक खऱ्या, पण असं दृश्य पाहिलं, म्हणजे यमराजाचं वास्तव्य परलोकीं नसून ह्या लोकींच आहे, असं वाटू लागतं ! ''

" ते लोक यमयातना भोगीत आहेत, हें पटतं खरं," मधुकर म्हणाला; " आणि असं वाटू लागतं, कीं जर परमेश्वर असेल, तर तो अगदीं अंध असावा ! "

" परमेश्वर अंध कसा ? " अरविंद म्हणाला. " आपणच आंधळे नाहीं का ? समाजाच्या अशा खालच्या थराकडे आपली खरी दृष्टि अजून गेली आहे का ? "

" मी युरोपातील समाज पाहिला," भय्यासाहेब बोलूं लागले, "त्याच्या-सारखीं श्रेष्ठ दर्जाचीं बुद्धिमान् माणसे आपल्यात आहेत, धनिकवर्गही आपल्यात नाही असें नाहीं; पण त्याच्यातील अगदी खालच्या दर्जाच मनुष्य व आपल्यातील शेवटच्या पायरीचा माणूस यात मात्र जमीन-अस्मानाचं अंतर दिसत ! "

" तुम्ही म्हणता ते अगदीं खरं आहे, भय्यासाहेब ! '' अरविंद शांत-पणे म्हणाला. " तिकडे जर अगदीं खालच्या दर्जाचे लोक शेकडा दहा आढळले, तर आपल्याकडे ते शेंकडा पन्नास तरी आढळतील. अहो, दूर-दूरच्या खेड्यापाड्यातील बहुतेक लोक असेच. त्याना धड अन्न ना वस्त्र !"

" बायकामुलाची स्थिति पाहिली, तर अंगावर काटा येतो, बाई ! " विमल म्हणाली.

"आहे खरी अशी स्थिति." अरविंदाकडे पाहून भय्यासाहेब आवेशानें म्हणाले. " पण रडत बसून काय उपयोग ? तींत बदल होण्याचे उपाय योजले पाहिजेत ना ? "

" अलबत ! " अरविंद झटकन् म्हणाला. " तसे मार्ग आपण शोधले पाहिजेतच. तरुणानीं शोधावयाचे नाहींत तर कोणीं शोधावयाचे ? "

" हे सारे भांडवलशाहीचे परिणाम आहेत, अरविंद ! " भय्यासाहेब

म्हणाले. " तिचा नि.पात करायला कंबर कसून लागू या. "

" आलात तुम्ही मूळपदावर, " मधुकर जोराने म्हणाला. " नुसती बडबड करूं नका. काय करावयाचं तें खेड्यापाड्यांत करायला लागा. शहरी वटवट आम्ही पुष्कळ ऐकली तुमची ! "

" यक्षिणीच्या काडीनं का होणार आहे ह्याची उन्नति, भय्यासाहेब ! " अरविंद बोलूं लागला, " तुम्ही काय म्हणता, ते धड समजेल तरी का ह्या लोकाना ! जितकं कमालीचं दारिद्र्य ह्या लोकात त्याहीपेक्षा जास्त भयंकर अज्ञान त्याच्यात आहे, हे प्रथम लक्षात घ्या. "

" त्या जहाबाज बाईच्या विटाळचांडाळासारख्या कल्पना कितीतरी असतील ह्याच्यात ! " विमल म्हणाली. " पिढ्यान् पिढ्या चालत आलेल्या ह्याच्या खुळ्या समजुती याच्या डोक्यातून निघणार कशा ! "

त्या वेळीं वृक्षावरील पक्ष्यांचीं गाणीं सुरू झालीं. सूर्योदयाची वेळ नजीक येत चालल्याचें पाहून अरविंद उठला, व त्याचा संवाद थांबला. ती मंडळीही आपापल्या बिछान्यावर आडवी झाली.

इकडे चिमाने जिजाला आपल्या घरीं आणल्यानंतर ती तिच्याशीं प्रेमळपणे बोलू लागली. जिजाने तिला रात्रीची हकिकत सविस्तर सांगितली. ती ऐकून चिमा म्हणाली,

" जिजे, समदं खरं, पन येळीं अवेळीं जाऊ नये, अशा ठिकानीं, बाळ ! ततं भुतं खेत नाचत्यातीं रातीच्या येळीं ! "

जिजा कांहीं बोलली नाहीं. पाणी तापवीत असता चिमाच म्हणाली,

" मला रडकीला पोर ना बाळ. तूच माजी ल्येक. सारा माजा जीव तुज्यावर. साताट महिन झाल तुला इकड आल्याला. तकड मलाबी करमना म्हनून दिली म्हमई सोडून तुज्याकरता ! पन जिजे, तूं मावशीला इसरलीस ! "

चिमाला हुंदका आला. तिने प्रेमळपणाने जिजाला सांभाळले होतें, तिचे लाड पुरविले होते, तिच्या शिक्षणाची काळजी घेतली होती, म्हणूनच

जिजात व खेड्यातील स्त्रियात मनस्वी अंतर दिसून येत होते.

" असं कस ग मावशी म्हणतेस ? " जिजा बोलू लागली. " मी तुला विसरेन तरी कशी ! आई व बाबा थकलेत तरी किती बघ ! त्यांची सेवा चाकरी नको का करायला मला आता ? घरचा कामधंदा आवरता दिवस तेव्हाच निघून जातो, बाई. त्यातले त्यात बच्चाजीराव बाजारहाट करून देतात म्हणून माझे हेलपाटे तरी चुकतात मावशी. "

" अग माजा भाऊच ना तो ? त्याला तुज हाल बघवतील तरी कस, जिजे ? तो काळासावळा दिसला, तरी त्येच मन अश्शी पाक हाय बर, जिजे ! "

चिमा आपल्या भावाची स्तुति करीत आहे, हे लक्षात आणून तिच्या मनाला बरें वाटावें, म्हणून जिजा म्हणाली,

" तूं म्हणतेस ते खर आहे. घोगडी काळीच असते, पण तिचा उपयोग कितीतरी होतो. अथरायला ती उपयोगी पडते. पांघरायला पण ती चांगलीच. पावसात तिची खोळ करून घेतली, कीं ती कोणाला भिजूं देत नाहीं. ती काळी म्हणून तिचा तिटकारा कोणी करतात का ग मावशी ? "

जिजाच्या बोलण्यावरून बच्चाविषयीं तिचा ग्रह बरा आहे, असे वाटून चिमा खुलली. हें पाहून जिजा म्हणाली,

" मावशी, घोंगडी दे ग मला. मी आता थोडी कलडतें, बाई. "

चिमानें तात्काळ तिला घोंगडी दिली. ती निर्मळ मनाची जिजा घोंगडीवर कलंडताच तिचा डोळा लागला.

पाण्याचा हंडा कडकडीत तापला. जिजाला झोंप लागलेली पाहून तिची झोपमोड करावी असें चिमाला वाटेना. नंतर ती दळण दळण्यास बसली. दळताना ती पुढील गाणें म्हणू लागली.

लगिनाचा ग वरघोडा । आला त्येला ग वाट सोडा ।
देवाच्या ग पायां पडा । भाऊराया ॥
लावीयेली ग चंदरजोती । घेतली ग पंचारती ।
भावा बहिन ववाळती ग । लगिनामंदीं ॥

तिचें गाणें चालू होतें. त्याच वेळीं तिला रायबा म्हणाला,

"चिमे, भावाच्या लगिनाचं दळन दळतीस वाटतं!"

चिमानें हे शब्द ऐकताच जातें बंद केलें.

"बाबा," चिमा आनंदानें म्हणाली, "लगिनाचं दिस अजून हायती बरं का! सोन्यासारकी सून तुला आनून दावली म्हंज झालं ना!"

"समजलं तुजं मला! जिजी दिसती नवरी तुला; पन सकारामाचा इच्यार शिरप्याला घरजावई करून घ्यायचा है, चिमे."

"बाबा, तूं काळजी नगस करू त्याची. पोरीच्या मनाचा ठाव घेत-लाया मीं!"

त्याच वेळीं, "आई, आई, कुठ गेलीस तूं! बाबा, बाबा," असें जिजा ओरडूं लागली. चिमा घाबरली व तिनें विटाळ वगैरेचा विचार न मानता तिला हलवून जागें केलें. तिनें चिमाच्या गळ्यास घट्ट मिठी मारली व ती स्फुंदू लागली. तिला कसलें तरी भयंकर स्वप्न पडलें होतें.

काहीं वेळानें बच्चा गडबडीनें घरीं आला व म्हणाला,

"कुट हायती बाबा! शेटजी गाडी मागत्याती. पावण लइ थकल्याती म्हन! कुटं नागूर धराया गेलेती कुनाला ठावं! उटल्याती आत्ताच आत-रुनातनं, आन चा पानी ढोसत्याती!"

त्या वेळीं जिजा म्हणाली,

"मावशी, मी जातें बाई घराकडे आता! दिवस उगवला कीं! आई वाट पाहात असेल माझी!"

"दम थोडीशी; आतां तुला न्हाऊं घालतें, आन आपुन दोगीबी जाऊं रादेकडे." चिमा म्हणाली.

तिनें शेटजींच्या दुकानातून शिकेकाई व खोबरेल आणलें. जिजाला चोळून चोळून तेल माखलें. राधाबाई थकल्यामुळें तिला इतके श्रम घेववत नसत. चिमानें कढत पाण्यानें तिला न्हाऊं घातलें, त्यामुळें जिजाचें अंग मोकळे झालें व तिला हुशारी वाटूं लागली.

चिमानें आपले भारी किंमतीचें नवें कोरें लुगडे तिला नेसण्यास दिलें. तिला तें लुगडे नेसणें पसंत नव्हतें, तथापि मावशीच्या आग्रहापुढें तिचें कांहीं चालेना. ती लुगडे नेसते न नेसते तोच बच्चा तेथे आला. त्याची नजर जिजाकडे गेली.

" बच्चा मी जात्यें रादेकडं, घर साबाळ चागलं ! " चिमा हसत हसत म्हणाली.

" पन आक्का, गाडीतन जा ना तुमी ! निवडुंग पडलाय जकड तकड रस्त्यामंदीं. चिकलबी झालाया लई. गाडीबी जाते तकडच्याच बाजूनं. "

बच्चाचे बोलणे ऐकून चिमालाही मजा वाटली. त्याच्याकडे पाहून जिजाही हसली व म्हणाली,

" मावशीचं लुगडं चिखलात न भरवूं देता जाईन बरं मी ! वाटेत काटे दिसले, तर फेकून देऊं बच्चाजीराव आम्ही ! मावशीनें आंब्याची पाटी घेतली आहे, तेवढी तुम्ही आणा म्हणजे झाले ! "

" नग ग त्येला असलं काम सागूं. मला जड झाली वाटतं एवडी पाटी ! " चिमा म्हणाली.

" मग मलाच घेतली पाहिजे ही जड पाटी, मावशी. " जिजा लडिवाळपणानें बोलली.

" तुला नव्या नवरीला ग कोन काम सागल, जिजे ! " चिमा बोलली व तिच्याकडे पाहून हसली. इतक्यात बच्चा म्हणाला,

" बाया मानसाना घेऊं देतोय व्हय मी यवडी जड पाटी ! "

ताबडतोब त्याने ती पाटी उचलली, आणि तो पुढें निघून देखील गेला. त्याच वेळीं पाटील शेटजीच्या घरापुढें आले. पाहुणे गाडीची वाट पाहात आहेत, हे त्याना समजलें. अरविंद पाहाटेच रामगुफेकडे गेला होता. आमच्या मंडळींना एवढा फेरफटका करण्याची ताकद नव्हती असें नाहीं, पण पावसाने रस्ते खराब झाले होते, म्हणून बाहेर पाय टाकणें त्याच्या जिवावर आलें होतें. पावसाचें पाणी जोराने वाहून गेल्यामुळे वाटेंत कित्येक

ठिकाणीं खड्डेही निर्माण झाले होते. त्यामुळे त्याची मोटार गावात येण्यास मार्ग नव्हता. शिवाय 'गाडी तयार आहे' असें त्याना सूर्योदयापूर्वीपासून शेटजी सागत होते. आठ वाजले तरी गाडीचा पत्ता नव्हता. मधुकरास कंटाळा आला. 'मोटार पाठवितों,' असे म्हणून तो एकटाच चालत निघाला.

रायबाचे बैल होते पण त्याची गाडी नव्हती, म्हणून तो गाडीसाठीं गावात हिंडत होता. पण जेथे गाडी मागण्यास जावे, तेथे कोणाच्या गाडीचे शिवाळच मोडलेले, तर कोणाच्या गाडीचे चाकच निखळलेलें, कोठें जुवाचा दोरच तुटलेला, तर कोठे कणाच मोडलेला, अशी स्थिति त्याला आढळली. शेवटीं कशीबशी एक गाडी मिळाली.

शेटजींनीं गाडीमध्ये गादीतक्क्याची तजवीज करून दिली, व गाडी चालू झाली. रायबा बैलाचे दोर घेऊन गाडीपुढे चालत होता. मधले खड्डे चुकविण्याकरिता गाडी लाबून न्यावयाची होती. मैलभर अंतराकरिता त्याला दोन मैलाचा फेरा घ्यावयाचा होता. रस्त्यानें खळखळ वाहत असलेल्या ओघळी लागत होत्या व बाध फुटल्यामुळे वाहून गेलेल्या जमिनीही दिसत होत्या.

गाडी हळूहळू चालली होती. खाचखळग्यामुळे ती एकसारखी खालीं वर होत होती. इतक्यात गाडीचे एक चाक एका मोठ्या धोंड्यावरून गेले व ते दणकन् खालीं आदळले. भय्यासाहेब ऐसपैस मांडी घालून बसले होते, व त्यानीं गाडीच्या दोन्ही बाजूंना घट्ट धरले होतें; त्यामुळें त्याना फार त्रास झाला नाही. पण त्या धक्याने विमलचा तोल गेला, व ती एकदम भय्यासाहेबाच्या अगावर पडली. तेव्हा रायबाने गाडी थाबविली. भय्यासाहेबानीं तिला हळूवारपणे सरळ बसविले. त्या वेळीं तिने त्याच्याकडे पाहिलें. त्याच्या हाताचा स्पर्श तिला आकर्षक वाटला. लगेच तिनें आपला पदर सावरला व ती रायबास म्हणाली,

" रस्ता पाहून गाडी चालवा ना तुम्ही, बाबा ! "

" चालवतुया, बाईसाब, " रायबा नम्रपणे म्हणाला. " पन पान्यानं रस्ता वाहून गेलाय, दगडधोंड बाहेर आल्याती, मी तरी काय करूं ! "

"पण बैलाला शक्ति आहे कुठं चालण्याची ? नुसतीं हाडं दिसताहेत त्यांचीं !" भय्यासाहेब सहज विनोदानें बोलले व हसले.

रायबाला या बोलण्यानें घुस्सा आला आणि तो खोंचून म्हणाला,

"मोटारबाईनं ही गत झाली त्येंची, साहेब ! तुमा सिरीमंतानीं बैलाच्या तोंडचा घास आगींत कोंबला बरं !"

"असं कसं म्हणता ?" विमल म्हणाली, "मोटारीन प्रवास जलद व सुखानं होतो. तुम्हीच पहा, ह्या गाडीनं मुंबई गाठावयाची म्हटलं, तर चागले महिना दोन महिने लागतील कीं !"

"तुमी म्हनता तेबी खरं. पन बैल मरतायतना उपाशीं आमच !" रायबा म्हणाला.

"पण आम्हीं काय केलं तुमच्या बैलाना ?" भय्यासाहेब म्हणाले, "तुम्ही दाणावैरण घालीत नसाल त्याना, आणि पैसे उडवीत असाल बाटलाबाईच्या नादानें !"

रायबाला या बोलण्याचा राग आला व तो तोंड मागे वळवून बोलला,

"आमच्या गावीं न्हाई बाटलाबाई अजून, साहेब. म्हमईत तिचा परताप लई ! सिरीमतानीं गुत्ता हतं आणला तर मातर पुरं मेलों आमी !"

"पाटील, रागावू नका आमच्यावर, आम्ही नावं ठेवीत नाहीं तुम्हाला. मोटारीनं तुमच्या बैलाची उपासमार केली म्हणता, ती कशी हें आम्हाला सागाल का ?" विमल मृदु स्वरात म्हणाली.

"त्या देव मानसाला संमदं ठावं है. तुमाला सागूनशान काय उपयोग ?" रायबा सरळपणानें बोलला.

विमलनें त्याच्या तोंडून अरविंदाची थोरवी ऐकली. तिला क्षणापूर्वी भय्यासाहेबामुळें झालेला आनंद निराळा होता, व अरविंदाची थोरवी ऐकून वाटलेलें समाधान अगदीं वेगळ्या प्रकारचें होतें.

"तुमच्या देवमाणसाला आम्ही विचारूच, पण तुम्ही सांगाल तें पटेल आम्हाला लवकर !" विमल म्हणाली.

" बाईसाब, असं बगा. हातन पांचसहा कोसांवर है आगीनगाडीचं ठेसन. ततं गाड्या नेत व्हत आमच गाडीवान. आन कुटबी गाडया जात व्हत्या आमच्या भाडयानं. तवां बैलाला पेंड सरकीबी घालीत व्हतों आमी म्हनून नांगरूटबी चांगली होई. आतां मोटारी आल्या ! गाडया गेल्या ! आन बैलबी मराया झाल ! म्हनूनशान म्या म्हटलं, सिरीमंतांनीं मोटार आनूनशान बैलांच्या तोंडचा घास मोटारीच्या आगींत कोंबला ! "

त्या वेळीं विमलचें लक्ष दुसरीकडे गेलें. तेथून नजीकच्या विहिरीवर श्रीपती व बच्चा यांची लट्ठालट्ठी चाललेली होती. श्रीपतीनें बच्चाची मान पकडली होती. इतक्यांत रायबाचें लक्ष तिकडे गेलें. तो गाडी सोडून तिकडे गेला. इतक्यांत मोटारीचें हॉर्नही जोरानें वाजूं लागलें. जेथपर्यंत मोटार येण्यासारखी होती, तेथपर्यंत अरविंदानें ती आणली होती. त्याला लांबून ही झुंज दिसल्याबरोबर तो मोटारींतून खालीं उतरला व श्रीपतीस हाका मारूं लागला; त्यामुळें श्रीपतीनें बच्चाला सोडलें, पण तो त्याला म्हणाला,

" आतां सोडतोंय तुला. पण पुन्हा जर का फाजीलपणा केलास, तर मानच मुरगाळीन तुझी ! "

" जा. जा. दावीन तुलाबी डाव. मागं सुटलास र माझ्या हातनं ! " बच्चा जळफळत बोलला.

त्याच वेळीं जिजा व चिमा तेथें येऊन पोहोंचल्या. बच्चाची बडबड ऐकून काय झालें हें समजून घेण्याकरितां चिमा त्याच्याकडे गेली.

श्रीपतीनें जिजाकडे पाहिलें. त्या वेळीं तिच्या मुखावर स्मित झळकलें. पण तिला त्याचें मुख तितकें आनंदी दिसलें नाहीं. तो तिच्याजवळ आला. थोडया वेळानें तिच्याकडे पाहात पाहात कायसेंसें हळूच पुटपुटला. त्या वेळीं तिनें आपल्या मानेला हिसका दिला व तीही जोरानें म्हणाली,

" तर ! तर ! अस कध्धीं कध्धीं मुळीं घडणारच नाहीं, श्रीपती ! "

## प्रकरण अठरावे.

# तूं ये माझ्या बरोबर.



ते श्रीपतीचे पुटपुटणे जिजाच्या मनाला लागले. त्यामुळें त्याच्याकडे पाहात काहीं वेळ ती तेथेच उभी होती. मोटारींतून ती मडळी गेल्यावर ती आपल्या घराकडे वळली व जड पावलानीं आपल्या आवारात शिरली.

घरात तिला आईची हालचाल नेहमीप्रमाणें दिसेना. ती एका कोपऱ्यात कण्हत कुथत पडली होती. तिचे वडील तिला विटकरीने शेकीत होते ते पाहून तिच्या अतःकरणात घस्स झाले. ती झटकन् धावत आई-जवळ गेली. त्या वेळी तिचे डोळे भरून आले व ती एकदम म्हणाली,

" आई, काय झाल ग तुला ? कुठ पडलीस की काय ? रात्रीं तूच ना मला गावात जा म्हणालीस ! कालचा दिवसच मोठा वाईट बर ! म्या वेडीन तुला सोडून जायला नको होत ! "

त्या वेळीं राधाबाईनीं डोळे उघडले. तिच्याकडे पाहाताच त्याना समाधान वाटले. आपला हात तिच्या तोंडावरून फिरवीत खोल स्वरात त्या म्हणाल्या,

" माजी गुनाची बाळ ! मला काई झाल नाई. उगाच काळजी करूं नगस. थोडा धक्का बसला कमरेला. शेकत्याती हे ! देवा, मी सेवाचाकरी करायची याची, पन त्यानाच पाहाटपासन तरास दिलाया मीं ! "

त्याना जास्त बोलवेना. त्यानीं आपल्या पतीकडे पाहिले. शेकताना त्याचा हात थरथर कापत होता. त्याच्या पोटात कालवाकालव होत होती. 'आपण थकलों, आपली पत्नीही थकून गेली, आता आपल्या जिजाचं कसं होईल.' ह्याची चिंता त्याच्या मस्तकात घोळत होती. त्यामुळें

त्याचें चित्त अस्वस्थ झाले. शेकण्याकरता हातात घेतलेल्या वरील त्यांचें लक्ष उडालें, व ती एके ठिकाणीं जास्त वेळ राहिली, त्यामुळ राधाबाईना चटका बसला.

" आई, आईग. " असे त्या जोराने विव्हळल्या.

जिजानें चटकन् ती विटकर हातीं घेतली, व लाडिकवाण्या स्वरात म्हणाली, " बाबा, मी शेकते आता. तुम्हाला पहाटेपासून फार त्रास झाला. मावशीच्या घरीं मला स्वप्न पडलं त्याचाच हा अनुभव आला. "

" कश्शाची काळजी करायला नग," सखाराम म्हणाला, " जे व्हायच ते टळतंय थोडच ! पन भल्या पहाटच सपन पुडं काय व्हनार त्ये सागत म्हनत्याती. "

" बाबा, तस काहीं वाटूं देऊं नका. कसल्या जुन्या समजुती तुमच्या ? स्वप्नान कसलं पुढच समजणार ? "

जिजा लडिवाळपणानें वडिलाच्या गळ्यात हात टाकून बोलली. सखारामाने तिच्या तोंडावरून हात फिरविला. तिच्या बोलण्याचे त्याला कौतुक वाटलें. तो बोलू लागणार इतक्यात तीच म्हणाली,

" बाबा, पण आईला काय झालं रात्रीं ? ती कुठं पडली बिडली कीं काय ? मला सागा आधीं."

"त्याच असं झालं. रार्ती इज कडाडली. तवा शिरप्याचा खोंड बावरला. त्येनं दावं तोडल अन् धुमाकूळ माडला. तशा रार्ती काटी टेकीत गेलों त्येला बादायाला. मागन हिनं दिवा आनला, पन तोबी इजला त्या काळोकात ! खोंडानं धक्का दिला हिला, तवा ती राजनावर आदळली, आन काय सागायचं बाळ, मरायचीच ही त्या येळीं ! " सखाराम म्हणाला.

" पोरीला काय वो सांगताया अस्सं ! होईन बरी मी. शिरप्याला म्हनावं, तुजा खोंड इकून टाक आता. पन जिजे, तुला सपन तरी काय पडलं ? " राधाबाई आतुरतेने तिच्याकडे पाहूं लागल्या.

" आई, तूं घाबरणार नाहींस ना माझं स्वप्न ऐकून ? आधींच तूं

उगीच कांहीं तरी काळजी करीत बसशील. मला सागावंसं वाटत .ा, बाई ! " जिजा म्हणाली.

" साग बाळ, कोनी भीत नाई, आन देवावर इश्वास ठेवला म्हंजे काइबी होत नाई. " राधाबाई म्हणाल्या.

" तुझा आग्रहच फार म्हणून सागतें मी आता, " जिजा सागूं लागली, " मी पहाटेला आलें मावशीकडे. मला झोंप आवरेना म्हणून आडवी झालें; तेव्हा काय झाल बघा, माझ्या स्वप्नात एक भली मोठी काळी कुळकुळीत नागीण फुस्फुस् करीत धावत आली; श्रीपतीच्या पायाला घातल वेटोळं तिनं, अन् ती त्याला आता डसणार, इतक्यात घाबरून मी मोठ्यानं ओरडलें, तेव्हा ती सपाट्यानं माझ्याकडे धावली. मलाही तिनं विळखा घातला तेव्हा मी किंचाळलें. "

तिचें शेवटचे वाक्य संपतें न सपतें तोंच चिमा व बच्चा हीं तेथे आलीं. त्या वेळीं चिमा सारखी तणतणत होती. ती म्हणाली, " शिरप्या माज-लाय किती ! मेल्याची मस्ती कशाच्या जिवावर चालली कुनाला ठावं ! चार बोटं जिमिनीची धादोटी नाई त्याला, पन दिमाक केवडा आणलाय ! त्याला वाटतं रादेचं श्यात म्हजे आपलंच ! बचा गेला सहज तकडं. आन् जरा चेस्टा केली त्यानं त्येची ! धरली मानगुटी कीं, रादे, त्येन बचाची ! "

चिमाची वटवट पुढें चालणार होती, परतु मध्येच बचा ऐटीनें म्हणाला,

" आक्का, लोळविला असता त्याला ततंच ! पन बाबा आलं म्हनून-शानी मानगुटी सोडली मीं त्येची ! आता बग म्हनाव, तुजा माजा उबा दावाच ! कवा मुंडी मुरगळीन पत्ताबी लागायचा नाई. "

तशाही स्थितींत बचाच्या बोलण्याचे जिजाला हसूं आलें. राधाबाईना जास्त बोलवत नव्हतें तरी त्या चिमाला म्हणाल्या,

" चिमा, झालं तरी काय असं, शिरप्यानं दाडगावा कराया ! कुटल्या

कलागती करील याचा नेम नाहीं बाई त्येचा ! ”

“ व्हायचं काय रादे. जिजी आली ना आता हाकडं. पोरीला नव लुगडं सोबतंय बग कित्ती. तवा मीं म्हटलं, नवी नवरी सोबंति माजी जिजा ! ” चिमा म्हणाली.

त्या वेळीं चिमाचा स्वर मृदु झाला. ती आणखी पुढें बोलणार होती, पण इतक्यात सखाराम जिजाकडे पाहून मध्येच म्हणाला,

“ खरच, तू म्हनत्येस तें बराबर है, चिमा. जिजा नव्या नवरीसारकी सोबते खरी, पन शिरप्याला वर्दळीवर यायचं कारन काय, हें सागत नाहींस अजून ! ”

“ कारन कसल लागतय त्येला! बच्चा त्येला म्हनाला, ‘जिजीचं लगीन ठरलंय, शिरप्या. आन अक्कानं तें ठरवलंय’. एवडं म्हनताच तो गुरगुरूं लागला. काय पन मगरुरी त्येची ! ” चिमा म्हणाली.

श्रीपती आपल्याजवळ जे बोलला, त्याचें कारण त्या वेळीं जिजाच्या लक्षात आलें. ती मनात म्हणूं लागली, “ तुझ लग्न बच्चाशीं ठरलय, कशाला आमच्याकडे बघशील आता ! ’ ह्या श्रीपतीच्या उद्गारांत मग अर्थ होता तर ! चिमामावशीनें बच्चाला तसें सांगितलें असेल, म्हणून तो तसें म्हणालाही असेल. आपल्याला नवी साडीचोळी नेसवण्यांत मावशीचा अंतस्थ हेतु हाच असावा. पण तिला काय ठाऊक कीं, श्रीपतीच्या केसाचीही सर बच्चाला नाहीं ! श्रीपतीच्या मनाचा मोठेपणा, त्याची निघडी छाती, विद्या संपादण्याची हौस. आणखी, आणखी काय ! त्याला पाहताच मनावर जो परिणाम होतो, त्यामुळेंही त्यानं माझं मन चोरलेलं आहे. चिमामावशीला अद्याप वाटत असेल, कीं मी शेंबडी पोर आहें आपण नाचवूं तशी नाचेल. ”

तिचे असे आत्मगत विचार चालू होते, त्या वेळीं चिमा बोलतच होती. तिचे शब्द तिच्या कानावर पडत असले, तरी तिचे मन दुसऱ्याच विचारात गुंतल्यामुळे त्याचा बोध तिला होत नव्हता. परंतु राधाबाईचें

बोलणें सुरू झाल्याबरोबर मात्र तिचें लक्ष तिकडे गेलें.

" चिमे, अशी तनतनूं नको बाई ! बस आता ! किती येळ उबी राह्रानार ! सिरप्याचा दाडगावा मला ठावा है. तो त्येच्या खोंडासारका है ! अग, रातीं त्या खोंडानं माझ कबरडच मोडलं बग ! तसा सिरप्या कुनाच काय करील त्येचा नेम नाई मला वाटत ! म्हणून मी इच्यार करत्यें कीं जिजा त्येला दिली तर तो तिला कस वागवील ? " राधाबाई म्हणाल्या.

राधाबाईचे हे शब्द कानीं पडताच चिमा तिच्याजवळ गेली. ती तिची विचारपूस करू लागली. राधाबाईविषयींच्या तिच्या प्रेमाला त्या वेळीं भरते आलें. तिनें मोठ्या कळवळ्याने म्हटले,

" रादा, काय ग तुझी गत झाली ही ! अशा येळीं सेवाचाकरी करनारा जावई लाबला तर चागल बाई ! मस्तवानाला माजी जिजीसारकी पोर द्या, असं मी कंदी सागनार नाई. "

" सिरप्या तसा माजुरी नाई, चिमा. दुसऱ्याच्या जिवाला जीव देनारा है तो. इला त्येच्या खोंडान आदळल म्हणून राग आलाय त्येचा आज. पन मागं हीच म्हनत व्हती, की सिरप्यासारका जावाई मिळायचा नाई. त्येची जिमिनबी आमच्या मळयाला लागून है. दोनी जिमिनी एक झाल्या म्हजे सुकान पोट भरतील दोगं नवराबायकु ! " सखाराम म्हणाला.

सखारामबाबाचे हें चाललेले बोलणें चिमाच्या विचाराला पोषक नव्हते म्हणून ती म्हणाली,

" पन करजाचा डोंगुर हायना जिमिनीवर त्येच्या ? माज्या बच्चाला पैचबी करज नाई, आन त्येची जिमिनबी लई है. माजी मी जिती असता जिजाचा घोर कशाला होवा तुमास्नी ! "

चिमाने आपला हेतु अशा रीतीने विशद केला. त्यावर कोणी काहीं बोलेना, तेव्हा तीच पुढें म्हणाली,

" आन जिमिनीचं काय एवडं घेऊन बसला तुमी ? चार पैसं असलं, म्हंजे शिरप्याची जिमिन बच्चालाबी मिळायची नाई का रादे ? "

आता काहीं तरी बोललेच पाहिजे, असें वाटून सखारामबाबा म्हणाले, " जस राम करील तसं होईल, चिमा ! येळ लई जाला. जिजे, उट. आता कामाला लाग बरं ! "

ती उठली. पण तिचे मन आता फार अस्वस्थ झाले. ती मनात म्हणू लागली, ' मावशीनें आपल्याभोवतीं पाश टाकण्यास सुरुवात केली आहे. रात्रीच्या स्वप्नांतील नागीण म्हणजे हीच. ही आपल्या व श्रीपतीच्या पाठीस लागणार. श्रीपतीच्या शेतावर हिचा डोळा दिसतो. हिच्याजवळच्या पशाच्या जोरावर ही श्रीपतीची जमीन गट्ट करावयास चुकणार नाहीं. श्रीपतीच्या कानावर ह्या गोष्टी आपल्याला घातल्या पाहिजेत. '

दुपारचा स्वयंपाक चिमाने केला. बच्चा तेथेंच जेवावयास होता. ती जिजाला आग्रहाने वाढीत होती. पण तिचे जेवणावर लक्ष होते कोठे ? श्रीपती अद्याप आला नव्हता. त्याचे जेवण अलीकडे रामगुफेकडे होई. ह्यामुळें तो दुपारीं घरीं लवकर येत नसे. त्याच्या वाटेकडे तिचे डोळे लागून राहिले होते.

तिसरा प्रहर झाला तरी तो आला नाहीं. त्या वेळीं चिमा व बच्चा हीं विहिरीकडे गेलीं होतीं. जिजा आईबापाच्या सेवेत गुतली होती. थोड्या वेळाने गोठ्यातील जनावराची हालचाल दिसूं लागली. खोंड डरकाळी फोडूं लागला. त्यावरून श्रीपती आला असावा, असे तिला वाटलें व ती बाहेर आली.

श्रीपतीने तिला पाहिले, पण त्याने तोंडातून चकार शब्द काढला नाहीं. त्याचेंही मन सकाळपासून उदास होतें. बच्चाचा लघळपणा जिजा-बरोबर चालल्याचें त्याने कित्येक वेळा पाहिले होते. त्यामुळे तिच्यावर तो पुष्कळ वेळा रागावलाही होता. कित्येक वेळा भलत्याच संशयपिशाच्च्याने तो बेफामही झाला होता. तथापि जिजाला आपण आवडतो व तिचे लग्नही आपल्याशीं ठरल्यासारखें आहे, ह्यात त्याला तिळमात्र संशय वाटत नव्हता. पण आज जेव्हा बच्चा आपणहून आपल्याशीं तिचे लग्न ठरल्याचें

बोलला, तेव्हा त्याचा राग भडकला. मोटारीकडे जाताना जिजाला पाहून त्याचा राग कमी झालेला असला, तथापि आज बच्चा सखारामबाबाकडे जेवावयास होता त्यामुळें तो जास्तच खट्टू झाला. म्हणून तो जिजाबरोबर प्रथम बोलला नाहीं.

रामगुंफेंतून येऊन खिन्न मनाने तो सखारामाच्या घराच्या मागील बाजूच्या आम्रवृक्षाखालीं घोंगडीवर पडला होता. त्याला काय करावे हे सुचत नव्हते. त्या वेळीं जिजा तेथें गेली, तरी त्याने तिच्याकडे लक्ष दिलें नाहीं. तिलाच राहवेना म्हणून ती म्हणाली,

"आज पाटील कसल्या विचारात आहेत! मघापासून मी पाहते, बोलण्याच राहूं द्या पण नुसत पाहणं देखील होत नाहीं."

श्रीपतीनें तिच्याकडे नजर फिरविली. तो उठून बसला व खिन्न स्वरात म्हणाला,

"जिजे, माझ्याशीं कशाला बोलतेस! आता मी परका होणार. चिमान लगीन ठरविलंयना तुझ!"

"कोण माझं लग्न ठरवितयं! सकाळपासून उगीच संशय घेऊन काय बसलास श्रीपती! चिमाचा काय संबंध माझ्या लग्नाशीं! बाबा तुला कांहीं बोलले का!" जिजा कळवळ्याने बोलली.

"मग बच्चा काय सागत होता सकाळीं!" श्रीपतीनें आधीरपणे विचारले.

"बच्चा सागणार आणि तू ऐकणार! वा!" जिजाने हसत म्हटले.

"मग सकाळचं त्याच बोलण सारं खोटंच म्हणायचं!" श्रीपतीने आतुरतेने विचारले.

"यात काय संशय! तुझ्या अशा संशयी वृत्तीने मला पुष्कळ त्रास होतो आहे श्रीपती. बाबा अगदीं थकलेत, आई अथरुणाला खिळली आहे, आणि तू जर असा वागूं लागलास तर कोणाच्या आधारावर मी दिवस काढूं! साग, श्रीपती तूंच साग..." ती स्फुदू लागली.

त्या वेळचा तिचा प्रत्येक शब्द त्याच्या अंतःकरणात जाऊन पोहोंचला.

त्याच्या मनातील संशय नाहींसा झाला. त्याची स्निग्ध दृष्टि तिजवर खिळून राहिली. उभयताच्या मनात आनंदलहरी उसळू लागल्या. त्या वेळीं आम्र-वृक्षावरील कोकीलही मधुर आलाप काढूं लागले. मंदमंद वायुलहरींनीं लतावृक्ष बोलूं लागले.

कांहीं वेळ स्तब्धतेंत गेला. उभयताच्या मुखावरील खिन्नता नाहींशी झाली व त्याच्या मुखावर स्मित झळकूं लागले. श्रीपतीनें त्या प्रशांत वातावरणाचा भंग केला व म्हटलें,

" जिजे, शिरप्याचं आणि तुझं शरीर वेगळं असलं तरी प्राण दोघा-चेही एक आहेत. उगीच काळजी करूं नकोस. शिरप्या जिवंत आहे तों पर्यंत तो काळालाही दाद देणार नाहीं ! "

श्रीपतीच्या ह्या बोलण्याने जिजाला अत्यानंद झाला व तिनें म्हटलें,

" आता मी कसलीच काळजी करीत नाही; पण हें बघ, श्रीपती, तुला आता लिहावाचायला येतंय, तर तूं शेटजींना लिहून दिलेला जमिनीचा कागद कसला आहे तें बघ तरी एकदा !"

" दादानीं वाचलाय तो कागद. मीही पण शेटजींना दाखवा म्हणतों माझा कागद. पण तूं ये बरोबर माझ्या ! माझं अक्षर चुकलं तर ते लावशील तूं ! "

जिजाला मनातल्या मनात हसूं आलें व तिनें म्हटले,

" दादानीं आणलेलीं पुस्तकें वाच म्हणजे येईल सगळं वाचायला. तुझ्याबरोबर मी आले तर शेटजी काय म्हणेल मला ! "

" आता अक्षताच पडायच्या राहिल्यात ना तेवढ्या ! मग काय म्हणतो तो शेटजी ! "

पण त्याच वेळीं आईची हाक तिला ऐकूं आली, त्यामुळे ती ताबड-तोब निघाली. श्रीपतीनें तिचा हात पकडला पण, ' अंहं ! अहं ! ' असें म्हणत युक्तीनें हात सोडवून तिने घर गाठलें.

---

## प्रकरण एकोणिसावें.

# कड्यावरून तोल गेला तर — ?



अरविंद कोणत्याना कोणत्या तरी जनसेवेत नेहमीं गुंतलेला असे. खेड्यापाड्यांतील गोरगरीब आजारी माणसे त्याच्याकडे धाव घेत; त्याना तो औषधोपचार करी. दिवसा गुराख्यात मिसळून तो ज्ञानदानाचें कार्य करी. रात्रीं प्रौढाना शिक्षण देई. त्या लोकात उत्पन्न झालेली शिक्षणाची गोडी कायम ठेवण्याकरिता मधून मधून तो भजन करवी, किंवा पाटलाच्या स्फूर्तिदायक पोवाड्याच्या धर्तीवर लहान लहान पोवाडे रचून श्रीपती व त्याचे सवंगडी याच्याकडून ते म्हणवून घेई. त्यानतर थोडा वेळ प्रौढ लोकाना लिहिण्यावाचण्यास शिकवी. मोठ्या अक्षराची पुस्तकें मोफत मिळाल्यामुळें ती वाचण्याचा त्याना नाद लागला. नवीन साहित्य आणविल्यानतरची सुमारे एका महिन्यातील ही शिक्षणाची प्रगति पाहून त्यालाही उत्साह वाटू लागला.

मधुकरानें जाहीर केल्याप्रमाणें बक्षिसाच्या दिवसाची ते मार्गप्रतीक्षा करू लागले. अरविंदाच्या कार्यक्रमात व्यत्यय येऊं नये असा पावसाचाही मानस होता कीं काय न कळे; कारण जून महिना संपत आला तरी खरा पर्जन्यकाळ अद्यापि सुरू झाला नव्हता.

त्या महिन्यात रामसीतेच्या डोंगरावरील हवा फार सुदर होती. झुळझुळ वाहणारा वारा सुख देत होता. करवंद, जाभूळ, आबे इत्यादि वन्य फळे तोंडाना रुचि आणीत होतीं. काळ्या पाषाणातून स्रवणाऱ्या निर्झरातील गोड उदक तृषा शात करीत होतें. नानाविध वनस्पतींच्या सुदर सुंदर आभरणानीं नटलेली वसुंधरा नेत्राना मोह पाडीत होती. कोकिला

व शुकसारिका याच्या गानानें तर स्वर्गीय गान ऐकत असल्याचा तेथें भास होत होता. म्हणून भय्यासाहेब व विमल याना ते ठिकाण फारच आवडलें होतें.

निकडीच्या कामामुळे मधुकर मुंबईस निघून गेला होता. अरविंद व विमल ह्याच्या मनातील सशय उत्पन्न करण्यास तोच कारण असल्यामुळें त्याचे निरसन करण्याचे धैर्य त्याला त्या वेळेपर्यंत झाले नव्हते. शेत-कऱ्याची सघटना करण्याच्या निमित्ताने भय्यासाहेब तेथेच तळ देऊन राहिले.

अरविंद नेहमींच कामात गुतलेला असल्यामुळे साहजिकच विमलला करमणूक काय ती भय्यासाहेबाची. टेकडीवर सहल करण्याकरिता जा, किंवा रानवेलींचीं फुले जमा करण्याकरिता फिरा, ह्या दोघाची जोडी हास्यविनोदात मग्न असावयाची.

अरविंदावरील प्रेमामुळे विमल त्या ठिकाणीं आली होती. तेथे येता-क्षणींच तिला जे दृश्य दिसले, त्यामुळे तिच्या प्रेमास जोराचा धक्का बसला. त्यानंतर सशयनिवृत्ति होऊन प्रेमाचा उज्ज्वल प्रवाह पूर्वीच्याच मार्गाने वाहूं लागण्याची अद्यापि संधिच आली नव्हती. त्यामुळें तो ओघ आपोआपच निराळ्या मार्गाकडे वळू लागला तर त्यात विशेष आश्चर्य नाहीं.

एके दिवशीं सकाळीं रामसीतेच्या उंच टेकडीवर सहलीकरिता भय्या-साहेब व विमल ही नेहमींप्रमाणें निघालीं. सरळ मार्गाने चढण्याऐवजीं सापडेल त्या मार्गाने तीं चाललीं होतीं. वाटेंतील रानवेलींचीं रंगीबेरंगी फुलें विमल तोडीत होती. भय्यासाहेब नेहमीं कसली तरी वनस्पति शोधीत हिंडत असत. पण आज त्यानाही फुले जमविण्याची लहर लागली. फुलें जमा करीत करीत तीं गुंफण्याचें कार्यही त्यानीं हातानें चालविलें होते. योग्य रंगाचीं फुलें शोधण्याकरिता त्याची आज विशेष धडपड चालू होती. इतकेही असून त्यानीं टेकडीचा माथा अगोदर गाठला.

विमल रेंगाळत रेंगाळत सभोवतालच्या देखाव्यावर नजर टाकीत

टाकीत चालली होती. सहलीस गेली असता ती नेहमींच सापडतील त्या फुलाचे गुच्छ तयार करून नेत असे. नेहमींप्रमाणें आज तिनें फुलाचे सुंदरसे गुच्छ तयार करून आपल्या ओंच्यात ठेवून दिले होते. थोडया वेळानें तीही भय्यासाहेब होते त्या ठिकाणीं येऊन पोहोंचली.

त्या टेकडीवरून सभोंवतालचा देखावा मोठा रम्य दिसत होता. जंगलातील गगनचुंबी वृक्ष डोलत होते. मोहना नदी कडयावरून खालीं उडी मारीत असता तिचें शुभ्र फेनरूपी पातळ आसमतात फडकत होतें. करवंदीच्या जाळ्यातील करवंदाचे घोस सूर्यकिरणामुळे आलेल्या तकाकीनें नीलमण्याचे घोसच आहेत असे वाटत होतें.

त्या देखाव्यात मन रमून गेल्यामुळें भय्यासाहेब थोडा वेळ स्तब्ध होते.

विमलनें त्या स्तब्धतेचा भग करून म्हटले,

" कसला विचार करीत आहात, भय्यासाहेब ? सभोवतालच्या उच उंच टेकडया व खोल दऱ्या याचा तुम्हाला अचंबा वाटत आहे कीं, गगनभेदी वृक्ष व अवनितलाला चिकटून बसलेल्या ह्या मोहक जाळ्या तुमच्या मनाला भुरळ पाडीत आहेत ? "

" ह्या वनराजीमुळें व दऱ्याखोऱ्यामुळेच हा भाग अनुपम सौंदर्यानें नटलेला आहे. " भय्यासाहेब तिच्याकडे दृष्टिक्षेप करीत म्हणाले, " ह्याची भुरळ कोणास पडणार नाहीं बरं ! "

" पण हे सौंदर्य विषमतेमुळ उत्पन्न झालेल आहे, भय्यासाहेब ! सर्वच्या सर्व भूभाग सपाट असता व सर्वचवृक्ष एकसारखे असते तर अस सौंदर्य प्रतीत होतं का व तुम्हाला अशी भुरळ पडली असती का ! "

तिच्या बोलण्यातील मर्म त्याच्या लक्षात आलें, व ते तिच्याकडे पाहू लागले. त्या वेळीं तिच्या मुखावरील झळकणाऱ्या स्मिताने त्याच्या उत्साहाला भरती आली व ते म्हणाले,

" का नाहीं भुरळ पडणार ! सपाट प्रदेशातील मंद मंद वायुलहरींनीं डोलणारीं भाताचीं रोपटी पाहून असाच नाहीं का आनंद होणार ! सौंदर्य

विषमतेतच दिसून येतं व समतेत दिसून येत नाहीं अस थोडच आहे ?"

भय्यासाहेबाच्या ह्या उत्तरानें विमल थोडी बुचकळ्यात पडली. त्यावेळीं समोरच दिसत असलेला नदीचा प्रवाह पाहून तिला एक कल्पना चटकन् सुचली. त्या योगानें त्याच्या मतप्रणालीवर आपणास मात करता येईल असे तिला वाटलें. तिच्या मुखावरील नवविचाराच्या कल्पनेचें विलसणारे तेज पाहून भय्यासाहेबाना ती जास्तच सुदर दिसूं लागली व ते म्हणाले,

"आमच्यावर आता कसला हल्ला चढविणार आहात आपण ! त्या-पूर्वी मी स्वतःचा पराभवच कबूल केला म्हणजे तर झाल ना ? आपल्या-बरोबरच्या विवादात जयापेक्षा पराभवच मला जास्त आवडतो, कारण काय म्हणाल तऽऽर, सागूच का ? सागितल तर आपल्याला आवडेल का ? "

भय्यासाहेब थाबले व अधीरतेने विमलकडे पाहूं लागलें त्यामुळे तिची उत्सुकता जास्त वाढली व ती मस्तक हलवून हसत हसत म्हणाली,

"मग असे आढेवेढे किती घेणार तुम्ही ? मोहना नदीच्या प्रवाहाला देखील इतकी वळणं नसतील, बाई."

त्या वेळी भय्यासाहेबाचे लक्ष त्या नदीकडे गेलें. मनातील हेतु उघड करून सागण्याचे त्याना अद्यापि धैर्य होत नव्हते. ते खडा टाकून पाण्याचा अंत पाहात होते. ते म्हणाले,

"हो, खरंच ! ही नदी वळणावळणानी जाते, पण तिला पुढें घात-लेल्या बधाऱ्यात ती स्थिर होते, नाहीं ?"

"मी तरी तेच म्हणणार होतें," विमल म्हणाली. "पण तिला बंधारा केव्हा घातला ? अनेक लहान लहान ओघ मिळून ती संपन्न झाली तेव्हा ना ? ती सपन्नता एका ठिकाणीं बंधाऱ्यात साचली म्हणूनच तिचा उप-योग अधिकात अधिक करता आला ना ? अर्थात्, ती अनेक ओघ मिळून संपन्न झाली नसती तर दूरदूरच्या निर्जल प्रदेशात कसं बर चैतन्य खेळलं असतं ? पण तुमच्यासारख्याना आजूबाजनं जलाचे ओघ येऊन एक मोठा प्रवाह होणं नको आहे मुळीं. मग सपन्न तलाव नकोच नको. पहा,

तुम्हाला माझं म्हणण पटतं का ते ! ''

भाडवलवाल्याची ही तरफदारी ऐकून भय्यासाहेबाना तिचे कौतुक वाटले. त्या वेळीं आपला कोटिक्रम बिनतोड आहे, असें वाटून ती जास्त खुलली. तिच्या युक्तिवादामुळे तर तिच्याकडे त्याचे मन जास्तच ओढ घेऊं लागले.

आपल्या मनातील भाव उघड करण्याची ते संधि पाहातच होते ! आताची संधि ठीक आहे हे जाणून ते तिच्याकडे पाहून हसून म्हणाले,

"झाला आमचा पराभव, मग तर झालना ? सपन्नतेची आवश्यकता, ही मोहनाच पटवीत आहे म्हणावयाची ! अर्थात्, तिच्या प्रेमाचा ओघ जवळच्या प्रेमाच्या ओघात येऊन मिळाला म्हणजे ती खरी सपन्न होणार नाहीं का ! ''

आपल्या ह्या बोलण्याचा परिणाम काय होतो हें पाहण्याकरिता ते तिच्याकडे आतुरतेने पाहू लागले. ह्या शब्दामुळे तिने एकदम आश्चर्य वाटल्यासारखे दाखविले, व दुसरीकडेच मान वळविली. ही संधि साधून भय्यासाहेबानीं आपल्या हातानीं गुफलेली फुले हळूच तिच्या वेणींत बसविलीं. त्या वेळीं तिने त्याना प्रतिकार केला नाहीं.

थोड्या वेळाने भानावर आल्यासारखे करून तिने एक हात वेणीला लावला, ती चापून चोपून बसविली व नेसलेली साडी झाडीत झाडीत एकदम उठून म्हटले,

"काय बाई, मुंग्याचा त्रास हा ! बसूं देखील देत नाहींत ! ''

तिनें भय्यासाहेबाकडे स्मितपूर्वक नजर टाकली. आपल्या ओच्यात हात घातला व त्यातील एक सुमनगुच्छ त्याच्या हानात ती देऊं लागली. त्या वेळीं तिच्या हातास किंचित्सा कंप सुटला ! तिचे सर्वांग थरारले ! त्या वेळी तिनें म्हटले, "नाहीं बाई, इथं गारवाच भारी ! ''

पुढें ती काहीं बोलणार होती, परतु तिच्या मुखातून शब्द निघेनात; तिनें तो गुच्छ त्याच्या हातीं दिला व आपलें तोंड फिरविले. त्याच वेळीं आकाशात दिनराजावर नेमका एक काळा मेघ आला होता. दिनराजाला

हा तिचा प्रेमाचा खेळ पाहावयाचा नव्हता की काय नकळे !

भय्यासाहेबांनीं तो सुमनगुच्छ प्रमुदित मनाने आपल्या हातीं घेतला. पण काय असेल ते असो, त्याच्या हातून तो निसटून त्यानें वसुंधरेवर लोळण घेतले खरे !

× × ×

त्या दिवशीच्याच संध्याकाळची वेळ. रामगुफेपुढील पटागणात श्रीपती, अरविंद व जिजा ही बसलीं होतीं. श्रीपतीच्या मनातील संशयधुक्याचा निरास जिजाच्या उज्ज्वल प्रेम किरणांनीं झाला होता, ती गोष्ट आनंदाने अरविंदाला सागण्याकरिता ही जोडी त्या वेळी तेथे आली होती. त्यांनीं मोकळेपणाने आपले रहस्य अरविंदाच्या कानावर घातल्यानंतर अरविंद जिजाला म्हणाला,

" पण तुझ्या मावशीला फार वाईट वाटेल, व ती नसतीं कुलंगडीं देखील उत्पन्न करील, जिजा ! "

" दादा, मावशी काहीं वाईट नाही तशी ! पण तिची आपली वेडी समजूत, कीं पैशान काहीही साधेल. तिच्या गाठीला पैसा खुळखुळतो आहे ना ! "

जिजाने हात चाळवीत म्हटले. त्यावर अरविंद विनोदाने म्हणाला,

" मावशीच्या मनाप्रमाणे वागलीस, म्हणजे तिचा खुळखुळणारा पैसा तुझाच नाही का, जिजा ? "

अरविंदाच्या बोलण्यातील मर्म ओळखून जिजा हसूं लागली. पण श्रीपतीला ते चागलें समजले नाहीं, म्हणून त्याने उतावीळपणानें म्हटलें,

" दादा, पैशानं कुणाच दिल मिळत असतं वाटतं ? आंब्याच्या झाडाखालीं ठरलय ना आपल, जिजे ? दादाना कशाला इचारतीस आता ? "

" पण तुझी जमीन गेली तर बाबाना आपला मानस आवडेल का ?" जिजा म्हणाली, " आई काय म्हणेल मग ? "

" जमीन गेली तर माझं बावटं आहेत ना खबीर ? तूं जमिनीशीं

लगीन लावणार, कीं माझ्याशीं ? अगोदर सांग. " श्रीपती जोरानें म्हणाला.

श्रीपतीच्या आवेशाने अरविंदास कौतुक वाटलें व तो जिजाला म्हणाला,

" बघ जिजा, श्रीपती काय म्हणतो ते !"

" मला कळतय सगळं, दादा; पण बाबाचा जीव सारा जमिनीवर, तसाच श्रीपतीचाही ! शेटजींचा कागद तरी पाहा एकदा श्रीपतीला बरोबर घेऊन तुम्ही, दादा ! " जिजाने सुचविले.

अरविंदाच्या लक्षात सर्व परिस्थिति आली. श्रीपतीचा कागद खरेदीचा होता हे त्यानें शेटजींच्या घरीं पाहिलें होते. त्यामुळे चिमाचा पैसा शेटजींच्या पदरात जाऊन तिला ती जमीन मिळण्यास कायदेशीर हरकत नव्हती. पण गावच्या अशा कटकटींत पडल्यास आपल्या समाजसेवेच्या कार्यांत व्यत्यय येऊन ग्रामकटकाचें फावेल, त्यामुळे कदाचित् आपले चंबूगबाळे येथून हलवावे लागेल, हे त्याच्या लक्षात आले. आपल्याला आर्थिक सामर्थ्य आहे, तेव्हा ह्या आपल्या मानीव भगिनीला केव्हाही मदत करता येईल, असा विचार करुन त्याच्या समाधानाकरिता त्याने म्हटले,

" बरें जिजा, तूं कशाची काळजी करूं नकोस. मी पाहीन तो कागद."

अरविंद हें बोलत आहे इतक्यात विमल तेथे आली. दिवसभर आपल्या सकाळच्या वर्तनाचा विचार तिच्या मनात घोळत होता. ती मनात म्हणे, 'आपली सकाळची मनाची चलबिचल योग्य होती का ? अरविंदावर आपलें खरेखुरे प्रेम नव्हते का ? त्याच्यात त्यागी वृत्ति आहे, तसली वृत्ति आपणात नाहीं. संपन्न स्थितींत असता माणसाने त्याच्यासारखे देहकष्ट तरी का सोसावे ? गोरगरिबाविषयीं कळवळा असूं नये असें नव्हे, पण त्याकरिता आपल्या सर्व सुखाचा होम करावा हा कुठला न्याय ? पण सुख सुख तरी कशाला म्हणावयाचें ? अशा स्थितींत राहून अरविंदाच्या मनाला समाधान वाटतें, तेंच त्याचें सुख नव्हे का ? आपणास तसें सुख का वाटू नये ?'

" भय्यासाहेबाना गोरगरिबाविषयीं कळकळ नाहीं असें नाहीं, पण ते

सर्वस्वावर पाणी सोडण्यास तयार नाहींत, आणि त्यानीं काय म्हणून सोडावे ? त्याची मते नवीं असतील, शेतकरी–कामकरी ह्याची संघटना त्याना पाहिजे असेल, भाडवलवाल्याशी त्याचा विरोध असेल, पण स्वतःच्या ऐहिक सुखात उणेपणा पडूं न देता त्याना हें साधावयाचे आहे, निदान तशी त्याची वृत्ति दिसते खरी. ह्या वृत्तीच्या गृहस्थाकडे आपल्या मनाची ओढ का जावी ? बोलणें एक व कृति दुसरीच असा त्याच्या वर्तनांत भास होतो, पण तो भास खरा कीं खोटा ? ह्याला कोणती कसोटी लावावयाची ? त्यानी आजचे ऐश्वर्य का सोडावे ? लोकाना नाहक छळून सपत्तींत भर घालू नये अशी वागणूक ठेविली म्हणजे त्याच्या वर्तनात सुसगतपणा नाहीं का दिसणार ? ते जहागिरदार आहेत, तेव्हा त्यानीं आपल्या जहागिरीवर काय म्हणून पाणी सोडावे ? आपल्या आश्रयाखालील लोकाना समतेने वागविले म्हणजे त्याच्या मताप्रमाणे त्याची कृति नाहीं का होणार ? ”

पण आपली ही विचारसरणी तर्कशुद्ध आहे कीं नाहीं ह्याची तिची तिलाच शका येत होती. “ आपण सुखात आयुष्य घालवावे, आपल्या गरजा यत्किंचित्‌ही कमी होऊ देऊ नयेत, अर्थात् ज्या शेतकरी-कामकरी याच्यामध्यें ते कार्य करू इच्छितात त्याच्यात आणि याच्यात जमीनअस्मानाचे अतर राहणार नाही का ? मग ‘तुम्हीदेखील भाडवलवालेच आहात,’ असे ते लोक याना म्हणणार नाहींत का ? असे जर ते म्हणूं लागले तर ह्यानीं आपल्या मताचा त्याग केला पाहिजे किंवा धनाचा तरी केला पाहिजे. ”

“ ह्यापेक्षा अरविंदाची विचारसरणी, त्याची त्यागी वृत्ति ही सरस नव्हे का ? जन्मभर कष्टात दिवस काढणे जिवावर येते ! पण आयुष्याचा सदुपयोग करावयाचा म्हटले, तर अरविंदाचें वर्तन योग्य ठरत नाहीं का!” असलेच विचार चालू असता ती तेथे आली. त्या वेळीं अरविंदाचा चेहरा गंभीर होता.

त्याच वेळीं जिजाला तेथे आनंदी पाहून विमलसारख्या सुविद्य तरुणीच्या

मनातही मत्सराची छटा उमटल्याशिवाय राहिली नाहीं. अरविंदाच्या शुद्ध चारित्र्यात तिला दोष दिसू लागला. पण सकाळच्या आपल्या स्वतःच्या वर्तनाशीं ती जर तुलना करती, तर तिला काय आढळून आले असते ?

अरविंदही तिच्या मनातील संशय काढून टाकण्याची संधि पहात होता. भय्यासाहेबाबरोबर तिची मोकळेपणाची वागणूक त्याला दिसत होती. त्यामुळे त्याच्या मनास वेदना होत नव्हत्या असें नाहीं, परंतु मधुकराच्या लिहिण्याप्रमाणें त्याचा विवाह ठरला आहे असेंच तो गृहित धरून चालत होता. आपल्या चारित्र्याबद्दल तिला आलेला संशय दूर करण्याची त्याची इच्छा मात्र तीव्र होती. श्रीपती व जिजा ह्याच्याच तोंडून खुलासा करवून तिचा खोटा ग्रह दूर करिता आला तर ते परिणामकारक होईल असे त्याला वाटत होते. तेव्हा ही संधि बरी आहे असे त्याला वाटले.

" विमल, तूं आता इथ असावीस असच मला वाटत होत. " अरविंद म्हणाला, " इतक्यात तूं आलीस. माझ्या अंतर्मनाचा संदेश तुला मिळाला कीं काय ? "

त्याच्या शब्दातील गोडपणा, त्याच्या दृष्टीतील पावित्र्य व त्याच्या स्मितातील आपलेपणा पाहून तिच्या मनातील गढूळ विचार निवळू लागले.

" अरविंद, " ती थोडी थाबली व जिव्हाळ्याच्या स्वरात म्हणाली, " तुझ्या अंतर्मनाचा संदेश मला तत्काळ कळतो, पण माझ्या... ? "

पुढे ती बोलली नाही. तिला काय बोलावयाचे ते आपल्या लक्षात आले असें वाटून तोच म्हणाला,

" तुझ्या मनात कोणत्या भावना उसळी घेत आहेत, हे मला कळत नाहीं थोडंच ? पण त्यापैकीं काहींचा आता काय उपयोग ? कड्यावरून एकदा का तोल गेला, तर तो सावरता येतो थोडाच ? पण ते सोडून दिलं तरी, एक गोष्ट तुला पटवावी म्हणून तूं इथं असावीस अस मला वाटत होतं. हीच माझी जिजा व तिनं आपल प्रेम अर्पण केलेला हा श्रीपती बघ. हींच तुझा संशय दूर करतील. ही जोडी म्हणजे माझ्या इच्छित

कार्यांचा आधार होय. गोरगरिबांच्या सुखदु:खाची खरीखुरी जाणीव असलेली माणसंच खरं कार्य करू शकतील. ह्याना आमच्यासारखं शिक्षण नसेल, पण ही मनानं फार मोठी आहेत. तुला कायं विचारावयाचं असेल ते खुशाल विचार ह्या दोघाना. तुझी जर खात्री पटली, तर एका काल्पनिक दोषापासून तरी मी मुक्त होईन ! ”

अरविंदाचा कंठ रुद्ध झाला. ह्यापुढे तो जर बोलता तर त्याचा स्वर बदलला असता. पण त्याच वेळी पाटील व शेटजी यांची जोडी तेथे येऊन थडकली. पाटील जरा घाबरलेले दिसत होते. शेटजींनीं अरविंदाला एका बाजूस नेऊन पाटलाच्या घरची परिस्थिति त्याला सांगितली.

त्या वेळी विमल एका बाजूस गेली होती. अरविंदाचा प्रत्येक शब्द तिचे अंतःकरण भेदून गेला होता, त्यामुळे ती त्याच विचारात होती. ‘ कड्यावरून एकदा का तोल गेला तर तो थोडाच सावरता येणार ? ’ हे वाक्य अरविंदानं कोणत्या कारणानं उच्चारलं ? सकाळचा प्रकार त्याला कळला तर नसेल ना ? जिजाला तो बहीण मानतो, असं असता आपण संतापाच्या भरात इथं येताक्षणींच त्याला जे बोललो ते त्याच्या मनाला शल्यासारखं बोचलं असेल का ? त्याचं मन शुद्ध असता आपल्या तोंडा-तून निघालेल्या शब्दांनीं त्याचं अंतःकरण का नाहीं विदीर्ण होणार ? पण आपल्याजवळ शेटजीच्या पत्राचा चकचकीत पुरावा असल्यामुळं आपली चूक ती कोणती झाली ?

शेटजी दिसल्याबरोबर तिला वाटले कीं, “ ह्या शेटजीनंच अरविंदावर घादात खोटा आरोप केला नसेल कशावरून ? ह्याच्या लटपटीच्या पुष्कळ गोष्टी आपल्या कानावर आल्या आहेत, मग जो पुरावा खरा म्हणून आपण समजतो तो खोटा ठरला तर ? आणि तसं झालं तर आपल्या सकाळच्या वर्तनाचं समर्थन आपल्याला कसं करता येणार ? अरविंदाची मतं व आच-रण हीं आपल्या सुखाच्या आड येतात असं समजणं हेंही एक प्रकारचं आपलं मनोदौर्बल्य नाहीं का ?...... ”

अशा विचारमग्नतेंत ती असता अरविंद तिजजवळ आला व शेटजींनीं सांगितलेली हकिकत तिला सांगून तो म्हणाला,

" विमल, रात्रीची वेळ आहे ही गोष्ट कांहीं खोटी नाहीं, पण आज एका स्त्रीची सेवा करण्याची सुसंधि तुला आलेली आहे. तेव्हा अशा वेळीं मी तुझ्या मदतीची याचना केली, तर ती तुला आवडेल का ? "

" अरविंद, " त्याच्याकडे गंभीर मुद्रेने पाहात ती बोलूं लागली, " याचना कसली करतोस तू ? असला परकेपणा का तुझ्या शब्दात ? तूं वाटेल ते दिव्य करण्यास सांग मी ते ताबडतोब करीन. "

तिच्या विचाराचे प्रतिबिंब तिच्या शब्दात उघड दिसत होतें.

अरविंदाच्या लक्षात तें आलें नाहीं. अंधार पडूं लागल्यामुळें तिच्या चर्येवर उमटलेला भाव त्याला दिसूं शकला नाही. त्यामुळे निर्विकार मनाने रात्री तेथे काय काम करावे लागेल, हे तो तिला सांगूं लागला. विमल ते सर्व ऐकत होती. शेवटीं तो तिला म्हणाला,

" भय्यासाहेबाना तुझं रात्रीच बाहेर जाणं रुचेल ना ? " हे त्याचें बोलणे तिच्या मनास फारच झोंबले. पण अंतःकरण उघडे करून दाखविण्याची ती वेळ नव्हती. त्यामुळे मनातील यातना सहन करणे तिला भाग होते. ती त्यापुढे आढेवेढे न घेता एवढेच बोलली,

" चिखलात रुतलेल्याला बाहेर काढावयाचं काम मोठ्या मनाचीं माणसं करीत असतात ना, अरविंद ? "

तिचे ते बोलणे पश्चात्तापानें पोळत असलेल्या अंतःकरणातून निघालेले होते. त्या शब्दानीं ती त्याची करुणा भाकीत होती. हे त्याच्या लक्षात आले नाहीं. इतकेंच नव्हे तर, त्या वाक्यानीं भय्यासाहेबाच्या मनाचा मोठेपणाच ती सांगत आहे, असेंच त्याला वाटलें !

त्यानें जरूर तें साहित्य बरोबर घेतलें व तशा काळोख्या रात्रीं तीं दोघें पाटलाच्या गाडींतून ताबडतोब गावाकडे चाललीं !

---

## प्रकरण विसावें.

# दुष्ट खलबतें.



विमल व अरविंद यांनीं पाटलाच्या वाड्यात पाय टाकला त्या वेळीं त्या वाड्याच्या बाहेरील ओटीवर गडीमाणसे निमूटपणे बसलेलीं होतीं. मधल्या सोप्यात वृद्ध बायका सचिंत होत्या. अरविंद आत आल्याबरोबर त्यातील एक बाई कुजबुजली, " चागला शाना सुर्ता बापई, हतं ग कशाला आलाय ! " अरविंदाला हे ऐकू आले व तो तेथेच थबकला. त्याच्यामागे असलेली विमलही तेथेच थांबली. अरविंदाने पाटलाना शेटजी-कडील एक चागला कंदील आणण्यास सांगितले. इतक्यात चिमा कर्कश आवाजात बोलली,

" पाटलाना येड तर नाई लागलं इतका बोबाटा करायला ! आमची सई हायना खडी हत, मग बापयाना कशापाई घेऊन आलेती ते ! "

" अरविंद, " विमल त्रासून हळूच म्हणाली, " कशाला आलोंत आपण इथं, आपली शोभा करून घ्यायला ? "

" विमल, " अरविंद हलक्या स्वरात म्हणाला, " हे शहर नव्हे व एखाद्या पांढरपेशाच घरही नव्हे हे ! "

इतक्यात पाटलानी कंदील आणला. त्या प्रकाशात विमल इकडे तिकडे पाहूं लागली. त्याच वेळीं सईही अगदी हताश होऊन खोलींतून बाहेर पडली. ती चिमाला म्हणाली,

" चिमे, अग, लई वंगाळ येळ है ही ! कसं ग करूं आता ! माज्या हाताला येस मिळलसं नाई दिसत मला. आगारा तरी आन म्हसोबाचा."

चिमानें हे शब्द ऐकल्याबरोबर तिला पाटलानीं केले ते बरोबर केलें

असे वाटू लागले. ती शहरात वागलेली बाई होती. तेव्हा अशा प्रसंगीं डॉक्टर व नर्स यांचा उपयोग होतो हे तिला माहीत होतें. त्यामुळे ती लगेंच पुढें झाली व पाटलीणबाईच्या खोलीचा मार्ग त्याना दाखवू लागली.

खेड्यातील लोकाच्या भावना अरविंदाच्या परिचयाच्या होत्या. त्यामुळे तो खोलींत गेला नाही. त्याने विमलला पुढे केले. तिने हळूच दार उघडले व हलकेंच आत पाऊल टाकिले. त्या वेळीं तेथील कोंदट व घाण हवेच्या भपकाऱ्यानें तिला गुदमरल्यासारखे झाले. त्या अंधाऱ्या खोलीत तिला तेथे काय आहे हे प्रथम दिसेनाच मुळीं !

ती सभोवतीं पाहूं लागली. त्या खोलीस तिला खिडकीच दिसेना. वास्तविक नव्हतीच, तर ती तिला दिसणार तरी कशी ? त्या प्रसंगाची गंभीरता तिच्या लक्षात आली, व तशीच धीर धरून ती तेथे उभी राहिली. थोड्या वेळानें त्या खोलींत काय काय आहे ते तिला अंधुक अंधुक दिसूं लागले. त्या खोलीच्या कोपऱ्यातील मडक्याच्या भेसूर उतरंडीवर अंधाराचे कुंचले फिरत होते. खोलींतून काढलेला केर आपल्यास ऐसपैस हातपाय पसरण्याची बंदी केल्यामुळे क्रुद्ध होऊन दारातून किंचित् वारा आल्याबरोबर नाचत होता. कोनाड्यातील रॉकलेच्या दिव्याची ज्योत, आपल्या अंतःकरणातील काळेकुट्ट विष एकसारखें बाहेर ओकत होती. त्या लहानशा कोनाड्यावर त्याचा जहरी परिणाम होऊन तो अथाग काळाठिक्कर पडला होता ! एवढ्यानेंच तिचे समाधान न होऊन तिने आपल्या जाळ्याचें ध्वज त्या खोलीच्या वरील भागीं फडकत ठेविलें होते ! निरुपयोगी समजली जाणारी फाटकीतुटकी चटई खोलीच्या मध्यभागीं पसरलेली होती. आणि सौंदर्यानें देवतानाहि लाजविणारी पाटलीणबाई त्या चटईवरच कण्हत कुंथत अस्ताव्यस्त पडली होती ! हे दृश्य पाहून विमलच्या अंगावर शहारे आले. अशा स्थितींत पुढें काय करावे हे तिला सुचेना. त्या स्त्रीच्या यातनाची कल्पना येऊनच तिच्या मनात धडकी भरली. पाटलासारख्या बऱ्या स्थितींत असलेल्या गृहस्थाच्या घरातील ती

खोली व त्या गृहस्वामिनीची झालेली भयंकर अवस्था पाहून तिला अत्यंत संताप आला. त्यासरशीं तिने आपला पाय बाहेर काढला व तेथें एका बाजूस गुपचुप उभ्या असलेल्या त्या सईबाईवर ती गरजली,

" तुम्ही माणसच आहात का ? अशा खोलींत धडधाकट माणसाचाही जीव घाबरा होतो, मग अवघडलेल्या पाटलीणबाईना इथं क्षणभर देखील ठेवूं नये, हे तुम्हाला कळूं नये ? "

सईबाई गरीब खरी पण तिच्या कानावर हे शब्द पडताच ती संतापली. " अग बया," सईने हलक्या स्वरात उत्तर देण्यास सुरुवात केली. " लई शानी हैस तू बर ! हतंच सात बाळातपणं जाली कीं इचीं ! माज्याच हातान म्या केलीं कीं ! पन् तुज्यासारखी शानी आमाला सिकवाया नवती बरं बया ! येळ काळ बग, अन् मग तोडाचा पट्टा चालव. "

सई आणखीही पुढे बोलणार होती पण त्याच वेळीं चिमा आगारा घेऊन आली. अरविंदाचे लक्ष तिकडे गेले. चिमाच्या सागण्यावरून परिस्थिति अवघड आहे हे त्याने जाणलें, व तो इंग्रजींत विमलबरोबर बोलूं लागला. त्याचा परिणाम होऊन ती तशाही स्थितीत चिमाला घेऊन खोलींत शिरली. तोपर्यंत अरविंदाने सुचविल्याप्रमाणे पाटलानीं खुल्या हवेच्या भागात पडदे लावून एक खोली तयार केली. इतरही जरूर ती योजना झाली.

इतक्यात विमल बाहेर आली. तिने हलकेच अरविंदाला सर्व परिस्थिति सागितली. पाटलाचा विचार अरविंदानें घेतला. त्या वेळीं ते म्हणाले,

" काहींही करा. जीव वांचवा. तुम्हीच मायबाप आहात तिच ! " त्याना पुढे बोलवेना.

परिस्थितीने माणूस नरम होतो. त्या वेळीं त्याच्या हृदयातील नाजूक भावना प्रकट होतात. नाहींतर पाटलाच्या अंगचा इतका नम्रपणा व त्याच्या अंतःकरणात उडालेली खळबळ अरविंदाला इतर वेळीं दिसून येती ना.

पाटील तेथून निघून गेले. सईबाईस गोड बोलून अरविंदाने मदतीस घेतलें. विमलही आपल्या कामाची पराकाष्ठा करीत होती. जरूर पडेल

त्या वेळीं येता यावें म्हणून चिमा बाहेरील बाजूस उभी होती.

चागल्या दोन तासाने अडलेल्या पाटलीणबाईची सुटका झाली व नवीनच जन्मास आलेल्या मुलाची ऱ्या ट्या सुरू झाली. जिकडे तिकडे आनंदी-आनंद पसरला !

+ + +

त्यानंतर दोन तीन तासाची गोष्ट. मध्यरात्र उलटल्यामुळे गावात सर्वत्र स्तब्धता होती. बाहेर गडद काळोख पडला होता. शेटजीच्या खोलींतून दिसणारे वृक्ष निस्तब्ध असून ते अक्राळविक्राळ राक्षसाप्रमाणे भयकर भासत होते. रातकिडयाची भेसूर किरकिर मधून मधून ऐकू येत होती.

त्याच रात्रीं चिमाच्या कामाचा विचार करण्याचे शेटजींनीं पूर्वी कबूल केलें होते. शेटजींना त्या कामाचा बोभाटा होऊं द्यावयाचा नव्हता म्हणून त्यानीं रात्रीची वेळ पसंत केली होती. ठकोजीस त्याच्या गावाहून चिमाने मुद्दाम आणविले होते. त्याला दुसऱ्याच दिवशी साक्षीकरिता तालुक्याच्या गावीं जाणें भाग होते, म्हणून त्याचीही गडबड होती. पाटलाचा विचार घेतल्याशिवाय शेटजींना चिमाचे काम करावयाचे नव्हते. ह्याकरिता पाटलीणबाईची सुटका झाल्यानंतर शेटजींनी पाटलाना आपल्या घरीं बोलावून आणले. साहजिकच ते त्या वेळीं आनंदात होते. पाटील येऊन बसल्यावर चिमा म्हणाली,

“ आता पाटलास्नी पोरगा जालाय शेटजी, तवा आता जिजीबरोबर लगीन लावायचा त्येचा इचार गेला असल नाई ! ”

“ बोलूं नको चिमा त्या मागल्या गोष्टी. ” पाटील बोलूं लागले, “ सखारामाची जमीन मला मिळावी व विहिरीचा तटा पुन्हा होऊं नये म्हणून मी तसं म्हणत होतों. नाहींतर, जिजा माझ्या बबीसारखी, तिच्याबरोबर लग्न करणं बरं होतं का ! ”

“ आता जमिनीची आशा गेली वाटत, पाटील ! ” शेटजी मिस्किलपणें म्हणाले, “ पण जमीन आता जाते कुठें म्हणा ! ”

"पण शेटजी," पाटील शेटजींकडे तिरपी नजर टाकून म्हणाले, "तुम्हीच कसा डाव टाकाल, हेंच मला समजत नाहीं. सारी पैशाची नाडी तुमच्या हातात ना! पैशाशिवाय सखारामाची जमीन मला कशी मिळणार?"

"तुमची सोसायटी आहेच कीं तुमच्या हातात!" शेटजी डोळे मिचकावीत म्हणाले. "मग काळजी कसली तुम्हाला? अहो, आम्ही एकाचे दोन करितों म्हणून ओरडता आमच्या नावान, पण तुम्ही एकाचे चार, नव्हे काहीं नसतानाच दहा पाच करिता ना?"

शेटजी अशा रीतीने आपले खरे स्वरूप प्रकट करू लागले. त्यामुळे पाटील थोडे कावरेबावरे झाले. ते सावरून घेण्याकरिता म्हणाले, "तो पळून गेलेला सोसायटीचा सेक्रेटरी लुच्चा. त्यान काय केल कोण जाणे! आता ठकोजीलाच सेक्रेटरी करतो मी. मागची घाण निघाली कीं आम्ही सोसायटी बंद करणार आता! नको ती कटकट!"

"सगळे कागद पाहिले शेटजी," ठकोजी म्हणाला. "कागदी मेळ बरोबर दिसतोय. मग तो सेक्रेटरी लुच्च्या का कोण लुच्च्या देव जाणे! कागदावर सारेच निशाणी आगठे! त्या लोकाच्या जमिनीच्या लिलावाची वेळ आली कीं सगळ बिंग बाहेर पडेल. मला नको ती सेक्रेटरीची जागा. उगाच तळतळाट कोणाचा घ्यावा मीं?"

"बर, बर." पाटील हात हालवीत क्रुद्ध होऊन म्हणाले. "आमचं आम्ही पाहून घेऊं. आम्हीच खोटे निशाणी आगठे घेऊन लबाडीनं जमाखर्च केला असं तुला म्हणावयाचं आहे वाटतं? तुला नोकरी नाहीं म्हणून मी ती जागा देतों, तर आतापासूनच फाटे फोडू लागलास! अरे, एकमेकांचीं कामं अशानं होतात वाटत!"

पाटील चिमाकडे पाहूं लागले. त्या वेळीं ती ठकोजीस म्हणाली,

"आपल्याला काय करायच्या गावाच्या उठाठेवी? पाटील हायती खंबीर. त्येंच्या जोरावर तर आपलं काम व्हनार ना!"

"नाहीं कोण म्हणतो!" पाटील जोराने म्हणाले.

" पण चिमा, शेटजीला अगोदर कौल लावलास का ? सगळ ह्याच्या हातात आहे. " पाटील शेटजींकडे व चिमाकडे पाहूं लागले.

" मी कुणाचं वाईट करणार नाही, चिमा, " शेटजी शांतपणे बोलूं लागले. " पण शिरप्या आपलाच आन बच्च्याही माझाच. शिरप्याचं शेत माझ्याकडं खरेदी आहे हे खरं. पण मी बच्चाच्या नावान खरेदीपत्र कसं करून द्यावं बर ? माझं तें जुनं कूळ आहे. उगाच भाडणतटा कशाला लावून द्यावा मी ?"

" शिरप्याची जमीन बच्चाच्या नावान खरेदी करून देतो म्हणून कबूल केलंय ना मला तुमी शेटजी ? " चिमा शेटजींकडे पाहात काकुळतीनें म्हणाली. " आन आता का ओढून धरता बर ? तुमाला शिरप्याची कणव का माज्या बच्चाची ? तुमच्या घरी तो रातदीस पडून है ना ? पैसा बी तुमी मागाल तितका पदरात ओततें ना तुमच्या मी ? "

" मला सार कळतंय, चिमा. " शेटजी गंभीरपणे बोलू लागले. " पण पाटील तुझ्या बाजूला आहेत का ? चल उद्या मी खरेदीखत करून देतों. पण जमीन पेरायला बच्चा गेला, तर शिरप्या गप्प बसल वाटत ? मग तुमच्या मदतीला पाटील पाहिजेत ना ? नाहीतर तुझा पैसा जाईल व शिरप्या जमीन सोडणार नाहीं. मग माझ्या नावानं खडे फोडूं लागशील. याचा अगोदर चागला विचार कर. मला कोणाचा वाईटपणा नको ! वावगा पैसाही नको ! काय, पाटील, माझं बोलणं खरं आहे ना ? "

" शेटजी, " पाटील अभिमानदर्शक स्वरात बोलूं लागले, " तुम्ही म्हणता तें सगळं खरं. मी चार माणसं जमवून आणीनही. शिरप्याची खोड चागली मोडावयाची आहे मला. पण माझी गरज भागवाल तर तुमच्या शब्दाकरिता मी वाटेल ते करीन. "

" पाटील, " शेटजी मृदु स्वरात म्हणाले, " पैशाखेरीज कसलंही काम सागा. चागला वकील गाठून देतों तुम्हाला. अथवा तुमच्याकरिता चार खेटे घालीन तालुक्याला. पण पैसा मात्र मागूं नका. आता पैशाचा

व्यवहार नको आम्हाला. आणि पैसा तरी आहे कुठे आमच्याजवळ ! ”

“ शेटजी, ” पाटील काकुळतीच्या स्वरात म्हणाले, “ तुम्हाला सगळा ठाऊक आहे माझा बेत आणि उगीच ओढून धरतां होय ! चिमा ओतते ना तुमच्या पदरात पैसा ? आमची नड काय दोन महिन्याची. तुम्ही भागवावयाची नाहीं तर कोण आमचं काम करणार ? ”

पाटलाच्या बोलण्याचा विचार करीत शेटजी स्तब्ध बसले. त्यामुळे चिमाची धादल उडाली. तिने आज ठकोजीला मुद्दाम आणले होते. मागें सखारामाच्या अपीलात पैसा फुकट गेला व आपली फसगत झाली, तशी आता होऊं नये एवढ्याकरिता तिने ही खबरदारी घेतली होती. ठकोजीला सरकारी कामाचा अनुभव होता. तो ह्या व्यवहारात असला, म्हणजे बरोबर फायदेशीर काम होईल अशी तिची समजूत होती. ती काहीं खोटी नव्हती. ठकोजीला पाटलाचे व शेटजींचे डावपेच पुरे माहीत होते. शेटजींच्या मनात पैसे भरल्याशिवाय ते श्रीपतीच्या जमिनीचे खरेदीपत्र करून देणार नाहींत व पाटील मदतीस असल्याशिवाय खरेदीपत्र होऊन देखील सुलभपणें जमिनीचा ताबा मिळणार नाहीं.

श्रीपतीची जमीन बच्चाच्या मालकीची झाली तर सखाराम व राधाबाई जिजा बच्चाला देण्यास कबूल होतील, अशी चिमाने आपल्या मनाची समजूत करून घेतली होती. त्यामुळे हे खरेदीपत्राचें काम लवकर व्हावें असें तिला वाटत होते.

श्रीपतीने आपल्या जमिनीचे खरेदीपत्र करून दिले होतें, ते त्याच्या अज्ञानामुळे व शेटजीच्या कावेबाजपणामुळेच होय. त्याच्या वडिलाच्या बाकीबद्दल शेटजींनी त्याच्यामागे निकड लाविली म्हणून त्यानें एक कागद लिहून दिला होता. श्रीपतीने निशाणी आगठा त्या कागदावर केला होता हे खरे, पण तो कागद गहाणाचा आहे अशीच त्याची समजूत होती. जमिनीचा ताबा श्रीपतीकडे असला तरी कागदोपत्रीं खंबीर असावें म्हणून ते बच्चाच्या नावे त्या जमिनीच्या कबूलायती दरसाल करून घेत.

जर ती जमीन चिमाच्या म्हणण्याप्रमाणे बचाच्या नावे खेरदी दिली, तर शेटजींना रोख पैसा मुबलक मिळत होता म्हणून ही संधि वायां जाऊं देऊं नये असें त्याना वाटत होतें.

इकडे पाटीलही विचार करीत होते. सोसायटीचे कागदपत्र ठकोजीने पाहिले आहेत, अशा वेळीं ह्या ठकोजीवरच उपकार केल्यासारखे दाखविलें तर आपलेही सखारामाच्या शेताच्या लिलावाचें काम कोणास मागमूस लागू न देता साध्य होईल. हें खरेदीपत्र झाल्यानें पुढे त्याचे काय भयंकर परिणाम काय होतील, ह्याचीही जाणीव त्याना होती, परतु त्यातही श्रीपतीचा काटा आपोआप निघेल व लिलावाच्या वेळचा आपला मार्ग सुलभ होईल, असें त्याना वाटत होते.

ठकोजीनें शेटजींना एका बाजूस बोलावून त्याचा विचार घेतला. नंतर तो पाटलाकडे येऊन त्याना म्हणाला, "पाटील, शेटजी कबूल आहेत ह्या व्यवहाराला. तुमची समति आहे ना ? काय ते उघड उघड सागा. तुम्हीं आम्हीं मागं पुष्कळ कामें केली आहेत. तीं लक्षात आहेत ना तुमच्या ?"

"तलाठीसाहेब," त्याच्या पाठीवरून हात फिरवीत पाटील खुलून म्हणाले, "मी कुठ नाहीं म्हणतों ? माझी काळजी करू नका तुम्ही. पण तुम्ही सेक्रेटरीचे काम करा. निदान गप्प तरी राहा, म्हणजे झाल ! माझी वाटेल ती मदत आहे तुम्हाला ! पण थोडा शेटजीचा विचार घेतो आणि कायमचं वचन देतो."

ठकोजीने पाटलाचा मतलब ओळखला व ते एका बाजूस झाले. तेव्हा पाटील म्हणाले, "शेटजी, फुकटाफुकट भरमसाट रक्कम तुमच्या पदरात पडते आता. तर तुम्ही मला पैशाची मदत करा. सखारामाच्या शेताच्या लिलांवाच्या वेळीं. मी पाहून घेतों सगळं आता ! चिमीची समजूत होत आहे, व जिजाचें बच्चाबरोबर लग्नही ठरत आहे. मग सखारामाची काळजी नको तुम्हांला. तुम्ही मला फसवाल, तर मात्र मीही तुमचं साधूं देणार नाहीं."

"पण तीं मुंबईचीं माणसं श्रीपतीच्या मागं आहेत ना!" शेटजी म्हणाले.

" आपला गुंतागुंतीचा व्यवहार त्याच्या कानावर जातो कशाला ! " पाटील म्हणाले. " दोन दिवस त्याचा बडेजाव करून लावून देऊं त्याना परत! आता पावसाळा तोंड काढतोय. मग कशाला राहतात तीं इथं ! "

शेटजींबरोबर पाटील बोलत आहेत इतक्यात श्रीपती अरविंदाला घेऊन तेथे आला. अरविंद व विमल याना घरीं परत नेण्याकरिता तो आला होता. 'मी शेटजींकडे जातों आहें; पाहुणे निघाले कीं, मला कळवा,' असें पाटील गडीमाणसाना सांगून आले होते. रात्रीं जरूर पड-ल्यास जवळच असलेलें बरे, अशा विचारानें अरविंद विमलला घेऊन शेटजींच्या घरीं मुक्कामाकरिता आला होता. त्याची तेथे व्यवस्था लागली कीं, श्रीपती परत जाणार होता. त्या वेळीं पाटलानीं अत्यंत नम्रतेनें अर विंदाला रामराम केला. त्या वेळीं अरविंद म्हणाला,

" पाटील, मुळींच काळजी करूं नका घरची. आज तर आम्ही शेट-जींच्या घरींच आहोत, व पुढेंही कांहीं दिवस आम्ही प्रकृति पाहात जाऊं."

" तुम्ही देवच आम्हाला भेटलात, " पाटील नम्रपणें म्हणाले, "आजचा आनंद तुमच्यामुळेच झाला आम्हाला. माझे मागचे अपराध तुम्हीं पोटात घातलेत, आन उपकाराचं ओझं कायमचं माझ्यावर ठेवलंत, साहेब ! "

त्या वेळीं श्रीपतीची नजर माडीवर बसलेल्या मंडळींकडे गेली. त्या वेळी चिमा थोडीशी चरकली. त्याच्या दृष्टीस दृष्टि भिडविण्याचें धैर्य पाटला-नाही होईना. त्याचे दुष्ट विचार त्याच्या मनाला खात होते त्यामुळेच श्रीपतीची त्या सर्वांना भीति वाटत होती.

---

## प्रकरण एकविसावें.

# कडू गोळी.



तो पाटलाच्या मुलाच्या बारशाचा दिवस होता. त्या दिवशीं पाऊस मुळींच पडत नव्हता. नभोमंडळात तुरळक तुरळक मेघपंक्तींचा पाठशिवणीचा खेळ चालू होता. सायंकाळच्या वेळीं पश्चिम दिशेकडून येणाऱ्या वायुलहरी सर्वांना संतोष देत होत्या. चावडीपुढील मोकळ्या पटागणात लतापल्लवाचीं तोरणें आनंदानें डोलत होतीं. गेले एक दोन दिवस मनाजोगा पाऊस पडल्यामुळे शेतकऱ्याचीं मुखकमले प्रफुल्लित झालीं होतीं. बारशाकरिता पाटलाच्या निमंत्रणावरून सभोंवतालच्या लहान लहान गावातील बरेच लोक मोठ्या उत्सुकतेनें तेथे आले होते. पाटीलही अत्यंत आनंदात होते.

या लोकाच्या जेवणाच्या व्यवस्थेकरिता पाटलाचे सोनगावचे सगेसोयरे निरलसपणें झटत होते. चावडीच्या मागील बाजूस मोठ्या कढईत गव्हाची खीर शिजत होती. मोठमोठया हंड्यात तादूळ ओतण्याचें काम चालू होतें. मुद्दाम आणलेल्या दिवाबत्त्याचा लखलखाट सर्वत्र फाकलेला होता. पटागण अत्यंत स्वच्छ ठेविलें असून, शेटजींच्या देखरेखीखालीं तेथील सर्व व्यवस्था चोख होती. त्याच दिवशीं तेथेंच साक्षर झालेल्याचा बक्षिससमारंभ करण्याचे अरविदानें ठरविले होतें, म्हणून शेटजींनीं दूरच्या गावाहून पाच चार खुर्च्या,एक टेबल, वगैरे सभेचें साहित्य मुद्दाम आणविलें होतें. सभेच्या जागीं लोकाची गर्दीही खूप झाली होती.

ह्या समारंभाकरिता मधुकर मुबईहून आला होता. रामगुंफेपासून गावापर्यंत त्यानें आपल्या खर्चानें रस्ता तयार करवून घेतला होता. रामगुंफेतील

सर्व मंडळी मोटारींतून गावात येण्यास निघाली. त्या मोटारीचा आवाज कानीं आल्याबरोबर लोकाचे लक्ष तिकडे गेले. शुभ्र खादीच्या पोशाखातील अरविंदास पाहून अंतःस्फूर्तीनें सर्व लोक उभे राहिले. सभोंवतालच्या खेडेगावातील लोकाना केलेल्या मोफत औषधोपचारामुळे आणि त्याच्या लोकसेवेच्या गोष्टी त्याच्या कानाना जात असल्यामुळे तो एक देवमाणूस आहे, अशी त्या गोरगरिबाची समजूत झाली होती. त्यामुळें त्याला पाहून त्यानीं हातही जोडले. हे पाहून अरविंदाचे नेत्र भरून आले.

प्रथम बक्षिससमारंभ उरकावा, नंतर पाटलाकडील बारशाचें जेवण व्हावे, अशी योजना ठरलेली होती. गेला महिनाभर अरविंदानें केलेल्या परिश्रमाचे सार्थक पुष्कळच झालें होते. जवळ जवळ सोनगावच्या अर्ध्या अधिक लोकाना अक्षरओळख झालेली होती. आता आपण वाचून दाखविणार व आपणास बक्षिस मिळणार, ह्या इच्छेनें जमलेल्या लहानमोठ्या लोकाची उत्सुकता अत्यंत वाढलेली होती.

आसनस्थ होताच अरविंदाची स्निग्ध दृष्टि सर्व श्रोतृवृंदावरून सहज फिरली. त्याच्या मनाला समाधान वाटले. तो समारभ मधुकराच्या हस्तें होणार होता. अरविंद व मधुकर टेबलाच्या मागील बाजूस, विमल व भय्यासाहेब टेबलाच्या उजव्या बाजूस, शेटजी व पाटील ही जोडी टेबलाच्या डाव्या बाजूस उपस्थित होती. श्रीपती अरविंदाच्या मागें उभा होता. जणूं काय तो त्याचा शरीरसंरक्षक असावा! त्याप्रमाणें बचाही शेटजींच्या मागील बाजूच्या दगडावर बसला होता.

अरविंदानें मधुकरास परीक्षा घेऊन बक्षिसें देण्याची विनंति केली. आरंभीं त्यानें श्रीपतीसच बोलावलें. त्याने अस्खलित वाचून दाखविलें व सर्वांकडे अभिमानाने नजर टाकली. मधुकरानें त्याच्या बुद्धीच्या चलाखीची, प्रामाणिकपणाची व निधड्या छातीची भरपूर स्तुति करून, त्यास दहा रुपये रोख व पोषाख बहाल केला! सर्वत्र टाळ्याचा कडकडाट झाला. मात्र बचाची दृष्टि द्वेषाने लाल झाली! त्याने दात ओठ चावले.

इतर शेसव्वाशें मंडळींकडून दोन दोन ओळी वाचून घेऊन मधुकरानें कोणाला तीन, कोणाला दोन, कोणाला एक रुपया, अशीं बक्षिसें दिलीं. त्याच्या उदारपणाची सर्व लोक स्तुति करू लागले. नंतर मधुकरानें सर्वांना ऐकूं जाईल, अशा खडया आवाजात त्याना उत्तेजनपर चार शब्द सागितले. त्याचे भाषण कळकळीनें ओतप्रोत भरलेलें होते.

त्यानंतर भय्यासाहेबाना अरविंदानें लोकाना उपदेश करण्याची विनंति केली. त्याचा गौरवर्ण, साहेबी ऐट, साहेबी टोपी व चलाख दृष्टि ह्याचा सर्व मंडळींवर एकदम चागला परिणाम झाला. भाषणास सुरुवात करण्यापूर्वी त्यानीं प्रथम सर्वांकडे सहज नजर टाकली. विमलकडे त्याची दृष्टि गेल्याबरोबर ती गालातल्या गालात हसली. त्यामुळे भय्यासाहेबाना जास्तच स्फुरण चढले. मधुकर, अरविंद व विमल, ह्याना आपल्या वक्तृत्वाच्या ओघात वाहून न्यावे, आपल्या मताची छाप त्याच्यावर बसवावी, अशी त्याची फार दिवसाची मनीषा होती. त्या भरात समोरच्या श्रोतृसमाजाला आपल्या भाषणाचे कितपत आकलन होईल, ह्याचे त्याना भानही राहिलें नाहीं !

सामान्यतः शहरी वक्त्याची खेड्यात अशीच स्थिति होत असते. आपल्या विचारतंद्रीबाहेर जाणे त्याना कठिण जाते. श्रोत्याची कुवत जाणून त्याच्याशीं समरस होणारे वक्ते फार विरळा. भय्यासाहेबाची स्थिति तशीच होती. शिवाय विमलच्या मधुर स्मितानें त्याना जास्तच उत्तेजन मिळालें होते. शेकडों शेतकऱ्याचा जमावही त्याना आपले विचार जोरानें पुढें माडावयाला उत्साह उत्पन्न करीत होता.

त्यांनीं भाषणास सुरुवात केली. त्याचा गोड आवाज व योग्य आविर्भाव यांमुळें त्याचें भाषण, कळो वा न कळो पण, लोक शातपणें ऐकूं लागले.

भय्यासाहेबानीं साम्यवाद विशद करण्यास सुरुवात केली. त्यानीं कार्ल मार्क्सच्या तत्त्वज्ञानातील सिद्धातांचें आरंभीं विवरण केलें. त्याच्या सिद्धातांची परिणति पुढें कशी होत गेली, ह्याचेंही त्यानीं विवेचन केलें. त्याच्या

तत्त्वाची आरंभीं झालेली हेटाळणी त्यानीं श्रोत्याना निवेदन केली. विसाव्या शतकात त्याच्या तत्त्वाचा विजय कसा होत गेला, हेंही त्यानीं सागितलें. लेनीन, स्टॅलीन, इत्यादि महाभागानीं तीं तत्त्वें प्रत्यक्ष व्यवहारात कशीं आणिलीं, व त्यामुळें आरंभीं रशियात व नंतर जगभर कशी क्राति घडून येत आहे, ह्याचेंही त्यानीं रसभरित वर्णन केलें.

त्याचें भाषण चालले असता ते मधून मधून विमलकडे दृष्टिक्षेप करीत. तिच्या फुललेल्या मुखचर्येनें व मंद स्मितानें त्याना बोलण्यास जास्तच उत्तेजन येई. ती मनातल्या मनात का हसत होती, हें भावनावश भय्यासाहेबाच्या ध्यानीं येत नव्हते. लोकाच्या अज्ञानाची तिला बरीचशी जाणीव झालेली होती; त्यामुळें त्याचे वक्तृत्व मोहित करून टाकणारें असले, तरी तें स्थलकालाचा विचार न करिता होत होतें, ह्याची तिला गंमत वाटत होती, म्हणून तिला हसूं येत होतें.

भय्यासाहेबाच्या भाषणात उगाच व्यत्यय आणणे बरें नाहीं, असें प्रथम अरविंदाला वाटले. न जाणों, कदाचित् विमलचे मन त्यामुळे दुखा-वेल, असाही त्याला संशय वाटत होता. शेवटी मधुकराकडे पाहून व त्याच्या कानात थोडेसें कुजबुजून अरविंदानें त्याच्या हातीं पुढील दोन ओळींची चिठ्ठी दिली.

" आता वेळ फार झाला आहे. लोक उपाशी आहेत. त्याना दोन उपयुक्त गोष्टी सागून भाषण आटोपतें घ्यावे, अशी विनंति आहे. "

' ठीक आहे, ' असें म्हणून श्रोत्याकडे पाहून ते जोरानें बोलूं लागले. " अध्यक्षसाहेब म्हणतात, तुम्ही लोक उपाशी आहात. विचार करा, तुम्ही कायमचे उपाशी नसता का ! ह्या शेटजींच्या घरीं खाण्यापिण्याची चगळ आहे, तशी तुमची कधीं असते का ! ह्या पाटलाच्या मोठमोठ्या जमिनींतून तुमच्याच श्रमानें निघणारा सोन्याचा घास तुमच्या मुखात पडतो का ! मग सागा तुम्ही नेहमींच अर्धपोटी राबता ना ! हा कशाचा परिणाम ! बाबानो, सर्वस्वीं भाडवलशाहीचा. रशियासारख्या देशात

भाडवलशाही रसातळाला गेली म्हणूनच तेथील शेतकरी, कामकरी, ह्यांचें पोटात सुखानें घास जात आहे. तुम्ही असेच उपाशी किती काल राहणार याचा विचार करा. ''

मधुकरास हें भाषण अत्यंत अप्रस्तुत वाटलें. भय्यासाहेबाचा वाक्प्रवाह पावसाळ्यातील नाल्यास आलेल्या पुराप्रमाणें जोराने वाहात होता. भाषण आटपा व खाली बसा, असें सागण्याची वेळ प्राप्त झाली. कारण शेटजी व पाटील क्रुद्धतेने भय्यासाहेबाकडे पाहूं लागले. सभेचा खेळखंडोबा होतो कीं काय, अशी धास्ती वाटूं लागली. म्हणून अरविंदाने पुन्हा एक त्याच्या हातीं चिठ्ठी दिली.

ती मोठ्याने वाचीत वाचीतच ते बोलू लागले. " अध्यक्ष म्हणतात, एकच मुद्दा सागून भाषण पुरें करा व व्यावहारिक बोला. बरे तर ! व्यावहारिक एकच गोष्ट तुम्हाला सागून मी आपले भाषण पुरे करीत आहे. समजा, सर्वांना सारखी जमीन मिळाली, तर तुम्ही सुखी व्हाल कीं नाहीं ! सावकार देणें एकदम नाहींसे झाले, तर तुम्ही सुखी व्हाल की नाहीं ! बोला, बोला, तुम्हाला काय वाटते ते ! तर मग शेतकरी व कामकरी याची संघटना करा म्हणजे इच्छित फळ तुमच्या पदरात पडलेच समजा ! ''

सभेचे वातावरण गभीर झाले. शेटजी व पाटील कोणाला काहीं इशारा देत आहेत, असा अरविंदास भास झाला, म्हणून तो एकदम उठला. त्याबरोबर भय्यासाहेबानीं भाषण बंद केले व ते खुर्चीवर बसले. हातरुमालाने घाम पुशीत असता त्यानीं विमलकडे पाहिले, पण तिची नजर अरविंदाकडे होती. त्यामुळें त्याची निराशा झाली.

अरविदानें अक्षरओळख झालेल्या लोकांची स्तुति केली व आपल्या मुलाबाळाकरिता प्रत्येक गावी शाळा काढण्याची आम्ही खटपट करूं, तरी सर्वांनीं आम्हाला मदत करावी, अशी त्याना विनति केली.

इतक्यात सुगंधी फुलाचे हार तबकात घेऊन एक तरुणी पुढे आली. तिची ती चलाखी पाहून सर्व लोकानाच काय, पण पाहुणे मंडळींसही

आश्चर्य वाटलें. तिनें आपल्या गोड पण खणखणीत आवाजात न लाजता बोलण्यास सुरुवात केली :—

" आजच्या आनंदाचे सर्व श्रेय आमच्या ह्या बाईसाहेबानाच आहे. बळीकाकाना मुलगा झाल्याचा आनंद सर्वांना वाटत आहे, पण ह्या बाईसाहेब होत्या म्हणूनच हा आनंदाचा दिवस आपण पाहात आहोत. माझं म्हणणं एवढंच, कीं पुरुषाना लिहिणं वाचणं आल्यानं ते जसे शाहाणे होतात, तसेंच आपल्या लेकी सुनानाही शाहण्या करा. "

त्या तरुणीच्या आगमनाने अगोदरच लोक दिपून गेले होते. तशात तिच्या भाषणानें तर सर्वांनीं तोंडात बोटच घातले ! पण भिंतीआडून डोकावून पाहात असलेली चिमा एकदम ओरडली,

" कार्टीला आता म्हनावं तरी काय ! बाप्यात अस्सं बोलूं लागली ही ! बच्चा आन र तिला ओडत हकड ! मंग तिला दावतें काय त्यें ! "

जवळच्या मंडळींना हे शब्द ऐकूं आले. आजूबाजूस उभा असलेला स्त्रियाचा घोळका जिजाकडे पाहूं लागला. ही गडबड ऐकून तिनें आपलें भाषण आटोपले, व एक हार विमलच्या गळयात घालून ती निघून गेली.

लागलीच श्रीपतीनें पुढे येऊन बाकीचे हार त्या मंडळींच्या गळ्यात घातले. बोलण्याऐवजीं तो अरविंदाच्या पाया पडला. टाळ्याचा कडकडाट झाला.

हा सर्वच प्रकार अरविंदास अनपेक्षित वाटला. ह्याची पूर्वतयारी श्रीपती व जिजा ह्यानीं अगोदरच करून ठेविली होती. त्या दिवसात दुर्मिळ अशीं फुलें श्रीपतीने जिजाच्या सांगण्यावरून जमा करून आणलीं होतीं. तिनें त्याचे हार बनविले होते. त्या दोघानीं अगोदर ठरविल्याप्रमाणें योग्य वेळीं त्याचा उपयोग केला.

\+ + + +

अरविंद व विमल ह्याच्या उपकाराचें ओझे पाटलाना अत्यंत वाटत होतें. मोठ्या आग्रहानें ह्या मंडळींना त्यानीं जेवणास बोलाविलें होतें. त्यांची सर्व व्यवस्था त्यांनीं शेटजींच्या घरीं केलेली होती.

जेवण आटोपल्यावर शेटजींच्या माडीवर सर्व मडळी आली. त्याच्या घराभोंवतीं लोकाचा गराडाच पडलेला होता. काहीं लोक केविलपणें शेटजींना विनवीत होते, पण शेटजी त्याना बेपर्वाईचीं उत्तरें देत होते. हें ऐकून मधुकर अरविंदास म्हणाला,

" कायरे अरविंद, खालीं काय प्रकार चालला आहे ? शेटजी तर भला माणूस दिसतो, मग आताच हा इतका गरम का झाला असावा ? "

इतक्यात शेटजी माडीवर आले. त्याना पाहून अरविंद म्हणाला,

" काय हो शेटजी, लोकाची गडबड कसली चालली आहे ही ? तुम्हीच सागा याना; हे विचारीत आहेत मला ! "

" हं ! " शेटजी मधुकराकडे पाहून म्हणाले, " हा आमचा नेहमींचा धंदा आहे, साहेब. ह्या लोकाना प्रथमच हडसून खडसून बजावावें लागते ! "

" पण आता कशाकरिता ह्यानी इतकी जिकीर चालविली होती तुमच्याशीं ? " मधुकर माहिती घेण्याच्या उद्देशाने म्हणाला. " आणि हे जेवायला आलेत का कामाला आलेत इथें आता ? "

" त्याचं असं आहे, साहेब ! " शेटजी मान डोलवीत बोलूं लागले. " जेवायला तर आलेच आहेत हे पाटलाकडे, पण एक दोन महिन्याची चंदी मागायला आलेत माझ्याकडे. अहो, आता पाऊस पडलाय ना ? पेरे होतील आता सुरू. पण घरीं खायला काय याच्या ? आता हे चार पायली, आठ पायली, किंवा मण दोन मण धान्य आमच्या इकडून नेतील, तर जगतील व शेती करतील. नाहीतर काय हो, यांची दुर्दशा विचारायलाच नको ! "

"शेटजी, तुम्ही ऐन वेळीं याचे पोशिंदेच होता म्हणावयाचे ? " मधुकर बोलूं लागला. " पण ह्या वेळीं तुम्ही त्याना धान्य देता त्याचा तुम्हाला मोबदला काय मिळतो ? ही वसुली केव्हा व्हायची ? तुमच्याजवळ धान्य तरी किती असणार असें, ह्या सर्वांची मागणी पुरवायला ? पण आणखी मी तुम्हाला विचारतों, ह्या लोकाना वर्षाची बेगमी करण्याचं कळत कसं

नाहीं ! किती केविलवाणी त्याची स्थिति ही ! तुम्ही रागावलात तरी पदर पसरून पाया पडतात तुमच्या. ... ''

मधुकराचें बोलणें पुरें झालें नव्हते, तरी शेटजी मध्येच बोलू लागले,

'' साहेब, तुमचं म्हणणं समजलं मला. आता यानीं नेलेल धान्य सुगीच्या वेळीं वसूल करायला केवढी यातायात होते आम्हाला ! सवाई किंवा दिढी पडते आमच्या पदरात, पण त्याला किती कष्ट पडतात, साहेब ! बच्चासारखा उलट्या काळजाचा माणूस आहे आमच्या नोकरीला, म्हणून वसूली होते आमची. तेंच धान्य साठवून ठेवतो आम्हीं. हा धंदा सुरू केला तेव्हा दहा पाच मणसुद्धा नव्हतं माझ्याजवळ; पण आता देवाच्या दयेनं दहा वीस खंडीचा गल्ला शिल्लक आहे. ''

शेटजींचें भाषण चाललें असता भय्यासाहेबाची सारखी चुळबूळ चालली होती. ते मध्येच म्हणाले,

'' शेटजी, असे साठत साठत दहाच्या शभर खंडी होतील की तुमच्या !''

'' हो, हो !'' शेटजी अभिमानानें म्हणाले. '' कष्टाचं फळ मिळालंच पाहिजे. तेवढ्या खडी व्हायला हो काय हरकत ! पण आम्ही हा धंदा आता आखडता घेतला आहे ! वसुली फार जड जाते. सुगीला काहींचा साराच माल उचलून आणण्याची वेळ येते. मग बायकामुलं रडत बसतात. त्याची किंव येते आम्हाला ! ''

''पण काय हो,'' अरविद म्हणाला, '' शेतात धान्य पूर्वीच्या इतकंच पिकतं का काही जास्त पिकतं ! लोकाचा संसार वाढलाय का कमी झालाय ! ''

'' धान्य ज्यास्त पिकतंय कुठलं ! '' शेटजी म्हणाले. '' जनावरं कमी झालीं म्हणून खतपाणी कमी झाल. वेळेवर पाऊस पडला तर पिकत बरं. पण खाणारीं माणसंही वाढलींत, रावसाहेब ! म्हणून काहीं केलं तरी धान्य पुरत नाहीं त्याना. दिवसच वाईट येत चालले ! ''

'' अहो, '' भय्यासाहेब जोराने म्हणाले, '' दिवस वाईट आले ते कशामुळं ! असं पहा, धान्य साठत साठत तुमच्याजवळ बेसुमार साठलं

तर लोकाजवळ काय राहणार बरं ? मग लोकानीं खावं काय ? "

" साहेब, " शेटजी चढ्या सुरात बोलूं लागले, " हा धंदा आहे आमचा. आमच्याजवळचं धान्य न्या म्हणून काहीं गुळ खोबर देत नाहीं ना आम्ही त्याना ! जरूर लागेल तो नेतो व फेडतो. त्यानीं काय खावं, ह्याची काळजी कोणीं करायची ? "

"तसं म्हणून कसं चालेल ?" मधुकर सौम्यपणे म्हणाला. " ती काळजी केली नाहीं तर सुखानें खाऊं देतील का तुम्हाला हे लोक, सागा बर ? "

" साहेब, " शेटजी हलक्या सुरात बोलूं लागले, " गोरगरिबाना सूटही देतों आम्ही; नाहीं असं नाहीं. आडदाडाला मात्र हात दाखवावा लागतो. कागदोपत्री निशाणी आगठा घेतल्याशिवाय आम्ही याना काहीं देत नाहीं. पण इथं पैसा मिळवायला फार कष्ट पडतात. मुंबईचा व्यापार नव्हे हा ! लोडाला टेकून सट्टे करावे व लक्षाधीश व्हावे !"

मधुकराचा व्यवहार काही अंशी तशाच प्रकारचा होता. त्यात त्याला गेल्या महिन्या दोन महिन्यात खूप पैसे मिळाले होते. खेड्यातील चाल-लेल्या कार्यक्रमास आपला पैसा खर्च व्हावा, अशी अरविंदाची इच्छा होती. पण मधुकराचा हेतु अरविंदास संतुष्ट करून त्याला परत मुंबईस नेण्याचा असल्यामुळे त्याने तो सट्टयात मिळविलेला पैसा आपणच इकडे खर्च केला.

" शेटजी, " मधुकर हसत म्हणाला, " पण त्याच्यावर भिक्षाधीश होण्याचीही पाळी येते. तशी तुमच्यावर यावयाची नाहीं कधीं ! "

" पण साहेब, " शेटजी म्हणाले, " तुमच्या भय्यासाहेबासारखे लोक गावोगाव निघाले तर माकडाच्या हातीं तेव्हाच कोलीत देतील कीं ! मग भाडणतंट्याला हो काय वेळ ! "

हे बोलणें चालले असता खिडकीजवळ बसलेल्या विमलचे लक्ष बाहेर काय चालले आहे तिकडे गेलें.

ठिकठिकाणीं दहापाच दहापाच अशा मेळाने लोक बसले होते. ते आजच्या समारभावरच बोलत होते. त्याची विमलला मोठी गंमत वाटली.

तिने त्या वेळीं भय्यासाहेबाकडे कुतूहलबुद्धीनें पाहिले व ती मधुकराला म्हणाली,

" दादा, आजच्या भय्यासाहेबाच्या भाषणावर लोक काय म्हणतात, ते ऐका तरी ! फार मजा चालली आहे ! "

त्या लोकाचा संवाद जोरात चालला होता. त्या वेळीं एकजण म्हणाला,

" अर भिव्या, 'काळामाका' काय म्हनतुया समजल का ? ह्यो गललट कुटं र राहतु ? "

कार्ले मार्क्सबद्दलचा 'काळा माका' शब्द ऐकून अरविंदाला हसूं आले, आणि त्यातील मर्म समजल्यावर सर्वच हसूं लागलीं.

" अर सोन्या, त्यो बग रूमशाममंदी है. ततं लेका साऱ्या पऱ्याच ! "

" ए भिव्या, अगा रुमशाम कुटं र है ? आपल्या डोमगावापासन कितीस लाब है ? दहा पाच कोस असल, तर जाऊं या आपन ततं ! साऱ्याना जिमिनी सारक्याच मिळत्याती ततं, असं त्यो सायब म्हनत नव्हता का ? ततं सेटजीबी नाई. कोनीबी कोनती परी करावी म्हनतुया त्यो सायब ! "

त्या लोकातही ह्या बोलण्यानें हशा पिकला. रशियाबद्दल रूमशाम व स्त्रीस्वातंत्र्याचा त्यानीं केलेला अर्थ 'पऱ्या', ह्यामुळें आमच्याही मंडळींना हसूं लोटले. कांहीं का होईना, लोक चर्चा करू लागले ह्याबद्दल भय्यासाहेबाना अभिमान वाटू लागला. हशाचा भर ओसरल्यावर दुसऱ्या घोळक्यात निराळाच संवाद चालला होता, त्याकडेही मंडळींचें लक्ष गेलें.

" अर शिवा, आता साऱ्या जिमिनी वांटायच्या दोऱ्या घालून सारक्या; मंग तुजी मायंदाळ जिमीन आमालाबी थोडथोडी मिळल ! "

" अर, कोण र वाटतय माझी जिमीन ? पाय तर टाकून देईन का कुनाला तिच्यात ? एकेकाच तंगडच मोडीन मी, समजलास का भिक्या ! "

" अर, त्यो टोपीवाला सायब म्हनत नव्हता का मगा ? सायबानं केलं म्हंज काय र करसील ? "

" अर, त्यो खरा सायब नव. गावटी सायब है. इचारा त्येला नांगर धराया येतु का म्हनून. अगा, एक दीस येऊं द्या व शिळा तुकडा खाऊं द्या म्हज दुसऱ्या दिसीं रामच म्हनायचा ! "

असले संवाद आणखी त्याना ऐकावयास मिळाले असते. पण इतक्यात पाटील तेथे आले. त्यामुळें मंडळींचे तिकडील लक्ष उडालें. पण अरविंदाला बोलल्याशिवाय राहवेना. तो भय्यासाहेबाना उद्देशून म्हणाला,

" भय्यासाहेब लोकाचें अज्ञान किती आहे, हे आले का तुमच्या लक्षात? अज्ञानाचा अगोदर निरास केल्याशिवाय त्याना काहीं कळावयाचें नाहीं. "

" अरविद, " भय्यासाहेब उत्साहानें म्हणाले, " मला तर वाटतं, त्याना माझ्या भाषणाचे मर्म कळलं. ह्याची सघटना झाली, कीं त्याच्यात दिव्य शक्ति निर्माण होईल ! "

" साहेब, " पाटील मध्येच म्हणाले, " लोकाना एकमेकाचीं डोकीं फोडायला लावाल तुम्ही, पण त्याचा इंगा तुम्हाला कळला की जीव घेऊन पळत सुटाल. आमचे रावसाहेब साऱ्याना आवडतात. ते विद्या शिकवून शहाणे करितात पण तुमी भाडायला शिकविता ! "

भय्यासाहेबावरील पाटलाचा घुस्सा अशा रीतीनें बाहेर पडला.

" पाटील, " भय्यासाहेब आवेशानें उसळले," काहींही म्हणा तुम्ही, तुम्हासारख्या जमीनदाराना व शेटजींसारख्या सावकाराना आमचे म्हणणं कडूच वाटायच. पण ही कडू गोळी आम्ही तुम्हाला पचवायला लावूं ! "

" साहेब," पाटील हसत हसतच म्हणाले, " पाहूं, पाहून घेऊं ! "

त्याच वेळीं बच्चा एक लखलखीत फरशी हातात घेऊन तेथें आला. त्याला तशा स्थितींत पाहताच पाहुण्याचे धाबें दणाणलें. त्याने पाटलाना एका बाजूस बोलावलें. पाटील त्याच्याशीं बरेच कुजबुजले व ते तेथून बाहेर पडले.

## प्रकरण बाविसावें.

# 'सांबाळा आपल्या जीवाला.'



शेटजीच्या घरी बच्चा आपली चकाकणारी फरशी घेऊन आला होता; ती फरशी त्याने पुष्कळ वर्षे आपल्याजवळ जपून ठेविली होती त्या दिवशीं त्याने तिला मुद्दाम धार लाविली होती. वास्तविक तो त्या वेळी म्हसोबाच्या देवळात एका मांत्रिकास घेऊन जाणार होता. पण मध्येंच चिमाने काम सांगितल्यामुळे त्याला शेटजीच्या घरी जावे लागलें. म्हसोबाकडे जाताना वाटेत कोणी हटकले, तर अपशकून होतो, अशी तेथील लोकाची समजूत होती, म्हणून तो चिमावर संतापला तर होताच, शिवाय त्याच्या मनालाही चागला धक्का बसला होता.

चिमानेंही म्हसोबास कौल लावून आपल्या कामास दुसऱ्या दिवसाची सकाळ पसंत केली होती. तें काम म्हणजे श्रीपतीच्या जमिनीचा ताबा घेण्याचे होय. पाटलाच्या अनुमतीने श्रीपतीच्या जामिनीचे खरेदीखत बच्चाच्या नावाने शेटजींनी करून दिले होतें. कागदोपत्रीं ज्या नोंदी करावयाच्या त्याही पाटलानीं उरकून घेतल्या होत्या. श्रीपती नेहमीं राम-गुफेत असल्यामुळे त्याच्या कानावर ह्यापैकीं कांहीही गेलें नव्हतें.

पाऊस पडल्यामुळे आता एक दोन दिवसात पेरणीची घाई उसळणार होती. श्रीपतीच्या जमिनीची पेरणी त्याने अडथळा केला तरी त्यास न जुमानता दाडगाईने करावी, अशी योजना ठरली होती. राधाबाईचे मन श्रीपतीविषयीं जितकें कलुषित करता येईल, तितके चिमानें करून ठेविलें होतें. श्रीपतीची जमीन बच्चाच्या प्रत्यक्ष पदरात पडली, म्हणजे सखाराम आपल्या विचारास सहज संमति देईल, अशी तिची ठाम समजूत होती.

त्यामुळें उद्याचा दिवस तिला फार महत्वाचा वाटत होता. शेटजीनी श्रीपतीची जमीन विकली आहे असे ती राधाबाईजवळ आज बोलूनही आली होती. पाटलाची मदत तिला होतीच, परंतु त्याचा पक्का रुकार घ्यावा म्हणून तिनें त्याना बोलविले होते.

बचाबरोबर पाटील शेटजीच्या घरून निघाले ते चिमाकडे आले. श्रीपतीची जमीन दुसऱ्या दिवशींच पेरावी असा म्हसोबानें कौल दिला आहे, असें तिनें त्याना हसतमुखानें सांगितले. हे ऐकून पाटील जरा विचारात पडले. त्याच्या मुलाच्या गळयात तोळा दोन तोळ्याची सोन्याची सरी चिमानें आजच घातली होती. शिवाय तिच्या विचाराप्रमाणें त्यावेळीं वागल्यास आपल्या मार्गातील श्रीपतीचा काटाही आपोआप निघेल, हेही त्याना पटत होते. मुंबईच्या मडळीना कायदेशीर हरकत घेता येणार नाहीं, शिवाय आपल्याजवळ इतकें माणूसबळ आहे कीं, त्यापुढे कोणाचे काहीं चालणार नाहीं, असा विचार केल्यानंतर चिमाच्या म्हणण्यास ताबडतोब होकार द्यावा असे त्याना वाटू लागले.

इतक्यात मोटारीचे हॉर्न वाजूं लागलें. पाहुणे मडळी परत निघाल्याची ती खूण होती. पाटील तिकडे जाण्याकरिता निघाले त्या वेळीं ते चिमास म्हणाले,

"उद्या देऊं उडवून बार, चिमा! पण मी एकदा शेटजींना विचारतो."

शेटजींच्या दारापुढें पाटील आले. पाहुणे निघालेच होते. जिजाबरोबर विमल बोलत उभी होती. त्या वेळीं विमल म्हणाली,

"मला नव्हत वाटलं भर सभेंत तुम्ही इतकं छान बोलाल असं!"

"आपण माझी स्तुति करता, ह्यात आपल्याच मनाचा मोठेपणा दिसतो, बाईसाहेब!" जिजानें हसतहसतच उत्तर दिले. "कसं झालं तरी आम्ही खेड्यातीलच ना!"

"हो, तर!" विमल म्हणाली. "रत्नांची खाण दऱ्याखोऱ्यात सापडते म्हणतात, बाई! तुम्ही उभयता तेजस्वी रत्नें आहात, कोठेंही चमकालच."

विमल मनःपूर्वक बोलत होती. तिने श्रीपतीची केलेली ही स्तुति ऐकून जिजाच्या मनात आनंदाने गुदगुदल्या होऊं लागल्या. त्याच वेळीं तिची नजर त्याच्याकडे गेली. त्याच्या मुखावरील हास्य पाहून तिला समाधान वाटलें. इतक्यात मंडळी मोटारींत चढली. विमलने जिजाचा हात धरून तिला आग्रहाने आपल्याजवळ बसविले. अरविंदाला त्यामुळें बरे वाटले. त्यानेंही श्रीपतीस अशा रितीनें बसविले कीं, जिजा व श्रीपती एकमेका-जवळ यावीं. ताबडतोब मोटार सुरू झाली. त्या वेळीं अरविंद विमलकडे पाहत म्हणाला,

“ जिजाताई, तुझ्या लग्नाच्या वरातीची मिरवणूक ह्याच मोटारींतून काढावयाची बरं का ! विमल तुझी पाठराखीण आणि आम्ही सगळे पाहुणे !”

इतक्यात जिजाचे घर आलें. ती मोटारींतून खालीं उतरली. श्रीपती रामगुंफेकडे जाण्याकरिता मोटारीतच बसून राहिला. त्याला अरविंद म्हणाला,

श्रीपती, ताईला तिच्या वडिलाकडे नेऊन पोचविणार रे कोण ! जावया-नेच मुलीला पोचविली म्हणजे नाहीं का वाटणार त्याना आनंद ! ”

सर्व जण हसूं लागले. श्रीपतीही खालीं उतरला. मोटार पुन्हा चालूं लागणार इतक्यात जिजा म्हणाली,

“ ताईसाहेबाना घेऊन या ना एकदा, दादा, गरिबाच्या झोपडींत ! भिल्लीणीचीं बोरं रामाबरोबर सीतादेवींनी चाखलीं नसतीं का ! ”

अरविंदास तिच्या बोलण्याचे कौतुक वाटले. सर्वांना तिच्या आगऱ्या गुणाबद्दल आदर बाटला. पण वेळ फार झाल्याने मोटार चालविण्याचा इशारा अरविंदाने दिला.

मोटार पुढे चालू झाली व जिजा व श्रीपती याची जोडी आनंदित मनाने घराकडे वळली.

सखाराम व राधाबाई याना घर सोडून बाहेर पडण्याची ताकद नव्हती. तीं जिजाची मार्गप्रतिक्षा करीत होतीं. घरीं आल्यावर त्या दोघानींही गावात घडलेल्या गोष्टी त्याना सागितल्या. त्यामुळें तिच्या शहाणपणाचा

आनंद सखारामाला फार वाटला. श्रीपतीनें मिळालेली बक्षिसाची रक्कम व पोशाक सखारामापुढें ठेविला. त्यामुळें त्याच्याविषयीं त्याला कौतुक वाटलें. त्यासरशीं उल्हासानें तो म्हणाला,

" सिरपती, तूं हैस तसा शाना ! चागलं सीक ! पन धंद्याची हेलसाड करूं नगस बरं ! दोनी जिमिनी तुज्याच हैती ! मंग तुमा दोगाच्या पोटाला र काय कमी है ! "

सखारामाच्या ह्या बोलण्यानें त्याच्या मनातील हेतु बाहेर पडला. त्यामुळें श्रीपती व जिजा ह्याना परमावधीचा आनंद वाटला. श्रीपतीने एकवार जिजाकडे पाहिले. त्या वेळीं ती तोंडातल्या तोंडात हसली. त्यामुळे त्याला उत्तेजन मिळून तो म्हणाला,

"बाबा, तुम्ही माझे वडीलच आहात. तुमच्या उपदेशाप्रमाणें मी वागेन. आतापर्यंत मला घरची ओढ तितकीशी नव्हती. पुढ मात्र तसं वागून चालायच नाहीं. मला वळणावर आणणारी जिजाच. तेव्हा तुमच्या पायाशपथ सागतो आम्ही दोघे लक्ष देऊन आपला धदा करू व आनंदात राहूं."

श्रीपतीच्या आताच्या बोलण्याचा विचार राधाबाई आपल्याशींच करीत होती. तिने एकवार श्रीपतीकडे व नंतर जिजाकडे पाहिले. त्या उभयताच्या रूपाचा त्यानीं विचार केला. नतर श्रीपतीची हुशारी व धारिष्ट ह्या गोष्टी त्याच्या डोळ्यापुढे आल्या; यामुळे चिमाने त्याच्या मनात पेरलेलें किल्मिष नाहीसे होऊं लागलें. त्यानंतर बच्चाची मूर्ति त्याच्या डोळ्यासमोर आली. त्याचा कुरूप चेहरा, आडदाड स्वभाव, वगैरे गोष्टी त्याच्या डोळ्यापुढें उभ्या राहिल्याबरोबर ती मूर्ति नजरेपुढेंही नसावी, असे त्याना वाटले.

ह्या वेळीं सर्वांचें लक्ष तिच्याकडे लागले होतें. सखाराम ज्या उत्तराची अपेक्षा करीत होता, तें तिच्या तोंडून केव्हा येतें ह्याविषयीं तो अधीर झाला होता; तिच्या तोंडातून चटकन् शब्द निघाला नाहीं, म्हणून तो पुन्हा म्हणाला, "ए, ऐकलंस का ! माजं म्हनन तुला पटतया ना ! बोलूनशानी टाक म्हंजे माजा जीव खालीं पडल ! "

पतीच्या तोंडून हे शब्द निघाल्याबरोबर त्या साध्वीची नजर त्याच्या-कडे गेली. तिचे नेत्र भरून आले. कठ सद्गदित झाला, व ती घोगऱ्या आवाजात म्हणाली,

“ मीं कदीं इकडच्या मनाबाहेर है का ! रामानं उदंड आउक्ष द्यावं या दोघाना. ”

त्यावेळीं जिजाला परमानंद झाला. श्रीपतीचें अतःकरण भरून आलें. त्याला आपल्या आईची आठवण झाली. ती दिवंगत झाल्यापासून राधा-बाईनें त्याचा साभाळ केला होता. आताच्या तिच्या दृष्टींत त्याला मूर्ति-मंत मातृप्रेम दिसलें. लगेंच तो उठला. त्यानें राधाबाईच्या पायावर मस्तक ठेविलें. त्यानीं त्याच्या पाठीवरून हात फिरविला, व आशीर्वाद दिला. नंतर सखारामाच्या पायावरही त्यानें डोके ठेविलें. तेव्हा त्यानेंही त्याला आशीर्वाद दिला.

त्याच्या ह्या सहज झालेल्या कृतीचा परिणाम जिजाच्या मनावर विलक्षण झाला. तिनेंही आईबापाना नमस्कार केला. नंतर ती आई-जवळ जाऊन बसली. तिच्या आईनें तिच्या गळ्यात हात टाकला.

पुढें काहीं वेळ स्तब्धतेत गेला, नतर चिमानें सागितलेलें राधाबाईस आठवलें, व ती सहज आपल्या पतीस म्हणाली,

“ व्हय वो, चिमा म्हनत व्हती, सिरिपतिचं श्यात शेटजीनं इकलया म्हनून ! ”

“ असं कुठं झालया का ! शिरप्याच श्यात शेटजी कसा इकील ! ” सखाराम पत्नीच्या समजुतीकरिता म्हणाला.

त्यावेळीं जिजाला पुन्हा काळजी उत्पन्न झाली. शेटजी तसें करण्यास कमी करणार नाहींत, श्रीपतीनें दस्तऐवजावर केलेली आगठ्याची निशाणी त्याला गोत्यात पाडणार असें तिला वाटूं लागलें. पण त्या वेळीं श्रीपतीच धीरानें म्हणाला,

“ बाबा, काहीं झालं तरी त्याची काळजी करूं नका तुम्ही. माझ दंड

मजबूत आहेत, आमच्या दोघांचं पोट भरायला. ह्या जिवांत जीव आहे तोंपर्यंत वाटेल ते चार धंदे करीन व पोट भरीन. जिजाला अगदीं मुळा त्रास पडूं देणार नाहीं मी!"

श्रीपतीच्या ह्या बोलण्याचा परिणाम सर्वांवर चांगला झाला. तोही सखारामाची परवानगी घेऊन तेथून आपल्या निजण्याच्या जागेकडे गेला.

त्यानंतर जिजा आईला चिकटून निजली. तीही तिच्या पाठीवरून हात फिरवीत व नतर तिला झोप लागेपर्यंत लहान मुलाप्रमाणें थोपटीत होती.

काय असेल ते असो, यक्षिणीने कांडी फिरविल्याप्रमाणे, त्या वेळेपासून श्रीपतीला नवचैतन्य प्राप्त झालें. तो भल्या पाहाटेस उठला. जनावरांचा शेणगोठा करून त्यानें राजणांत पाणी भरलें. आंघोळ करून तालीम उरकली. शेतीचीं औतें शोधून तीं त्यानें बाहेर काढलीं. पेरण्याच्या कुरीची कोठें मोडतोड झाली आहे कीं काय, हे त्यानें तपासले, व ती अगदीं उजाडल्याबरोबर सुताराकडे नेऊन प्रथम आपले काम त्याच्याकडून करवून घ्यावें, असेंही त्याने ठरविलें.

पाहाट झाल्याबरोबर सखारामाने भाविकपणे रामनामाचा जप सुरू केला. श्रीपतीची बाहेरची हालचाल त्याच्या कानावर येत होती, त्यामुळें त्याला समाधान वाटून तो मनःपूर्वक देवाला आळवूं लागला.

जिजाही जागी झाली. ती उठण्याची घाई करीत होती, परंतु तिची आई तिला उठूं देत नव्हती. आज राधाबाईला ती आपल्याजवळून हलूं नये, असेंच वाटत होतें. तिचे मातृप्रेम उचंबळून आलें होतें.

काय असेल तें असो, सृष्टिदेवता मात्र त्या वेळीं प्रसन्न दिसत नव्हती. पाहाटेच्या वेळीं पूर्वदिशेचे मुख प्रफुल्लित दिसूं लागून सर्वत्र आनंदी-आनंद पसरावयाचा; पण त्या दिवशीं धूसर वर्णाच्या मेघपंक्तींनीं त्या दिशेचे मुखकमल ग्रासून टाकले होतें. रात्रीं झिम झिम पडलेल्या पावसानें सर्व वनस्पति ओल्या चिंब झालेल्या होत्या व त्यांच्या पानावरून ओघळणाऱ्या जलबिंदूंच्या रूपाने त्या अश्रु गाळीत असल्याचा भास होत होता!

त्या वेळीं लंगड्या गोप्यानें घाईघाईनें सखारामाच्या आवारांत पाय टाकला. आपणास कोणी पाहील कीं काय, या भितीनें तो आजूबाजूस नजर टाकीत होता. त्यानें ‘ सिरिपती दादा ’ अशी हलक्या स्वरात हाक मारली. श्रीपतीनें त्याच्याकडे दृष्टि वळविली व तो ताबडतोब त्याच्याजवळ गेला. गोप्या फार घाबरलेला दिसत होता. श्रीपती त्याला धीर देत म्हणाला,

“ गोप्या, घाबरूं नकोस असा. तुझ्यावर काय संकट आलंय तें साग मला! मी कसल्याही संकटात उडी टाकून तुझा बचाव करीन. बोल, बोल. घाबरू नकोस ! ”

“ सिरिपती दादा ! ” गोप्या चाचरत चाचरत बोलूं लागला, “ संकाट है खरं ! आमासारक्या गरिबावरती देवच कोपलाय, पन तुमासारक्या मानसावरती त्येची किरपा असायला नग का ! ”

गोप्याच्या तोंडून पुढे शब्द निघेना. त्यामुळे श्रीपती अधीर होऊन म्हणाला,

“ बोल रे, गोप्या, काय असेल तें साग. मी कशाला भीत नाहीं. समोर काळ येऊन उभा राहिला, तरी त्याच्याशीं टक्कर देईन मी ! ”

गोप्यानें हळू हळू हकिकत सागण्यास सुरुवात केली. ती ऐकत असतां श्रीपती लाल झाला. तो दातओठ चावू लागला. शेवटीं गोप्या म्हणाला,

“ दादा, साबाळों आपल्या जीवाला ! बच्चानं फरशी मंतार मारून घेतली है ! तुमी सावद असा ! जातु मी आता ! जोहार मायबाप ! ”

गोप्या ताबडतोब निघून गेला.



## प्रकरण तेविसावें.

# सर्वत्र हाहाकार !



श्रीपती जर आडवा आला, तर त्याचा चेदामेंदा करून टाकण्याची इशारत पाटलांनीं बच्चाला रात्रीं दिल्याचे गोप्यानें आडून ऐकिले होते. श्रीपतीचा सूड उगविण्याची त्याची दुष्ट बुद्धि अद्याप नष्ट झाली नव्हती, हें त्याला ठाऊक होते. त्याच्या मनात तर श्रीपतीविषयीं अत्यंत आदर होता, म्हणून त्यानें ती बातमी त्यास देण्याची घाई केली होती.

तो परत जात असता श्रीपतीच्या एका विश्वासू मित्राला त्यानें तुला बोलावलें आहे, असेही सागून ठेविले होतें. एवढा सावधपणा करून तो पाटलाच्या कामावर गेला.

गोप्या निघून गेल्याबरोबर श्रीपती निराळ्याच उद्योगास लागला. त्यानें प्रथम स्वसरक्षणाची तजवीज करण्याचे ठरविलें. आपली लाठी शाबूद आहे कीं कसे, हे त्याने ती दोन तीन वेळा वाकवून पाहिलें. नंतर आपलीही फरशी त्यानें शोधून काढली, व तो मागील बाजूच्या आब्याच्या झाडाखालीं तिला धार लावीत बसला.

आता चक्क उजाडलें होते. दिनराज आपल्यावरील ढगाच्या आवरणातून मधून मधून सर्व चराचर सृष्टीवर दृष्टिक्षेप करूं लागला होता.

जिजाई उठली व ती श्रीपती कोठें आहे हें पाहू लागली. जवळपास तो दिसेना, त्यामुळें तो रामगुफेकडे गेला असावा, असे प्रथम तिला वाटलें. ती आपल्या उद्योगास लागली. त्या वेळीं ती अत्यंत आनंदात असून आपलीं कामें झपाझप उरकीत होती.

इतक्यात तिची नजर मागील बाजूच्या आम्रवृक्षाकडे गेली. त्या

ठिकाणीं श्रीपती बसला आहे, हे तिला दिसलें. ती जागा तिला अत्यंत पवित्र वाटत होती; कारण त्या ठिकाणींच तीं उभयता मनानें एकरूप झालीं होतीं.

ती हसत हसत तिकडे गेली. श्रीपती धार लावण्याच्या कामात दंग होऊन गेला होता. ती अगदी जवळ येईपर्यंत तिची चाहूल त्याला कळली नव्हती, इतका तो आपल्या कामात गर्क होऊन गेला होता. तिनें चुटकी वाजवताच त्याने वर पाहिलें. तिला पाहिल्याबरोबर त्याने मंद-स्मित केलें. त्या क्षणीं ती म्हणाली,

" आज कसल्या कामात दंग होऊन गेलेत, बाई, पाटील ! एका बाजूला बसून काय करीत आहेत हे ! आज काय झाडबीड तोडायचं आहे कीं काय ! "

श्रीपतीनें तिला पुढें बोलूं दिलें नाहीं. त्यानें तिचा हात पकडला व तो म्हणाला,

" बैस इथं. सागतों सगळं. तुझीच मी वाट पाहात आहें केव्हापासून ! मी केव्हा कामाला लागलोंय ठाऊक आहे का ! "

श्रीपती तिच्याकडे पाहून हसूं लागला. आपला हात सोडवून घेत असता ती लाडिकवाण्या स्वरात म्हणाली,

" असं करूं नये बरं का ! कोणीं पाहिलं तर काय म्हणतील ! पण तुम्हीं आज चालवलंय काय, हें सागा बरं मला आधीं ! "

" तेंच सांगायचं आहे ना तुला ! "

श्रीपती जोरानें म्हणाला.

त्या वेळीं आकाशातून घारींचा थवा चालला होता. दोघानीं वर पाहिलें. इतक्यात त्या कोठें तरी झडप घालण्याकरिता खालीं उतरल्या.

श्रीपतीनें एक सुस्कारा टाकला व गोप्यानें सागितलेली हकिकत तो तिला सागूं लागला. ती ऐकत असता तिला भीति वाटूं लागली. तो आपल्या फरशीस कां धार लावीत आहे, हें तिच्या लक्षात आल्याबरोबर

तिच्या अंगावर शहारे आले !

सर्व हकिकत ऐकल्यावर जिजा दुःखपूर्ण स्वरात म्हणाली,

" शेटजीन तुझ्याकडूनच खरेदीपत्र लिहून घेतलं हें खचित. आतां दांडगाईनं जमिनीचा ताबा घेणार आहेत ते ! मला वाटलं नव्हतं, आजच वेळ अशी येईल असं ! हा सगळा तुझ्या निशाणी आगठ्याचाच प्रताप हं ! जर लिहावाचायला येतं, तर शेटजी तुला कसा फसविता ? "

" तोडून टाकूं हा आगठा ?" श्रीपती फरशी उचलून संतापानें म्हणाला, " मला संताप आलाय त्याचा. ह्या आंगठ्याला व त्या लुच्च्यालाही चांगला हात आताच दाखवूं का मी ? "

श्रीपती अत्यंत क्रुद्ध झाला. त्याचा आविर्भाव पाहून जिजाला अत्यंत भीति वाटली.

" श्रीपती, " तिनें त्याचा हात धरून म्हटलें, " असा अविचार करा-यचा नाहीं मुळीं हं ! जमिनीचा ताबा घेण्याला लोक आले, तर त्याना खुशाल हरकत कर. पण अविचार मात्र होऊं द्यायचा नाहीं बरं का ? मी आतांच दादाना कळवितें सगळी हकिकत. ते सागतील तस वागा-यचं आपण—"

" जिजा, " श्रीपतीच्या चरफडलेल्या मनातील शब्द बाहेर पडूं लागले, " उगाच आपली जमीन दुसऱ्यान घ्यायची, हें बघवल का माझ्या डोळ्याना ? माझ्या दंडातला जोर उगा बसल का अशा वेळीं ? जमीन म्हणजे आपला जीव कीं प्राण. ही दुसऱ्यानं फुकटाफुकटी घ्यायची म्हणजे आपला प्राणच न्यायचा नव्हे का ? "

श्रीपतीचे डोळे लाल झाले. त्याच्या तोंडातून पुढें शब्द निघेना.

" श्रीपती, " अत्यंत प्रेमळ स्वरात जिजा म्हणाली, " माझं तूं ऐकणार ना ? माझ्याकरिता वाटेल तें करीन, असं म्हणत असतोस ना ? मग मी सांगतें तसं वागलं पाहिजे तुला. "

" जिजा, " श्रीपती बोलूं लागला, " तुझ्या शब्दाबाहेर आतां वागा-

यला यायचं नाहीं मला. साग ! साग ! काय करूं मी ते ! "

" मग एवढंच सागतें, " जिजा म्हणाली, " आणि ते तुला ऐकिलंच पाहिजे. तुझ्या अंगावरच हात टाकल्याशिवाय तूं कोणावर चालून जाऊं नकोस, हें तर ऐकशील ना ? माझ्या गळ्याची शपथ आहे तुला ! "

तिच्या डोळ्यात अश्रु उभे राहिले. श्रीपतीचा हात धरलेला तिचा हात थरथरूं लागला.

त्या वेळीं श्रीपतीच्या तोंडून " हं " एवढाच उद्गार बाहेर पडला व तीं दोघें एकमेकाकडे अनिमिष नेत्रानीं पाहू लागलीं. त्या दोघांच्या अंतःकरणात कालवाकालव चालली होती.

इतक्यात श्रीपतीचा मित्र त्या आवारात शिरला व त्याला हाका मारूं लागला. त्या वेळीं तिला तेथून पाय काढणें भाग पडलें.

त्याच वेळीं रामगुंफेंत मंडळी बोलत बसली होती. लोकाच्या निरक्षरपणामुळें सामाजिक, धार्मिक किंवा कसलीही चळवळ एकसारखी चालविणें किती कठिण आहे व नुसती निरक्षरता घालवावयाची म्हटलें, तरी त्याला उच्च विचाराच्या त्यागी कार्यकर्त्यांची कशी जरुरी आहे, हें अरविंद विशद करीत होता.

थोड्या वेळाने तेथें एक तरुण घाईघाईने आला. त्यानें एक पत्र अरविंदाजवळ दिलें, आणि तो तातडीनें परत निघूनही गेला. तें पत्र वाचून अरविंद अस्वस्थ झाला. त्या वेळीं विमल त्याला म्हणाली,

" तूं इतका काळजींत पडलेला दिसतोस, अरविंद ? तर असं आहे तरी काय त्या पत्रात ? "

" विमल, " अरविंद म्हणाला, "तूंच वाच ना पत्र हें, म्हणजे निरक्षरपणाचा परिणाम खेड्यापाड्यात कोणत्या थराला पोहोंचतो, हे तरी तुला कळेल ! "

तिनें ती चिठ्ठी वाचली. तींतील मजकुरानें तिला नवल वाटलें. तो मजकूर सर्वांनाच कळावा म्हणून तिनें ती मोठ्यानें वाचून दाखविली.

" प्रिय बंधु अरविंददादा यास—

कृ. सा. न. वि. वि. आज सकाळपासून मी मोठ्या काळजींत पडलें आहें. श्रीपतीचे शेत बच्चाच्या नावानें शेटजींनीं खरेदी दिल्याचें कळतें. खरेदीपत्र होऊन आठ दिवस झालेले असावेत. परंतु त्याचा आम्हांला सुगावाच लागला नाहीं. आज शेताचा ताबा घेण्याकरिता लोक जमा होणार आहेत. श्रीपती कसा आहे, हें तुम्हाला ठाऊक आहेच. अशा वेळीं त्वेषाच्या भरात त्याच्या हातून अत्याचारही होण्याचा संभव आहे.

काल रात्रीं आमच्या विचारास वडील-मातुश्रींनीही समति दिली, व आजच हे संकट दत्त म्हणून पुढें उभे ! मला तर काहीं सुचत नाहीं व मला येथून हलवत नाहीं. न जाणों, श्रीपतीच्या हातून काय होईल हें सागता येत नाहीं. तरी त्याने आपले मन अद्याप पुष्कळ आवरलें आहे. नाहीं तर, ह्या वेळेला काहीं निराळीच वार्ता आपल्या कानावर येती !

दादा, द्रौपदीचा पाठीराखा बधु श्रीकृष्ण तिच्या हाकेस 'ओ' देऊन तिचें संकट निवारण करी ना ! मग मी तसाच धावा करतें तुमचा. ह्या तुमच्या भगिनीच्या संकटकालीं असाल तसे धाऊन या. माझा आतापर्यंत कितीतरी त्रास झाला तुम्हाला. पण आतांची वेळ फारच कठिण दिसते. कुणाचा घातपात न होवो, हीच देवाच्या चरणीं माझी मागणी !

आपली नम्र भगिनी

जिजा. "

पत्रातील मजकूर ऐकल्यावर भय्यासाहेब व मधुकर ह्याना आश्चर्य वाटलें. अरविंदाची निघण्याची तयारी चालू झाली. त्या वेळीं मधुकर म्हणाला,

" थाब अरविंद, आम्हीही येतों तुझ्याबरोबर. पण शेटजी श्रीपतीचें शेत बच्चास खरेदी देतो, ह्याचा अर्थ काय रे ! शेत श्रीपतीचें व खरेदी देणार शेटजी ! और न्याय दिसतो ! काय खुळे लोक आहेत हे ! कायद्याचा आश्रय घेतला कीं झालें काम ! "

" मधुकर, " अरविंद म्हणाला, " असल्या खेडयांत, 'बळी तो कान

पिळी, ' असला कायदा असतो. श्रीपतीने शेटजींना आपल्या जमिनीचें खरेदीपत्र लिहून दिलें, ह्याची जाणीव आहे कुठं त्याला ! भोळा बिचारा कागदावर निशाणी आंगठा उठवून आला; व त्याचा फायदा शेटजी घेतो आहे."

"पण मी म्हणतों तेंच पटेल आता तुम्हाला," भय्यासाहेब अभिमानानें म्हणाले, "ह्यावर एकच उपाय. भांडवलशाही जमीनदोस्त करण्याचा !"

"हं थाबा," अरविंद भय्यासाहेबाकडे रोखून पाहून म्हणाला, "असले हवेंतील किल्ले बाधून प्रत्यक्ष व्यवहार करता येत नाहीं, भय्यासाहेब ! लोकाच्या अज्ञानाचा, निरक्षरपणाचा, गैरवाजवी फायदा स्वार्थी लोक घेतात, म्हणून तीं कारणं नाहींशीं करण्याचा प्रथम यत्न करा. ज्या गोष्टी आज आपल्या हातातील नाहींत, ज्या गोष्टी आपल्या आजच्या स्थितीला बरोबर लागू पडतील किंवा नाहींत, ह्याचा संशय वाटतो, ज्या बहुजनसमाजाला त्याच्या अज्ञानामुळं समजूं शकत नाहींत, अशा गोष्टींची वटवट करून सध्याचा प्रश्न सुटेल, असं का वाटतं तुम्हाला ! "

अरविंद बोलत असता भय्यासाहेब त्याच्या तोंडाकडे नुसते बघत राहिले. त्याचा तो आवेश पाहून मधुकराला त्याच्याविषयीं फार कौतुक वाटलें व तो म्हणाला,

" अरविंद, श्रीपतीवर ही आपत्तिच ओढवलेली आहे. त्यानें तुझी काय पण आमचीही सेवाचाकरी पुष्कळ केलेली आहे. तेव्हा मी म्हणतों, त्याचं देणंच देऊन टाकतों मी. कशाला कटकट वाढायला पाहिजे ही ! शेटजी, पाटील वगैरे चार चौघाना बोलवून आणूं आणि करू तडजोड !"

" मधुकर, " अरविंद शातपणें बोलूं लागला, " तडजोड होण्याची वेळ नाहीं ही. ह्यांत अनेक गुंतागुंती आहेत. तो बच्चा उलटया काळजाचा आहे, हें शेटजींनीं काल सागितलेलं तुझ्या ध्यानात आहे का ! मलाही त्याचा अनुभव आहे थोडा. चला, उगाच वेळ घालवून उपयोगाचा नाहीं. श्रीपतीला साभाळलं पाहिजे. तो शूर आहे, धैर्यशील आहे, सर्व खरं, पण ह्या सर्व गुणाचा अनाठायीं व्यय होऊं नये, असं मला वाटतं."

" काल तो हातात कुऱ्हाड घेऊन आलेला बच्चा मला तर राक्षसा-सारखाच वाटला ! " विमल घाबरट स्वरांत म्हणाली.

ह्यापुढें भय्यासाहेब बोलूं लागणार, तोंच अरविंद गडबडीने उठलाच. भय्यासाहेबाना तिकडे जाणें नकोसें वाटत होतें, पण सर्वच निघाल्यामुळें त्यानाही निघणें भाग पडलें.

जाता जाता अरविंद मनातल्या मनात म्हणत होता, " बोलण्यात वेळ घालविल्यानं आपण चूकच केली. जिजाची चिठ्ठी पोहोंचताक्षणींच आपण निघावयास पाहिजे होतं. "

निम्या अधिक मार्गावर त्याची मोटार आली. त्या वेळीं त्याना श्रीपतीच्या शेतात जमलेला जमाव दिसूं लागला. इतक्यांत ते त्या ठिकाणीं येऊन पोहोंचलेच. अरविंद झटकन पुढें चालू लागला. हातात काठ्या घेतलेल्या जमावास पाहून मधुकराला अरविंदाची काळजी वाटूं लागली. ताही त्याच्या मागोमाग गेला. भय्यासाहेब मोटारींतून उतरण्यास कांकूं करीत होते. परतु विमल पुढें गेल्यानें तेही मधुकराबरोबर तिकडे चालले.

बचा व त्याच्या बाजूचे लोक पेरण्याची तयारी करून आलेले होते. पाटील त्याच्या मागील बाजूस उभे होते. चिमा तेथे जवळच होती. शेटजींनीं पाटलाना, 'मी येतों, पुढें चला,' असें सागितलें होतें. परंतु ते अद्याप आलेच नव्हते. इतकेंच नव्हे, तर त्याचा तिकडे जाण्याचा मुळीं विचारच नव्हता !

श्रीपती व त्याची पाच सात मित्र मंडळी हातात काठ्या घेऊन सज्ज होती. श्रीपती पेरण्याच्या औतापुढें उभा होता. तो म्हणाला,

" माझं शेत आहे हें ! मी पेरूं देणार नाहीं तुम्हांला ! "

"अरं, सिरप्या, " चिमा ओरडली, " ओंजळी भरूनशान पैसा ओतलाया कीर शेटजींच्या पदरांत, आन खरेदीचा कागूद करून घेतलाया मीं ! उगा आडवूं नगस आमाला ! "

" कुठं आहे तो शेटजी !" श्रीपती संतापानें म्हणाला. " त्याला अस

पुढ आण. माझं शेत विकतोय कसा मला विचारल्याविना—"

"कायद्याप्रमाणं वागलं पाहिजे तुला," ठकोजी सभावितपणें म्हणाला. "तूं आपलं शेत शेटजीला खरेदी दिलंस, आम्ही तें त्याच्याकडून खरेदी घेतलं. पाटलाना विचार खरं कीं खोटं ! उगाच अडवूं नकोस आम्हाला. पायांत बेड्या पडतील श्रीपती तुझ्या, ह्याचा चागला विचार कर ! "

"माझ्या जमिनींत पाय घालता तुम्ही ! आणि माझ्याच पायात बेडया पडतील म्हणतां !" श्रीपती आवेशानें बोलूं लागला, "पडू द्या ! काय होईल तें होऊं द्या ! हा शिरप्या जिवंत आहे, तोंपर्यंत तुम्हाला पाय टाकूं देणार नाहीं आपल्या शेतात ! "

इतक्यात अरविंद व मधुकर तेथे आले. ते आल्यावर पाटील थोडे चपापले. पण पुढे त्यानीं मनाचा पक्का निश्चय केला. त्याच संधीस मधुकर त्याना म्हणाला,

"पाटील, तंटा वाढविता कशाला ? शेटजींना घेऊन या. आपण तडजोड करूं. "

"साहेब," पाटील म्हणाले, "गावचा तिढा समजणार नाहीं, तुम्हाला. शेटजी तरी येतोय कुठं लवकर ! लुच्चा कुठला ! आम्हाला तोंडीं देऊन आपण नामानिराळा ! "

इकडे असें सभ्यपणानें पाटील बोलत होते व मागील बाजूच्या लोकाना मार्गे पाहून नजरेनें इषारा देत होते. त्यामुळें दंगल माजूं लागली. बचाच्या बाजूचे लोक काठ्या सरसावून पुढें पुढें येऊं लागले. त्या वेळीं श्रीपती व त्याचे मित्र अत्यत क्रुद्ध झाले. अरविंद त्याना, 'शात राहा, शांत राहा,' असें सागत होता. तो श्रीपतीच्या पुढेंच जाऊन उभा राहिला. म्हणून ती मंडळी थोडी थबकली. इतक्यात पाटीलच जोरानें म्हणाले,

"शिरप्या, दंगल माजवूं नको. कायद्यानं कोर्टात जा पाहिजे तर ! मी पोलीस पाटील तुला सागतों आहें. आता पोलीसही येतील बघ. "

पाटील बोलत असता दंगल जास्तच माजली. काठ्याची खणाखणी

सुरू झाली. अरविंद मध्येंच उभा होता. त्यामुळें श्रीपतीला त्याच्या संरक्षणार्थ, त्याच्या मागें उभें राहणें भाग पडलें. मधुकराची धारण पांचावर बसली. तो घाबरला. इकडे विमलचा जीव खालीं वर होऊं लागला.

अरविंद वर हात करून 'शांत राहा' म्हणतच होता. त्याच्या बोटावरही काठीचे तडाखे बसले. इतक्यात आपली फरशी सरसावून बच्चा पुढें धावला. त्याचा रोख श्रीपतीवर होता. परंतु मध्येच अरविंद असल्याने त्याच्यावरच तो वार होणार, हें पाहताक्षणींच मधुकराच्या डोळ्यास अंधेरी आली. तो मटकन खालीं बसला. जिजा ' दुष्टा ' म्हणत पुढें धावली.

पण अगदीं त्याच क्षणीं श्रीपतीनें आपल्या काठीचा एक जोरदार रट्टा बच्चाच्या हातावर लगावून त्याच्या हातातील कुऱ्हाड खालीं पाडली, व त्वेषाच्या भरात श्रीपतीने ती ताबडतोब उचलून बच्चाचा हात तोडला. त्यासरशीं बच्चाही एकदम जमिनीवर आदळला !

सर्वत्र हाहाकार उडाला !



## प्रकरण चोविसावें

# अनपेक्षित ताटातूट !

बच्चा खाली पडल्याबरोबर त्याच्या बाजूची भाडोत्री मंडळी एक एक पाय मागें घेऊं लागली. श्रीपती बेफाम झाला होता. त्यांच्या हातात फरशी पाहून पाटीलही दूर पळाले. चिमा मात्र आक्रोश करीत बच्च्याजवळ आली. त्याच्या तुटलेल्या हातातून रक्ताच्या चिळकाड्या उडत होत्या. तरीही तो उठण्याचा प्रयत्न करीतच होता. अरविंदाचा डावा हात दुखा-वला असला, तरी प्रथम त्याने श्रीपतीच्या हातची ती फरशी धरली व त्यानेंही ती निमूटपणे अरविंदाच्या स्वाधीन केली.

इतक्यात मधुकर व जिजा हीं अरविंदाजवळ आलीं; थोड्या वेळात विमलही आली. त्याच्या मागून भीतभीत भय्यासाहेब आले.

मधुकराने प्रथम अरविंदास कोठे लागले कीं काय, याचा तपास सुरू केला. विमल जास्त बारकाईने त्याचा हात पाहूं लागली. त्याचे मनगट दुखावले होते. बोटातून थोडें थोडे रक्तही वाहात होतें.

रायबा अत्यत घाबरला होता. बच्चाचा हात तुटला असला, तरी त्याच्या मुखावर अद्याप त्वेषाचे वारें खेळत होते. त्याच्याजवळ जाऊन प्रथम काय करावे, हें दुसऱ्या कोणास सुचत नव्हतें. इतक्यात तशाही स्थितींत अरविंद बच्चाकडे गेला. तो जवळ आला, तेव्हा बच्चा अद्वातद्वा बडबडू लागला. त्याला ओल्या शेतातून उचलण्याची तजवीज झटकन् त्याने श्रीपतीचा मित्राकडूनच करविली. अगदीं जवळ अशी काय ती सखारामाचीच झोंपडी होती. तेव्हा तिकडेच त्याला नेलें. पाटलाच्या मंडळीं-पैकीं गोप्या तेवढा तिकडे आला होता.

विमलनें चटकन् अरविंदाची जखम बाधली. नंतर ती बच्चाचा हात

बाधण्यास अरविंदास मदत करूं लागली. त्या वेळीं बच्चा ज्यास्त जास्तच बरळूं लागला. त्याच्या बरळण्यात संतापानें पुढील शब्द निघत होते,

" ह्या फरसीनंच माजा जीव घेतलाया! मागं ती म्या मंतार मारूनशान घेतली व्हती! पन तवा सिरप्या सुटला, आन गोप्याचा पाय तुटला! आताबी मंतारली, पन सिरप्या सुटला, आन माजाच हात तुटला! मंतार घालनाराच्या नरडीचा आता घ्वाट घेतु बगा! आन बळयाला बी दावतु माजा इंगा! आयाऽऽऽयऽग अयाऽऽऽई..."

मधुकर, भय्यासाहेब, वगैरेना ह्या बरळण्याचे आश्चर्य वाटत होतें. ते शब्द त्याच्या तोंडातून मोठमोठ्यानें बाहेर पडत होते. काठी टेकीत टेकीत जवळ आलेल्या सखारामाच्या अंतःकरणास ते शब्द भेदीत होते. गोप्या मात्र संतापानें पुटपुटला,

" अगा, करावं तसं भराव. आता का र इवळतुयास! अगा, माजा पाय तोडलास, आन माला जल्माचं लंगडं केलस. फेड आपल पाप आता!"

बच्चाचा हात बाधून झाला, तरी हे बरळणें चालूच होते. रायबाच्या डोळ्यातून एकसारखे अश्रु वाहात होते. जिजा कावरीबावरी झाली होती. सखाराम खिन्न मनानें एका बाजूस खालीं मान घालून बसला होता. राधाबाई अत्यत घाबरली होती. श्रीपती मात्र धीरगंभीरपणे जवळच उभा होता.

मधुकराला त्या एकंदर प्रकाराचा कल्पनातीत त्रास वाटला. पण तशाही स्थितींत बच्चाच्या बरळण्याचे त्याला आश्चर्य वाटत होतें. ती सर्व मंडळी जिजानें एका बाजूस टाकलेल्या घोंगडीवर बसली होती. त्या वेळीं मधुकर अरविंदास म्हणाला,

" असा का रे बच्चा एकसारखा बरळत आहे! तुला काहीं याचा बोध होतो का अरविंद!"

" अरे, कैदेंत असताना सखारामाला शिक्षा का झाली, त्याचा आपण तपास करीत होतों ना! इथं आल्यावरही तूं मला तेंच विचारीत होतास ना! त्याचं खरं कारण त्याच्या बरळण्यात आहे. मलाही हें रहस्य आतांच

कळत आहे, मधुकर !" अरविंद म्हणाला

जवळच उभ्या असलेल्या गोप्यानें ते शब्द ऐकले, व तो म्हणाला,

"दादा, माजा पाय ह्येन तोडला, आन सखारामबाबा फुकटाफुकट कैदमदी पडल ! बगा कसा उलटा न्याव है !"

"चोर सुटतो आणि सन्यासी फाशीं जातो, अशीच गत झाली म्हणावयाची ! तो म्हातारा इथेच आहे ना ?" मधुकर म्हणाला.

सखाराम तेथेच एका बाजूस बसला होता; त्याच्या कानावर ते शब्द गेले, तेव्हा तो आपल्या किलकिल्या डोळ्यानी मधुकराकडे पाहूं लागला. त्या वेळीं अरविंद म्हणाला,

"तो बघ तुझा सखाराम तिथं बसला आहे."

मधुकराने त्याच्याकडे पाहिलें. त्याचा चेहरा अगदीं उतरून गेला होता. त्याची देहयष्टि खंगली होती. डोळे खोल गेले होते. शरिराचा हाडाचा सापळा बनला होता. तुरुंगातील त्याची आनंदी मुद्रा व त्यातल्यात्यात त्याचा तो धडधाकटपणा त्याच्या दृष्टीपुढे आला, व आताची ही त्याची स्थिति पाहून त्याचे अंतःकरण कळवळले. त्याला कैदेंत पडण्याचें कारण हा बच्चाच आहे, असे अरविंदाच्या बोलण्यावरून त्याला कळलें. पण त्याचा त्याला पुरा उलगडा होईना. अशा प्रसंगीं आपली जिज्ञासा दाबून ठेवावी, असे त्याला वाटले. पण सखारामाचे डोळे पाण्यानें डबडबलेले पाहून मधुकराला अगदीं राहवेनाच. म्हणून तो अरविंदास म्हणाला,

"अरविंद, आताची वेळ जास्त चौकशी करण्याची नाहीं, हें खरं. पण बच्चाच्या आततायीपणानं सखाराम कैदेंत का गेला, हें मला अद्याप समजत नाहीं. आणि तुला विचारल्याशिवाय राहवतही नाही."

मधुकराची मनःस्थिति जाणून अरविंद हळूहळू ती हकिकत सांगूं लागला. त्या वेळीं मधुकराला अत्यंत आश्चर्य वाटूं लागलें. सखारामाची तर त्याला अत्यंत कींव आली. अरविंदाला तुरुंगात खेडयांतील काहीं काहीं

गुन्हेगारांविषयीं कळवळा कां वाटत होता, ह्याचें कारण त्याच्या ध्यानांत येऊं लागलें. त्याला त्या खेडयांत आणण्यास सखारामाची परिस्थितिच कारण झाली होती. अरविंद काहीतरी लहरीनें खेडयात जाऊन बसला आहे, असें त्याला पूर्वी वाटत होतें. पण आतां गोरगरिबाविषयीं त्याच्या कळकळीची त्याला खरीखुरी जाणीव झाली. आपण त्याच्या मनाला त्रास होईल, अशीं पत्रें लिहिलीं. पण अद्याप त्याचा मागमूसही लागूं न देता तो आपलें जनसेवेचें काम अव्याहत कसे करीत आहे, ह्याची त्याला कल्पना येऊन अरविंदाच्या त्यागी वृत्तीविषयीं त्याला अत्यंत आदर वाटूं लागला, व तो शेवटीं म्हणाला,

"अरविंद, तूं कारागृहात म्हणत होतास त्यातला बराच भाग खरा आहे म्हणावयाचा! खेडयापाडयात स्वार्थ, लबाडी, अत्याचार, इत्यादि दुर्गुणानीं सज्जनांना नाहक छळण्याकरिता आपलं साम्राज्यच चालविलं आहे म्हणावयाचं!"

"तसंच निव्वळ कसं म्हणता येईल मधुकर!" अरविंद म्हणाला. "परमेश्वरावरील श्रद्धा, धारिष्ट्य, भूतदया, इत्यादि उच्च गुणाचा प्रकर्षही इथ आपणास पाहण्यास मिळत नाहीं का! श्रीपती, जिजा, सखाराम, ह्याच्यासारख्याच्या वर्तनाचा विचार कर म्हणजे मी म्हणतों तें तुला पटेल."

"दादा," विमल रुद्ध स्वरांत म्हणाली, "आजच बघ बरं, बच्चाची ती कुऱ्हाड कुणाच्या डोक्यावर पडणार होती! तो विचार मनात आला कीं, अंगावर काटा येतो बाई! श्रीपतीनं चलाखी केली, म्हणूनच आतां आपण बोलत बसलों आहोत ना! नाहीं तर —!"

विमलला पुढें बोलवेना.

"अशा स्थितींत कोणीही आपला जीव राखण्याची प्रथम धडपड करील." भय्यासाहेब म्हणाले. "कशाला मधे पडाव अरविंदानीं! बरं आपला हात दुखावला असता, आताचा उपद्व्याप काय म्हणून करावा यानीं! ह्याचं सारं औरच. त्यागाला काहीं तरी सीमा आहेच कीं नाहीं!"

" तसं कसं म्हणतां, भय्यासाहेब ! " अरविंद म्हणाला, " त्याग कसला ह्यात ! श्रीपतीच्या हातून आततायीपणा होऊ नये, म्हणूनच मला मधें पडावं लागलं ना ! आणि असं पाहा, बच्चा जरी एकाद्याचा शत्रु असला, तरी अशा भयंकर स्थितींत त्याची जखम बांधणं हें कर्तव्य नव्हे का ! मी तर भूतदयेचं काम करण्याकरिता या ठिकाणीं येऊन राहिलों आहें. मग मला माझं कर्तव्य आधीं केलं पाहिजे ना !

" कसली घेऊन बसलात भूतदया ! " भय्यासाहेब म्हणाले, " हे सारे भांडवलशाहीचे दुष्ट खेळ आहेत, अरविंद. अशा वेळीं तुमच्या त्यागाची किंमत काय मिळणार तुम्हांला ! "

भय्यासाहेबाचें बोलणें संपतें न संपते, तोंच पाटील पोलिसाना घेऊन दाखल झाले. त्याच्याबरोबर लोकाचा घोळकाही होता. पाटलानीं असा काहीं प्रकार होण्याचा संभव आहे, अशी आदले दिवशीं पोलीसठाण्यावर वर्दी दिली होती. त्यामुळें ते अधिकारी सर्व तयारीनिशीं तेथें आले.

त्यांनीं येताक्षणींच चौकशीस सुरुवात केली. आता येथून निघून जावे, असें भय्यासाहेब सुचवीत होते. परंतु पंचनाम्याकरिता शिक्षित लोकाची जरुरी होती. पोलिसानीं त्या मंडळीस पच नेमून आपला पंचनामा सुरू केला. बच्च्यास त्यानीं सरकारी डॉक्टराकडे नेण्याचें ठरविलें. त्या वेळीं रायबाच्या हृदयाचे पाणी झालें. तो कळकळीने त्याना विनवूं लागला,

" हतं ह्यो देवमानूस ह्येला बरं करील, साएब ! नगा त्याला दूर नेऊं. पाया पडतु तुमच्या ! "

पण त्याची विनति कोण ऐकणार ! ठकोजी व पाटील ह्याना त्याला सरकारी डॉक्टरकडे न्यावयाचें होतें. त्याशिवाय डाक्टरचे सर्टिफिकेट मिळवून श्रीपतीला पुरा गोत्यांत आणण्याचा त्याचा पुढचा कार्यभाग साधणार नव्हता. म्हणून त्यानीं बच्चाला तेथून उचलण्याची अगोदर व्यवस्था केली. त्याचें बरळणें चालू होतेंच. त्याची भीति आता पाटलाना जास्त वाटली, व झटकन् त्याला तेथून सरकारी डॉक्टरकडे पाठविण्याची त्यानीं व्यवस्था केली.

पंचनामा केल्यावर पोलीस श्रीपतीचा तपास करूं लागले.

इकडे पोलीस येऊन त्यानीं तपासास सुरुवात करताच श्रीपती झटकन् मागील बाजूने झोंपडींत शिरला. जिजाची नजर त्याच्यावर होतीच. तो घरात गेल्याचे पाहून तीही आत गेली. त्याला पाहताच ती स्फुंदूं लागली. श्रीपतीचेही अंतःकरण भरून आले, पण तो लागलाच भानावर आला व सद्गदित स्वरात म्हणाला,

" जिजे, वाईट वाटूं देऊ नकोस अस. मीं काही कसलं पाप केलं नाहींना ? तू सांगितल्याप्रमाणं ततोतत वागलो. मीं होऊन कोणावर हल्ला केला नाही. एक दोन काठ्या मीं डोक्यावर घेतल्या तरी हात उगारला नाहीं मीं, पण—"

श्रीपती थोडे थांबला. त्याच्या मनात अत्यंत खळबळ उडाली होती. तथापि बाहेर आपली चौकशी लवकरच सुरू होईल असे त्याला वाटलें, व आता वेळ घालविणे बरे नाहीं असें पाहून तो पुढे बोलू लागला,

" जिजे, ती बच्चानं उचललेली फरशी कोणाच डोक फोडणार होती हें तुला ठाऊक आहे का ? अग, दादाच्या डोक्यावर तिचा घाव बसणार होता. देवानं मला चटकन् बुद्धि दिली, म्हणून ती फरशी मीं लाठीनं खालीं पाडली. "

" श्रीपती तुझा शूरपणा झाला खरा. " जिजा स्फुंदत स्फुंदत म्हणाली, " पण– पण– पण मी म्हणते, ती फरशी उचलून बच्च्याच्या हातावर घाव घालण्याची बुद्धि देवान तुला दिली नसती, तर आपली अशी अनपेक्षित ताटातूट होती ना." तिला पुढे बोलवेना. ती त्याला डोळे भरून पाहू लागली.

" पण जिजे," श्रीपती आवेशानें म्हणाला, " त्या पापी हाताला मीं हात दाखविला, ह्यांत मी काय पाप केलं ? तो त्याच हातान मला ठार करणार होता ना ? त्याच हातानं त्यानं गोप्याचा पाय तोडला ना ? त्यामुळंच बाबाना कैदेत जावं लागलं ना ? मग मी तो हात तोडला ह्यांत कसलं पाप केल ? पापाला प्रायश्चित्त मात्र दिलं मीं ! "

त्याच वेळी श्रीपती पळाला, अशी बाहेर ओरड झाली. जिकडे तिकडे तपासाकरिता पोलीस धावू लागले. ती गडबड ऐकून श्रीपती म्हणाला,

" जिजे, आता भीत नाही मी कशाला. तुला सांगायचं ते सांगितलं ! नेऊ देत मला कुठंही ! तुला पसंत पडलं ना माझं वागणं ? "

" श्रीपती ! " जिजा त्याच्याकडे पाहात म्हणाली, " जा, कुठंही जा. तूं शूर आहेस. मी शूराची पत्नी आहे. देव निवारण करील संकट आपलं ! "

जास्त बोलण्यास वेळ नव्हता. इतक्यात चिमा झोपडींत शिरली व ती ओरडली,

" हतच है कीं सिरप्या. बसलाया दडून भागूबाईसारका ! मेल्या, बच्च्याला मारताना तुजा हात तुटला नाई कसा ? आन ही सटवीबी हतच है कीं ! "

श्रीपतीने एकदा क्रुद्ध नजरेने तिच्याकडे पाहिले. नंतर जिजाकडे पाहून तो हसत हसत बाहेर आला व म्हणाला,

" न्या मला कुठं न्यायचं ते न्या ! "

त्या वेळीं भर दुपार झाली होती. सहस्ररश्मी काळ्याकुट्ट ढगाच्या पडद्याआड लपला होता. भयंकर उष्मा होत होता. सर्व लोक घामाघूम होऊन गेले होते. बाह्य शरिराला हा ताप होतच होता, शिवाय श्रीपतीविषयीं सहानुभूति असलेल्या लोकांचे अंतःकरण गुदमरून गेलें होते. त्यामुळे प्रत्येकाच्या तोंडून दुःखाचे सुस्कारे बाहेर पडत होते.

श्रीपतीला कैद करून नेल्यावर, जिजाने धाडकन् आपलें आंग जमिनीवर टाकले. त्यामुळे तिच्या आईबापाच्या तोंडचे पाणी पळाले. पण तशांत चिमा ओरडली,

" कित्ती आक्कारताळी है ही ! सटवीचा पायगुनच वंगाळ ! माजंबी हिनं वाटुळ केलं, आन आता कुनाकुनाचं करनार है ही ! "

---

## प्रकरण पंचविसावें.

# घोटाळ्यांत घोटाळा !



ते पावसाळ्याचेच दिवस होते. आठ चार दिवस पाऊस एकसारखा पडे व पुन्हा आठ चार दिवस उघडे. त्यामुळे पिकाची वाढ जोमदारपणे होत होती. सोनगावचे शिवार आता जिकडे तिकडे हिरवेगार दिसूं लागलें होतें. शेतकरी पिकाची कोळपणी व खुरपणी करण्याच्या कामात चूर झाले होते.

त्यामुळें सुमारें दोन एक महिने अरविंदाला त्याचे आवडते शिक्षणाचे काम एकसारखें चालू ठेविता आलें नाहीं. सभोवतालच्या खेड्यापाड्यातील आजारी माणसाना पाहण्याकरिता चिखल तुडवीत तो जात असे. तो त्याच्या घरीं गेला म्हणजे त्याच्या उपकाराचे ओझे त्या लोकास अत्यंत वाटे. त्याच्या ह्या फिरण्यामुळें खेडयापाडयातील जनतेची स्थिति त्याला जास्त जास्तच समजूं लागली. मधून मधून भय्यासाहेबही त्याच्याबरोबर जात असत. शेतकऱ्याची संघटना करण्याचे काम कशाप्रकारें करावे, ह्याची आखणी करण्यातच त्याचे ते दोन महिने निघून गेले.

श्रीपतीवरील खटल्याची अद्याप चौकशीच चालू होती. त्याच्या बचावाकरिता मधुकराने मुंबईच्या गोडाबे वकिलाना पाठविण्याचें ठरविलें होते, व तो मुंबईस आपल्या व्यापारधंद्याकरिता निघून गेला होता.

अलीकडे गेल्या दोन महिन्यात रामगुंफेचें स्वरूपही पार बदलून गेलें होतें. मधुकराने तेथे एक प्रशस्त चाळ उठवून दिली होती, व तींत शक्य तितक्या सुखसोयी करून घेतल्या होत्या.

उन्हाळ्यात राहण्याकरितां तेथील उंच जागीं एक सुंदर बंगली बाधावी, अशी एक योजना त्याच्या मनात घोळत होती. त्यानें आता हें जाणलें

होतें कीं, अरविंद मुंबईत जाऊन राहणें कठिण आहे. तेव्हां त्या ठिकाणीं-च विमलच्या सुखाकरिता आपणास जें काहीं करिता येईल तें करावें असा त्याचा निश्चय झाला होता.

श्रीपतीला पकडून नेल्यामुळें त्याची मित्रमंडळी दुःखी झाली होती. पुढे काय करावें हे त्यांना सुचत नव्हते. जास्त पुढाकार घेतला तर आपणही गोत्यात सापडूं, अशी त्याना भीति वाटत होती. त्यामुळें दिवस-भर शेतीचे काम केल्यानंतर, ते आपल्या घरातच आपणास कोंडून घेत. आज अमक्याला पकडणार, उद्या तमक्याला पकडणार, अशा अफवा-मुळे त्याना पाटलाची धास्ती फार वाटे. त्यामुळें अरविदाकडेही सोन-गावचें फारसें कोणी फिरकत नसे.

एके दिवशी अरविद ह्या सर्व परिस्थितीचा विचार करीत बसला असता विमल तेथे आली. त्या वेळी तेथून सभोवतालचा देखावा मोठा मनोवेधक दिसत होता. एखादी पावसाची सर यावी व मध्येंच लख्ख ऊन पडावें; पावसाच्या सरीने वृक्षवेलींच्या पानावरून व हिरव्यागार गवताच्या पात्यावरून टपटप जलबिंदु गळत असावे, लख्ख ऊन पडले, की जणूं काय तीं मोत्येंच ओघळत आहेत असा भास व्हावा! विमलला ते दृश्य मोठे मनोहर वाटत होते. हवेतील कुंदपणा नाहींसा झाल्यामुळें सर्वत्र प्रसन्नता उत्पन्न झाली होती. त्या वेळींच अरविदाचा आपल्या मनाशीं काहींएक ठाम निश्चय झाला होता, त्यामुळें तोही आनदी होता, म्हणून तो विमलशीं मोकळ्या मनाने बोलूं लागला. विमललाही आपल्या मनात कोंडलेले विचार उघड करण्यास ही वेळ बरी आहे असे वाटून ती अरविदास म्हणाली,

"अरविद, किती दिवस झाले, बोलेन बोलेन म्हणतें, पण मला धीरच होत नाहीं मुळी ! मागच्या सगळ्या गोष्टीचा तुला विसर पडला कीं काय हे समजतच नाहीं मला ! "

विमल आणखी पुढे बोलणार होती, परतु तिला बोलण्याचे धैर्य होईना. तिची छाती धडधडूं लागली. तिने खाली मान घातली. अरविद तिच्या-

कडे पाहात होता. ती थांबल्याबरोबर तोच म्हणाला,

" बोल ना ? तुला काय म्हणावयाचं ते म्हण ना ! मागच्या गोष्टींचं विस्मरण मला कसं होईल विमल ? पण खरं म्हणशील तर तुरुंगातील तपश्चर्येनं माझ्या मनाला जास्त शुद्धता आली. जुन्या गोष्टींकडे पाहण्याची माझी दृष्टिही बदलली ! "

अरविंद स्वस्थ बसला. तो शांत चित्ताने तिजकडे पाहूं लागला. तिला त्याच्या बोलण्याचे आश्चर्य वाटले व तिने भीतभीतच म्हटले,

" म्हणजे काय अरविंद ? दृष्टि बदलली म्हणतोस म्हणजे मूळ वस्तु तुला निराळ्या प्रकारच्या दिसूं लागल्या असंच समजावयाचं का ? मी, आई, दादा, हीं माणसं तुला वेगळ्या प्रकारचीं दिसूं लागलीं काय ? मला नाहीं वाटत आमच्यांत बदल झाला असेलसा ! जर कांहीं बदल झाला असेल, तर तो कोणांत हे तूंच ठरीव. "

विमलला जास्त स्पष्ट बोलता येईना. एवढे बोलून ती घुटमळली. " विमल, " अरविंद शांतपणे म्हणाला, ' माझ्यातच बदल झाला असंच तुला म्हणावयाचं आहे ना ? मग खुशाल तसं म्हण की ! मीही ते कबूल करितो. पूर्वीची माझी राहणी बदलली, माझ्या विचारांतही बरीच क्रांति होत चालली, शहराऐवजीं मला खेडं आवडूं लागलं, शहरांतील चळवळीपेक्षा मला खेड्यांतील समाजसेवा पसंत पडूं लागली; हें तुला दिसतंच आहे. मग तसं बोलण्याची तुला भीति कसली ? तूं पण खरंच सांग. तूं येथल्या पुष्कळ गोष्टी पाहिल्या आहेस—तुझी इच्छा नसतानाही मी मुद्दाम त्या तुला पाहावयास लावल्या आहेत म्हणेनास—खेड्यापाड्यांतील जनसेवा जास्त मोलाची नाहीं का ? "

" काय बाई ! " विमल धिटाईने म्हणाली. " विषय कुणीकडचा कुणीकडे नेलास, अरविंद ! मी म्हणते, आमच्या सर्वांच्या मनाचा ओढा जितक्या जोरानं तुझ्याकडे होता, तितकाच काय, पण त्यापेक्षा किती तरी अधिक आत्ता नाहीं का ? आईचा जीव तुझ्याविषयीं किती तिळतिळ

तुटतो, दादा कित्ती कित्ती तरी तुझ्याविषयी काळजी बाळगतो, आणि मी, आई नको नको म्हणत असता रानावनात कशाकरिता आले बर साग. तूंच साग अरविंद ! ''

विमल अरविंदाकडे प्रेमभराने पाहूं लागली. तो मनांतल्या मनात हसेल, आपल्या प्रेमाचे तो कौतुक करील, त्याच्या प्रेमळ बोलण्याने आपल्या मनाचे समाधान होईल, अशी तिची अपेक्षा होती. परंतु त्याच्या दृष्टींत बदल झाला नाहीं. वृत्तींत तर मुळींच नाहीं. तिच्या सौंदर्याचा त्याला मोह पडला नाहीं. तिच्या प्रेमी बोलण्याचा त्याच्यावर यत्किंचितही परिणाम झाला नाहीं. उलट त्याच्या मुखावर खिन्नता दिसूं लागली. तिला काय उत्तर द्यावे, ह्या विचारात तो पडला. त्याचे तिच्यावर अत्यंत प्रेम होतें, ह्यात संशय नव्हता. परतु आपण प्रेमबंधनातून तिला मुक्त केलेसे दाखविलें व त्याप्रमाणे तिनें आपले प्रेम दुसऱ्याला अर्पणही केले, अशी त्याची समजूत होती. मधुकराने उत्पन्न केलेल्या घोटाळ्याचा कसलाच उलगडा त्याने अद्यापि केला नव्हता. त्यामुळे आत्मसंयमन करून त्याने आतापर्यंत आपल्या प्रेमाचा यत्किंचितही आविष्कार केला नव्हता. म्हणून विमलच्या भाषणातील अर्थ त्याला नीटसा समजेना. म्हणून तो दुःखपूर्ण स्वरात म्हणाला,

" विमल, तुला काय म्हणायचं आहे हेच मला कळत नाहीं. तूं इकडे का आलीस हे ठाऊक नाहीं का मला ! थोडे दिवस मजेत काढावे म्हणून आलीस. आपल बालपणापासूनचं मित्रत्व तू विसरली नाहींस. माझ्या इच्छेनं म्हण किंवा तुमच्या सर्वांच्या इच्छेनं म्हण, येथे पुष्कळ दिवस राहिलीस हे खरं. आणि आता साग, मी इथं येऊन राहिलो, खेड्यापाड्यातील जनतेत मिसळलो, अल्पस्वल्प जनसेवा करूं लागलों, हे बर केल कीं वाईट केल ? कॉलेज सोडताना माझं ध्येय कोणतं होतं, हें तुला ठाऊक आहेच ना ? ''

"तुझं ध्येय मला पटल होतं ना, अरविंद !" विमल विनवणीच्या स्वरात म्हणाली. " तुझ्या म्हणण्याप्रमाण मींही कॉलेज सोडलं नाहीं का ? मुंबईत तुझ्या गैरहजरींत तुझंच कार्य मीं कसं चालविलं होतं, तें देखील तूं पाहायला

यायला नको होतास का ! तें झालं तें झालं, पण आपण वचनबद्ध झालों होतों हेंही तूं विसरलास वाटतं ! मी आल्यापासून बोलेन बोलेन म्हणतें, मेला माझा अभिमानच आड आला माझ्या ! पण आता मला राहवतच नाही मुळीं. माझ्या मनाच्या ओढीची कल्पना मी एकदा दोनदा तुला आणूनसुद्धा दिली. पण तुझं मन खंबीर ते खबीरच. मुबईतील तुझ्या प्रेमाच्या शब्दानीं मला आनंदीआनंद होत असे, तसला एकादा तरी शब्द तुझ्या तोडातून इथं निघाला का ! साग बर मला ! आता तू मला मित्र म्हणवितोस, परंतु ते शब्द मला आवडतील का ! आपलं नात त्याहीपेक्षा अधिक निकट आणि दृढ नाहीं का ! मी चुकलेही असेन, माझं मन खात आहे मला. पण माझं हृदय उघडून पहा, अरविंद—"

विमलचा कंठ रुद्ध झाला. तिला पुढे बोलवेना. अरविंदाच्या खंबीर मनावरही त्याचा परिणाम झाला. तो काही शुकाचार्य नव्हता. त्याला मुंबई-तील आपल्या गत आयुष्यक्रमाची आठवण झाली. सुदर तरुणीच्या प्रेमळ सहवासाच्या अनुभवाची जाणीव त्याला होऊ लागली. विमलला शात कर-ण्याच्या उद्देशाने तो हसत हसत पण भीतभीतच म्हणाला,

"मी तरी काय बोलणार ? माझी पण चूक झाली असेल. पण ती येथल्या कार्याच्या प्रेमामुळं. तुला मीं वचनातून मुक्त केल असही लिहिल असेन, पण 'मुंबईस निघून या,' अशा तुझ्या अनेक पत्राच्या माऱ्यामुळच. तेंही कोणाच्या लक्षात आल नाहीं ना ! तुम्ही मला टाकलत, मग मी तुला मित्र म्हणूं नये तर काय म्हणावं, विमल ! तूही काहीं वाईट निवड केली नाहींस; पण ते दुसऱ्या एकाद्याला पाहावलही नसतं. मी मनावर थोडाबहुत का होईना, ताबा ठेवण्यास शिकलों, तुझ्यावर माझं प्रेम होत म्हणूनच तें सहनीय होतं. तुझ्या प्रेमाचा त्याग मला करावा लागला, पण त्यामुळं इकडील अज्ञ जनते-वर जास्तच करावयास शिकलो मी. आता हें आयुष्य त्याच कार्यात घालविणार मी ! झाल तें झाल. आता तू आपल मन चचल का होऊं देतेस ! जिजा जरी तुझ्याइतकी शिकलेली नसली, तरी एकनिष्ठ प्रेमाचा

घडा तिच्यापासूनही तुला घेता येईल. पुसून टाक आता माझी मूर्ति आपल्या हृत्पटलावरून. ”

अरविंदाच्या मनाला हेच बोलणे दुःखदायक झालें. त्याच्या मुखावर खिन्नता पसरली. विमल तर फारच गोंधळली. भय्यासाहेबावरील आपल्या मनाची ओढ ह्याच्या लक्षात येऊन तो असें बोलत असावा असे तिला वाटलें. पण आता तिने आपले मन आवरले होतें. अरविंदाची कार्यनिष्ठा, धैर्य व वर्तनातील सुसंगतपणा तिला पटला. भय्यासाहेबाच्या पोकळ बडबडीचा तिला वीट आला. भय्यासाहेबाबरोबर केलेल्या सलगीबद्दल तिला आता जास्त पश्चात्ताप होऊ लागला. टेकडीवरील त्याच्याबरोबर झालेला प्रकार अरविंदास समजला असेल, म्हणून हा इतका तुसडेपणानें बोलत असावा असे तिला वाटलें. ती अगदीं नम्रपणे म्हणाली,

“ अशा बोलण्यानं माझ्या मनाच्या चिंधड्या होतात बरं, अरविंद ! मी चुकलें, माझं मन चंचल झाल हातं खरं. पण मला किती तरी पश्चात्ताप झाला आहे माझ्या वर्तनाचा. दादाला तुझं हे बोलणं समजल, तर तो काय म्हणेल ? मला जगात तोंड तरी दाखविता येईल का ! आई काय काय बोलेल याचा विचार कर व आपलं पूर्वीच वचन पाळ. यापेक्षा मी काय म्हणूं ? कोणत्या शब्दानीं माझं अंतःकरण उघड करूं ? ”

विमलच्या डोळ्यात पाणी उभे राहिले. अरविंदालाही फार वाईट वाटले. मधुकराने त्याला लिहिलेल्या पत्रामुळे त्याच्या मनात गोंधळ उडालेला होता. तिच्या बोलण्यावरून मधुकराचे पत्र खर कीं खोटे, हे त्याला समजेना, त्याचा उलगडा व्हावा म्हणून तो म्हणाला, “ थांब, विमल. अशी कष्टी होऊं नकोस. मधुकरानं मला असं पत्र का लिहावं तेंच समजत नाहीं. त्याच्या पत्रान हा घोटाळा झाला. पश्चात्ताप झाला म्हणतेस, पण त्या वेळीं मधुकरानं तुमच्या सर्वांच्याच विचारानं ते पत्र लिहिलं असेल नाहीं ? ”

विमलच्या मनात आता जास्त घोटाळा उडाला, मधुकराचें पत्र कसलें हें तिला कळेना, त्यानें काय लिहिले असावें हें तर तिच्या कल्पनेंतही येईना. ती

अत्यंत गोंधळली व म्हणाली, "दादान कसल पत्र लिहिल म्हणतोस ! ते आहे का तुझ्याजवळ आता ? साग अरविंद. माझा अत आता किती पाहणार ?"

अरविंदाने तें पत्र जपून ठेविले होतें. तो लगेच उठला. त्यानें ते आणले व आपण एकदा वाचले. ते विमलच्या हातीं देत तो म्हणाला, " हे घे पत्र तें ! तुमचा विचार काय ठरला, हे ह्या पत्रात स्पष्ट आहे. भय्यासाहेबाशीं तुझा विवाह ठरून गेला आहे, असाच याचा अर्थ नाहीं का ? "

विमलनें तें पत्र घेतले. ते तिच्या दादाचेच होते. ह्याबद्दल तिला शंका वाटली नाहीं. त्याच्या लिहिण्याचे तिला आश्चर्य वाटले व ती जोरात म्हणाली,

" पत्र दादाच हे खर. पण मुळींसुद्धा अस ठरलं नाहीं, अरविंद !"

" हे अगदीं खरं का ? " अरविंद आनंदाने म्हणाला.

" अगदीं खर, ह्यात तिळमात्रही शंका घेऊ नकोस, अरविंद ! "

विमलने आनंदानें टासून उत्तर दिले. अरविंद किंचित्काल थांबला. कसला तरी विचार त्याच्या डोक्यात आला व तो म्हणाला, " मग तुझ मन चंचल कस म्हणतेस ? तुला पश्चात्ताप तरी कशाबद्दल होतो ? मला काहींच कळत नाहीं हे ! मधुकर आल्याशिवाय उलगडा होणार नाहीं याचा."

इतक्यात त्याचे टपाल त्याच्या हातीं पडले. दोघांचे लक्ष पत्राकडे वेधलें. अरविंदाने आपली पत्रे वाचण्यास सुरुवात केली. विमलच्या नावचीं पत्रें होतीं, तीं तिनें घेतलीं. अरविंदाच्या शेवटच्या बोलण्यास काय उत्तर द्यावें हें तिला सुचत नव्हतें. आणखी घोटाळ्यात घोटाळा उत्पन्न होऊ नये म्हणून शांतपणे विचार करावा, असे तिला वाटले. अरविंद पत्रे वाचण्याच्या नादात आहे, असे पाहिल्याबरोबर हळूच ती उठली व आपल्या खोलींत जाऊन स्वस्थ पडली. तिच्या डोक्यात मात्र आनंद, दुःख, पश्चात्ताप, इत्यादि मनोविकारांनीं गोंधळ घातलेला होता !

———

## प्रकरण सव्विसावें.

# प्रणयभंग.



अरविंदाला काय उत्तर द्यावें ह्याचा विचार विमल बराच वेळ करीत होती. एक वेळ तिला वाटे, " आपल्या मनाची चलबिचल झाल्याचं त्याच्याजवळ प्राजलपण कबूल करावं. आपणास पश्चात्ताप वाटतो असं आपण त्याच्याजवळ मोघम बोलून गेलोंच कीं नाहीं? मग आता खरं खरं सागण्यास आपल्याला सकोच का वाटावा? त्याचं प्रेम आपल्यावर आहे हे निश्चित. मग किरकोळ गोष्टी तो कशाला मनावर घेईल!" पण पुन्हा ती मनात म्हणे, "दादाचा व आपल्या आईचा विचार बदलून भय्यासाहेब त्याना अधिक पसत पडले कीं काय? माझ्या मनाचा ओढा भय्यासाहेबाकडे आहे, हे त्यानीं जाणलं कीं काय? आणि त्यामुळ भय्यासाहेब जहागिरदाराशीं माझा विवाह ठरल्याचं दादानं अरविंदाला लिहिल असाव की काय! पण दादा यासंबंधीं मजजवळ काहींच बोलला नाहीं, हे कसं!"

पुन्हा आणखी थोडा विचार केल्यावर तिला असे वाटू लागलें, " कदाचित् आपणास सापडलेल्या सोनगावच्या शेटजींच्या पत्राचा परिणाम दादाच्या मनावर झाला असेल! आणि त्यामुळेंही त्यान अरविंदास असं सडेतोड पत्र लिहिलं असेल! तसच जर पाहिल, तर जिजाची इतकी स्तुति अरविंदानं काय म्हणून करावी? तिचा स्वभाव चागला आहे, ती गरीब आहे, हुषार आहे, हें सर्व काहीं खरं. पण ती अत्यत देखणी आहे, हेही तितकच खर. पुरुष काय किंवा स्त्रिया काय, त्याच्या मनोवृत्ति सारख्याच नाहींत का? शिवाय शेटजींच्या लिहिण्यात खरेपणा नसेलच, असं तरी कसं

समजावयाचं ! पण शेटजी तरी विश्वासार्ह आहे का ! सांपत्तिक व्यवहारात तो नसेल कदाचित् ! पण असल्या गोष्टी अगदीं परक्या इसमास तो खोट्या का बर लिहील ! त्यात तथ्यांश असेल देखील ! मग खरं पाहिलं तर आम्ही दोघेंही थोडींबहुत दोषी ठरूं. मग कोणीं कोणाला नाव ठेवावयाचीं ! ”

असे उलट सुलट विचार तिच्या मनात उभे राहात. आपल्या शंकाचें समाधान तिची तीच करूनही घेई.

आरंभीं अरविंदावर तिचे निर्व्याज प्रेम होतें. पण भय्यासाहेबाची दाट ओळख होण्यापूर्वी मधुकरानें त्याची माहिती मिळवून तिला त्याच्याविषयीं सावधगिरीची सूचना न देणे, अरविंदाची व तिची बऱ्याच दिवसाची ताटातूट, त्याचें तुसडेपणाचे पत्र, त्याच्या वर्तनाविषयीं शका येण्या-जोगा तिच्याजवळ असलेला पुरावा, सोनगांवीं आल्याबरोबर तिने पाहि-लेला विचित्र देखावा, ह्यामुळें तिच्या निर्व्याज प्रेमास धक्का बसला अस-ल्यास त्यात नवल नाही. तशात भय्यासाहेबासारखा उमदा, सुस्वरूप, व विद्वान् तरुण तिचे प्रेम सपादन करण्याविपयी अहर्निश खटपट करूं लागला, तर विमलसारख्या शहरी वातावरणात वाढलेल्या तरुणीचे मन त्याच्याकडे वेधले गेल्यास नवल ते कसले ?

मात्र तसें होत असता तिचे मन तिला वरचेवर खाई. अरविंदाची दृष्टि तिजकडे गेली, कीं तिला पश्चात्ताप होई. आपले वर्तन चुकीचे आहे असे तिला वेळोवेळीं वाटे. पण भय्यासाहेब गोड बोलू लागले कीं, पुन्हा तिचे मन त्याच्याकडे धाव घेई !

पण रामगुंफेजवळच्या त्या शुद्ध वातावरणात बरेच दिवस राहिल्यामुळें भय्यासाहेबाकडील तिच्या मनाची ओढ पुढे पुढे कमी कमी होऊं लागली ! आरंभीं त्याच्या बाह्य सौंदर्यानें ती मोहित झाली असली तरी निकट सहवासाने त्याची खरी योग्यता तिच्या ध्यानात येऊं लागली. तो धीट नव्हता असे नव्हे, पण ध्येयाच्या निश्चलतेने आलेला तो धीटपणा नव्हता. तो जनसेवेची कळकळ दाखवीत असला, तरी ती कळकळ

जास्तींत जास्त प्रसिद्धि मिळण्यासाठींच होती. तो जहागिरदार म्हणवीत असला, तरी मनाची उदारता त्याच्या ठिकाणीं दिसत नव्हती. अलीकडे अरविंद व भय्यासाहेब ह्याच्यात ती जेव्हा तुलना करूं लागे, तेव्हां अरविंदापेक्षा भय्यासाहेब तिला फारच कमी योग्यतेचे दिसू लागत. तिला वाटत असलेल्या सशयाचे निराकरण जर तावडतोब झालें असतें, तर भय्यासाहेबाकडे तिच्या मनाची ओढ खास गेली नसती! आता मात्र भय्यासाहेबाना झटकन् कसें तोडावें ह्याच फिकिरींत ती होती!

विमलचे प्रेम संपादण्याकरिताच भय्यासाहेब तेथे इतके दिवस राहिले होते. एकादा भ्रमर जसा उमलत्या सुवासिक कुसुमाभोवतीं घोंघावत फिरत असतो, तसेंच भय्यासाहेब तिच्या सान्निध्यात असत. तिची मुग्ध संमति आपल्या पदरात पडली, असेच ते समजत! आणि तिची उघड संमति केव्हा मिळवूं असें त्याना होऊन गेले होते! पण अलीकडे काहीं दिवस ती त्याची विचारपूसही करीनाशी झाली. त्यामुळें त्याचे मन फार अस्वस्थ झालें. त्याना कसल्यातरी भयंकर काळजीनें घेरलेलें होते. विमलचे प्रेम संपादन झाल्यास ती काळजी नाहींशी होईल, अशी त्याना खातरी वाटत होती.

पण विमलच्या अलीकडील तुटक वागणुकीमुळे आपल्या मनातील सुखद आशेची जागा दुःखद निराशा घेते कीं काय, असे त्याना वाटूं लागले. पुन्हा पुन्हा प्रयत्न करीत असावें, असा त्याचा चिकाटीचा स्वभाव असल्यामुळें तिच्याशीं लघळपणा करण्याची संधि ते शोधीत असत.

आजच त्याच्या हातीं मुंबईची बरींच इंग्रजी वर्तमानपत्रे आलीं होतीं. शिवाय त्याच्या मनाला यातना होतील, असेंही एक पत्र त्याना मिळालें होतें. त्या वर्तमानपत्रात त्याचें लिखाण प्रसिद्ध होऊन त्यावर उत्साहजनक अग्रलेख आल्यामुळे त्याना आनद झाला होता. परंतु त्या आनंदात विलायतेहून आलेल्या एका अत्यंत त्रासदायक पत्रामुळे विरजण पडलें होते. त्या पत्रामुळे पुढें काय करावे असा त्याना एक मोठा पेच येऊन पडला होता.

त्यामुळे ते त्या दिवशीं सचिंतच होते.

त्याना आपल्या खोलींतही बसवेना. म्हणून ते बाहेरील बाजूस इकडे तिकडे फिरूं लागले. त्या वेळी त्याना अरविंद व जिजा गडबडीनें गावात जात असलेलीं दिसलीं. त्याच वेळीं त्याच्या मनात एक धाडशी विचार आला, व त्यानी विकट हास्य केलं! ताबडतोब ते रामगुफेकडे परतले. विमलच्या खोलीकडे त्यानीं दृष्टि फेकली, पण ती तेथे त्याना दिसली नाहीं. इकडे तिकडे पाहात असता ती रामकुंडाजवळ बसलेली त्याना दिसली.

ती दुपारची पाच वाजण्याची वेळ होती. त्या वेळीं आकाशात तुरळक तुरळक मेघ इतस्ततः बागडत होते. दिनराज पश्चिम दिशेकडे धावत चालला होता. त्याच्यावर काळ्याकुट्ट ढगाचे मधून मधून आवरण येत असल्यामुळे त्याला ते दूर करता करता नाकीं नऊ येत होते!

त्या वेळीं विमल रामकुंडाजवळील एका शिळेवर बसली होती. समोरील कड्यावरून खालीं खाली धाव घेणाऱ्या प्रवाहाकडे शून्य चित्ताने ती पाहात होती. इतक्यात भय्यासाहेब हातात वर्तमानपत्रे घेऊन तेथे आले व विमलकडे पाहून ते तिला म्हणाले,

" कोणाचे ध्यान चालविले आहे तुम्हीं! अलीकडे आमचा तर विसरच पडला वाटतं तुम्हाला!"

विमल काहीं बोलली नाहीं. तिने भ्रुकुटी वक्र करून त्याच्याकडे फक्त पाहिले. त्या वेळीं भय्यासाहेबच म्हणाले,

" आज आलेलीं हीं वर्तमानपत्रे चाळावयाचीं आहेत का तुम्हाला! का मीच तीं वाचून दाखवूं? एवढी तरी सेवा करूं देता का मला!"

ह्या लघळपणाचें विमलला हसू आलें. तिच्या सन्निध बसावे म्हणून ते तिच्याजवळ येऊं लागले. तेव्हा बोलणेंच भाग पडलें व ती म्हणाली, "तुम्हीच वाचून दाखवीत आहात ना तीं वर्तमानपत्रं! मग असे समोरच बसून तीं वाचा कीं!"

भय्यासाहेब एवढ्यावरच संतुष्ट झाले आणि ते तींवर्तमानपत्रे वाचूं

लागले. प्रथम त्यांनी कांहीं महत्त्वाच्या बातम्या वाचल्या. तीं सात आठ दिवसांचीं जुनी वर्तमानपत्रें होतीं. मधुकर तेथें असला, म्हणजे रोज पत्रें आणविण्याची व्यवस्था करी. तो तेथें नव्हता, म्हणून गोग्रामार्फत आठवड्याचीं तीं एकदम आली होतीं त्यातील बातम्याकडे साहजिकच विमलचें लक्ष वेधलें. ती उत्सुकतेने ऐकू लागली. मधून मधून भय्यासाहेबही तिच्याकडे पाहात असत. तिची उत्सुकता वाढलेली पाहून त्या पत्रात इकडील चळवळीची जी हकिकत त्यांनी चटकदार भाषेत लिहून पाठविली होती, ती वाचण्यास आरंभ केला.

तींत सोनगावात चाललेल्या लोकसेवेचे पुष्कळसे श्रेय त्यानी आपल्याकडेच घेतले होते. बक्षिससमारंभाच्या वेळच्या सभेची जुनी समग्र हकिकत देऊन, त्यानतर सोनगावात झालेल्या लोकजागृतीचे चित्र त्यानीं भडकदार रंगविलें होते! शेतकरी संघटित होऊन भाडवलशाहीशीं तोंड देण्यास कसे सज्ज झाले आहेत, याचे काल्पनिक वर्णन देऊन गावात झालेली मारामारी हा भाडवलशाहीचा दुष्ट डाव आहे, असे त्यानीं तडफदार भाषेंत वर्णिले होते! शेवटीं विमलच्या सहकार्याची त्यानीं मुक्त कठाने स्तुतिही केलेली होती!

तो मजकूर वाचून झाल्यावर ते विमलकडे पाहूं लागले. ती हसत होती, हें पाहून भय्यासाहेबाना आनंद झाला व ते म्हणाले,

"माझ्या कामगिरीची स्तुति मुंबईत सर्वत्र कशी होऊं लागली आहे, आणि तुमच्याबद्दलही सर्वांनी कौतुक कसे प्रदर्शित केले आहे हे पाहा तरी!"

भय्यासाहेबानीं तीं वर्तमानपत्रें विमलपुढे टाकलीं व ते तिजकडे उत्सुकतेने पाहूं लागले! विमलला हसूं आवरेना. शेवटीं ती म्हणाली,

"बाई, बाई, शर्थ झाली तुमच्या लिहिण्याची! कांहीं पदार्थ तिखटमीठ लावून रुचकर होतात हें खरं, पण ते प्रमाणात घातलं तर! पण इथं काय तिखट-मिठात मूळ पदार्थाचा मागमूसच दिसत नाहीं मुळी!"

"काय तुम्ही म्हणता हें!" भय्यासाहेब बोलूं लागले, "येथें सभा

झाली नाहीं, मीं भाषण केलें नाहीं, साक्षरतेचा प्रसार झाला नाहीं, तुम्हीं जनसेवेच्या कामात भाग घेतला नाहीं, असें का तुम्हाला म्हणावयाचं आहे ? ह्या पत्राचा खास बातमीदार खोटं लिहितो असं म्हणता ? ”

“ तुम्हीं भाषण केले असेल, ” विमल म्हणाली, “ पण त्यानें जागृति किती झाली ? लोकाना काय समजल ? ते संघटित झाले का ? तुमच्या भाषणाचा आणि मारामारीचा काय सबंध ? आणि त्यात माझी इतकी स्तुति का ? अरविंदाचा विसरच पडला वाटतो त्या बातमीदाराला ! त्याचीच जागा त्याला घ्यायची आहे वाटतं ? अरविंदाला तरी हेच पाहिजे. तो आणखी एकाद्या ठिकाणीं आपलं कार्य सुरू करील ! ”

“ अरविंदाची जागा त्याला घ्यायची म्हणता, हें एका अर्थानं खरं नाहीं का ? ” भय्यासाहेब विमलकडे पाहात मान हालवीत बोलूं लागले. “ तुम्हीच आपल्या मनाशीं विचार करा. आठवा ना तो टेकडीवरचा प्रसंग ! माझ्या वेणीचा तुम्हीं स्वीकार केलात, त्याच वेळीं माझा स्वीकार तुम्हीं केलात ना ? शिवाय मला गुच्छ अर्पण करून तुम्हींही आपला हेतु अगदीं उघड केला नाही का ? अर्थात् त्या वेळीच तुम्हीं आपण होऊन मनानं अरविंदाची जागा मला दिलीत ना ? अरविंद आपलं कार्य दुसरीकडे सुरू करील असं तुम्ही म्हणता, हेही तितकंच खरं नाहीं का ? त्यानं तसं केलं म्हणून तर तुम्हीं मला आपलेसं केलत ! मग माझ्या हृदयदेवतेची स्तुति मीं करूं नये तर कोणाची करावी ? ”

भय्यासाहेबाचे ते शब्द आता विमलला कडू जहर वाटूं लागले. आजच तिला पूर्ण पश्चात्ताप होऊन तिनें अरविंदाचें मन प्रसन्न करून घेतले होतें. त्यामुळे भय्यासाहेबाना काय उत्तर द्यावें, हें तिला सुचेना. त्याना तोडून तरी कसे बोलावे, हे तिच्या ध्यानात येईना. मूळ विषय निराळा व भय्यासाहेबानीं त्याला दिलेलें वळण अगदींच वेगळे, त्यामुळें तिच्या मनाचा गोंधळ उडाला. ती काहींच बोलत नाहीं, असे पाहून भय्यासाहेबच म्हणाले,

"समजलों मी. अगदीं तुमच्या तोंडून शब्दच बाहेर पडावयास पाहिजेत असं नाहीं. मनाची खूण मनालाच पटते. माझं मन आनंदानं उचंबळलं आहे, तरी सभ्यपणाच्या मर्यादा उल्लंघिता उपयोगी नाहींत. चला आपण हातात हात घालून तरी फिरूं!"

भय्यासाहेब जागेवरून उठूं लागले. विमलची छाती धडधडूं लागली. त्या वेळीं आपल्या देहास त्याचा स्पर्श तिला होऊं द्यावयाचा नव्हता, म्हणून तीच जाग्यावरून उठली व मागें पाऊल टाकीत असता अडखळत अडखळत बोलली,

"भय्यासाहेब, असा आततायीपणा करूं नये तुम्हीं! तुम्हीं माझ्या कृतीचा भलताच अर्थ केलात! मला नव्हतं वाटल असं तुम्ही करालसं! पण आता चक्क सागतें, नव्हे, बजावतें, तुम्हास देण्याला मजजवळ कांहींच शिल्लक नाहीं मुळीं! ते ज्याचं होतं त्यानच नेल आहे."

भय्यासाहेबाचे मुख किंचितसें उतरले. तरीही ते म्हणाले,

"चुकतेस विमल! आपल्या मनाशीं तू प्रतारणा चालविली आहेस. प्रेम हें सावकाराच्या धनाप्रमाणं आहे. ते वाढतच जायचं! ज्याला दिलं त्यानं तें परत केल्याशिवाय ते दुसऱ्याला कसं देता येईल? धनाची व्याजा-व्याजानं जशी अनेकपट होते, तशीच प्रेमाची स्थिति होत असते!"

"भय्यासाहेब," विमल धीटपणें म्हणाली, "छान! बरं सागितलंत तुम्हीं! तुमचींच मतं मला एवढ्या वेळेपुरतीं पटूं लागलीं आहेत!"

ती पुढे बोलणार इतक्यात भय्यासाहेब अधीरपणें म्हणाले,

"पटायचींच! म्हणूनच मी आपल्याला झालेला आनंद व्यक्त करीत होतों ना?"

"मी काय म्हणते, हें ऐकलंत का तुम्हीं आधीं?" विमल जास्त धिटाईनें म्हणाली. "तुमचीं मत मला पटूं लागलीं असं मी म्हणते. पण तुमचं आताचं म्हणणं मला पटतं, असं मी म्हणत नाहीं. इतकं उतावीळ होऊं नये तुमच्यासारख्यानीं! जरा समंजसपणानं वागावं."

भय्यासाहेब गोंधळले. ते तिच्याकडे नुसते पाहूं लागले. त्याच्या मनाची उडालेली त्रेधा पाहून ती मनातल्या मनात हसू लागली. तिच्या त्या हसण्यानें नाउमेद होण्याऐवजीं त्याना उत्तेजनच मिळालें !

" न का पटेना माझं आताच म्हणणं तुम्हांला ! " भय्यासाहेब अधीरपणानें म्हणाले. " हातात हात घालून हिंडण्याचा मोह मला आवरला पाहिजे. माझीं मतं पटलीं, हे तरी आता तुम्हीं कबूल केलेत ना ! तुम्हांला पटेसा मीं सावकारीचा दृष्टात दिला. त्याचा अर्थ एवढाच कीं, आपल प्रेम वाढत जाणार. तें तुम्हाला दुसऱ्याला देता येणार नाहीं. नव्हे, तुम्ही कोणाला देणारही नाहीं. "

भय्यासाहेबाचें बोलणें संपते ना सपते तोच विमलही अधीरतेने म्हणाली,

" भय्यासाहेब, चुकत आहात तुम्ही ! तुमच्यासारख्याला माझं म्हणणं तेव्हाच कळावयास पाहिजे. पण तुमचं मस्तकच धुंद झालेलं दिसतं ! तुमचाच सावकारीचा कोटिक्रम उलट तुमच्यावर फेकीत होते मी ! भाडवलशाही रसातळास गेली पाहिजे, असं म्हणत असता ना तुम्ही ! म्हणजे सावकारी नाहींशी होणारच. व्याजा-व्याजानं मुद्दल वाढण्याऐवजीं तेंच अजिबात बुडणार. अर्थात् हें तुमचं मत मला आता पुरतं पटलं म्हटलं मीं. म्हणजे प्रेमाची देवघेव बंद. मी तुमच्यावर प्रेम केलं असं जर का तुम्हाला वाटत असेल, तर तुमच्या मताप्रमाणं तें नाहींस झालं असं समजा. आता पुन्हा तुम्हीं हा विषय काढू नये हें बरं. मी चक्क बजावते तुम्हाला ! आणि आता निक्षून पण सागतें, माझं प्रेम अरविंदान केव्हाच हरण करून नेलं आहे ! "

" नेलं कीं कसं हें देव जाणे !" भय्यासाहेब हेटाळणीच्या स्वरात म्हणाले. " मीं मात्र माझं प्रम तुम्हाला वाहिलं आहे. अरविंदाला तसं करता येणारच नाहीं मुळीं. त्यानं तें दुसऱ्याला दिल आहे. हें तुम्हाला कळत होतं, म्हणूनच माझा स्वीकार केलात तुम्ही. तें काहीं चालायच नाहीं. माझ्या प्रेमाचा मोबदला माझ्या पदरात पडलाच पाहिजे ! "

ह्या वेळीं भय्यासाहेब जास्तच खवळले. आपल्या सर्व मनोरथावर पाणी पडणार असें त्याना वाटून ते बेभान झाले. आज दुपारपासून त्यांचें मस्तकच ठिकाणावर नव्हतें. आणि आता तर प्रणयभग होण्याचा प्रसंग येऊन ठेपला. त्यामुळें खुषीने नसला, तरी सक्तीनें विमलवर ताबा मिळवावा अशी आसुरी इच्छा त्याच्या मनात उत्पन्न झाली ! त्यानीं एक पाऊल पुढें टाकलें !

भय्यासाहेबाची त्या वेळची ती मुद्रा अवलोकन केल्याबरोबर विमल अत्यंत भयभीत झाली. तिचे अंग थरथर कापू लागलें. ती मोठ्यानें " अरविंद ! अरविंद ! " असे ओरडली.

त्याबरोबर भय्यासाहेब तेथेंच थबकले व म्हणाले,

" कोणाचा धावा चालविला आहेस तूं ? तो त्या सुंदरीबरोबर केव्हाच निघून गेला आहे ! गडीमाणसंही गावात लावून दिलीं आहेत मीं ! विमल, प्रणयभगाचं दुःख मला सहन होत नाहीं ! किती अंत पाहणार तूं ? मला ठाऊक आहे, अरविंदावर तुझं प्रेम होतं, रामाचं चित्र रेखा-टीत असता तूं त्याचंच चित्र काढीत होतीस, पण पुढ त्याच्यावरील तुझं प्रेम उडालं. असं असता त्याचाच तूं धावा चालवावास अं ! "

त्या वेळीं विमलच्या डोळ्यात अश्रु उभे राहिले. अरविंद त्या सुंदरी-बरोबर म्हणजेच जिजाबरोबर बाहेर गेला हे भय्यासाहेबाचे शब्द तिच्या मनाला बोंचले. ती कापत कापत म्हणाली,

" तो कोणीकडेही जावो ! माझं त्याच्याचवर प्रेम आहे हें खरं. ती त्याला दादा म्हणते व तो तिला बहीण मानतो, हें तुम्हालाही ठाऊक आहे. मग व्यर्थ संशय का घेता ? "

" विमल, संशय कुठ घेतों मी ! जें दिसतं तें बोलतों ! " भय्या-साहेब म्हणाले.

" कांहीं का असेना ! त्याची नको काळजी तुम्हाला ! " विमल धीरानें म्हणाली. " तुमची समजूत मात्र अगदीं चुकीची झाली. मीं तुमच्यावर खरं प्रेम कधींच केलं नाहीं व कालत्रयीं करणारही नाहीं ! समजलांत ? "

" असं काय ! " भय्यासाहेब दात ओठ खात म्हणाले, " एकदां एकाचा मनोभंग करणाऱ्या तुझ्यासारख्या तरुणीवर मीं प्रेम केलं, हीच माझी चूक झाली खरी ! पण असा अनेकाचा घात होऊ नये म्हणून तरी आता मी तुला मोकळी सोडणार नाहीं ! "

त्या वेळीं सूर्य अस्तास जात होता. जळजळीत निखाऱ्याप्रमाणें तो लाल दिसत होता. पश्चिम दिशा आगीच्या ज्वाळाप्रमाणे लालभडक झाली होती. जणूं काय दिनराजाच्या नेत्रातून उडणाऱ्या अग्नीच्या ठिणग्यांनीं तिचे वस्त्रच पेटलें आहे कीं काय, असा भास होत होता ! वाराही जोराचा वाहूं लागल्यामुळे ती आग जास्तच भडकल्यासारखी वाटत होती !

त्या वेळी विमलला काहीं सुचेना. ती सुशिक्षित होती, पण स्वसंरक्षणाचें सामर्थ्य आंगी आणण्याचे शिक्षण तिला मिळालें नव्हते. त्यामुळे ती हत-बल झाली व मोठ्याने " धावा हो धावा ! धावा हो धावा ! " असें ओरडूं लागली. त्याबरोबर लाबून एक खणखणीत आवाज तिच्या कानीं आला.

" बघतीयास काय ! बडव चेपलीनं मेल्याला ! आल्येच मी ! "

त्या शब्दात आत्मविश्वास प्रतीत होत होता. वीरवृत्ति चमकत होती. जवळपास कोणी नाहीं ह्या विश्वासाने भय्यासाहेबानीं आतताईपणा आरंभ-लेला होता. पण हे करारी शब्द कानीं पडल्याबरोबर त्याची गाळण उडाली ! त्यानीं मागे पाय घेतला. ते धूम ठोकू लागले. पळताना त्याची डायरी खाली अस्ताव्यस्त पडली. तीतील एक पाकीट उडून चालले, हे त्याच्या लक्षातही आलें नाही ! ते तेथील एका जाळींत लपले. इतक्यात धावतच चिमा आली. तिनें विमलला पाहिल्याबरोबर एकदम म्हटलें,

" चेपलीनं सडकलंस वाटतं त्येला ! कुट गेला मेला ! साग मला ! तंगडी धरूनशान फरफटत आणत्यें सोद्याला ! "

हे तेजस्वी शब्द ऐकल्याबरोबर विमलची भीति निघून गेली. ती बोलली असती तर चिमानें भय्यासाहेबाचा पाठलाग करण्यास कमी केले नसतें. चिमा शिकलेली नसली, तरी तिला आत्मसामर्थ्याचा दांडगा विश्वास असे,

तिच्या पवित्र आचरणाचें प्रखर तेज तिच्या मुखावर नेहमीं विलसे. त्यामुळें पुरुषाबरोबर वागण्याचा तिला प्रसंग आला, तरी तिच्याकडे वाकडा डोळा करण्याची कोणाची छाती होत नसे.

" नाहीं ! " पडलेल्या आवाजात विमल म्हणाली. " मी एकटीच बाचीत बसले होतें, इतक्यात कोणीतरी आलसं वाटलं मला व मी भ्यालें !"

विमल खरी हकिकत छपवीत होती, हें तिचा चेहरा चिमाला सागत होता. तिला असे बोलल्याशिवाय गत्यंतर नव्हतें. स्त्रियाची अब्रू म्हणजे किती नाजूक गोष्ट आहे, हें ती जाणत होती. सत्यकथन करण्यानें भय्यासाहेबापेक्षा आपणास जास्त अपाय होईल, हे तिला ठाऊक होते.

" तूं भ्याली हैस, " चिमा म्हणाली, " म्हनुनशान बोलत नाईस ! तुजं बोरडन माज्या कानावर आलं, तवा कोनीतरी लाडगा तुज्यासारक्या भनीवर झडप घालतुया, असं मला वाटलं ! म्हनून मी आल्ये धावत ! तुजं लगीन जालया का नाई मला ठावं नाई ! "

विमल जरा घुटमळली. थोडा वेळ गेल्यावर चिमाच बोलूं लागली,

"लगीन जाल म्हज नवरा साबाळतो. पन आपलबी मन खंबीर लागतं. आन बावटं बळकाट असलं म्हंज कुनीबी टग्या वर मान करूनशान बगत नाई. माज कारबारी गेल, मी रडकी जाल्ये, तरी म्हमईत गिरनींत काम करीत व्हतें मी ! पन वर डोळा करून कुनी माज्याकड बगल तर मी चेपलीन त्वाडच सडकीन असं त्येला भ्या वाट ! मंग बघतुया कशाला ! एक नवरा तो नवरा, जल्माला एकदाच यायचं है ! "

चिमा थाबली. विमल स्तब्धच होती. तिला बोलावयास लावावें म्हणून चिमाच तिच्या माहितीच्या गोष्टी बोलूं लागली,

" जिजी पोरटी खट्याळ है, पन तीबी माज्याच वळनाची है ! सिरप्या तिला पटला, मला नवतं ठाव ! म्हनून म्या बच्चाकरता मायंदाळ धडपड केली, पन माजंच चुकलं ! "

तिचें बोलणें चालू असता विमल मध्येच म्हणाली, " तुम्ही आला

म्हणून माझी भीति गेली. उपकार आहेत तुमचे. लोक काय, कोणालाही नावें ठेवतात. जिजाला नावें ठेवणारे नसतील का ? ”

“ तुमी म्हनता तेबी खरं है, ” चिमा म्हणाली, “ त्या देवमानसाच्या नावानं मीबी बोटं मोडीत व्हतें ! पन आता त्येच देवपन समद्या जगाला कळल, जिजीलाबी त्येच्यामुळच पाटील, शेटजी, सार नावं ठेवीत व्हतं ! ती द्वाड है, पन धुतल्या तादळावानी शुद्द है ! त्या देवमानसाला खरी भन सोबते बरं ! ”

“ तुमचा तिच्यावर फार राग होताना ! आता कसा गेला तो ? ” विमलनें विचारलें.

“ पाटलाचा समदा कावा कळला मला ! त्येनंच बच्चाकडनं गोप्याचा पाय तोडला ! सकारामालाबी कैदत टाकल. माला पैशाला लई बुडवलं ! आता सगळ ब्याड बाहेर पडतय, तवा बच्चाची मनधरनी करतुया पाटील ! आपली बबी देतुया अन एक श्यातबी देतुया त्येला ! बच्चानं मागचं सारं कचेरींत सांगितलं तर पडत्याल पायात बेड्या पाटलाच्या ! म्हनूनशान पाटलीनबी ढळढळा रडतीया ! तवा माझा जिजीवरचा राग गेला ! सिरप्या तिचा नवरा ठरलाया. आन रादलाबी आवडतुया त्यो ! ”

“ तुम्हाला रात्र होईल परत जायला.” विमल म्हणाली. “ पण आता अरविंद येईपर्यंत मला सोबत कराल ना ! ”

“ त्या देवमानसाकडच आलीया मी ! ” चिमा नम्रपणे म्हणाली. “ बच्चाला घरीं आनलाया. आता त्येचा तुटका हातबी बरा झालाया, पन लई वंगाळ दिसतुया त्यो, म्हनून त्येला एकदाचा बगा, आन अक्षी चाक दवा द्या, म्हनूनशानी सागनार है त्या देवमानसाला मी. आन नाराळबी फोडायचा है माला ! रात झाली तरीबी मी भ्यायची नाई, बाईसाब ! ”

दोघीही तेथून उठल्या व रामाच्या देवळात गेल्या. त्या वेळीं चिमाला वाटेंत सापडलेल्या पत्राची आठवण झाली. भय्यासाहेबाच्या डायरींतून उडालेलें पाकीट तिला सापडलें होतें. तें तिनें विमलजवळ दिलें. विमलनें

तें सुंदर पाकीट हातात घेतलें. त्यावर भय्यासाहेबाचा पत्ता होता. अक्षर स्त्रीचेच होते हें पाहिल्यावर विमलच्या डोक्यात एक कसलीशी चमक येऊन गेली.

चिमाने देवळात दिवा लावला व् रामापुढें नारळ फोडला. तिनें त्यातील प्रसाद विमलला दिला व त्या दोघी बाहेरील कट्ट्यावर येऊन बोलत बसल्या.

" तुमी बायका शिकता मायंदाळ, " चिमा काही तरी बोलावयाचें म्हणून बोलूं लागली, "नटता मुरडता लई ! पन अगात ताकाद असत्ये का तुमच्या ? आमच्या गावच्या बाया बगा, गड्याबरोबर कामं करत्यात त्या ! "

" आमच्यात ताकद नाहीं हें खरं, " विमल म्हणाली, " ती आम्हीं मिळविली पाहिजे. पण आम्ही नीटनेटक व स्वच्छतेन वागतों, हे वाईट म्हणता का तुम्ही ? "

" बापयाच्या डोळ्यात भरल अस तुमी वागता मडमावानी ! " चिमा खोचक स्वरात म्हणाली. " दंड कशापाई उगड ठेविता ? त्यात ताकाद है का तुमच्या ? "

" चालच पडून गेली शहरात अशी !" विमल म्हणाली. " पुरुषाना पण आवडतं ना हे सगळं ! त्यामुळ सौदर्य खुलतं असं वाटत ना त्याना ?"

"पन आग उगड टाकूनशान, तोडाला पावडर फासूनशान बाई छान दिसत्ये वाटतं ? " चिमा मान हलवीत म्हणाली. " आगात ताकाद असल तर देकनेपनाला सोबा ! आन तुमच्या नटन्यामुळ तुमच्यावर संकाटं येत्याती ! आता सागा तुमाला ओरडाया कारन काय झालं तें !"

" नाहीं हे, मला उगीच भीति वाटली, " विमल भीत भीत म्हणाली. " कोणी तरी आलंसं वाटल म्हणून मी ओरडलें ! "

" आमच्या खेड्यात असा कोनी धटिंगन चागल्या बायाकड बगायचा नाई, " चिमा अभिमानानें म्हणाली. " आमच बापई अडानी असत्याल पन चागलं वाईट समजतं त्येना. आन ह्या देवमानसाकड तर अस कोनीबी

फिरकायचं न्हाई ! ”

चिमाचे बोलणें विमलच्या वर्मी लागलें. तिच्या बोलण्याचा रोख तिला कळला, त्यामुळे ती विरमली. खेड्यातील लोकाच्या वागणुकीचा सात्विक अभिमान चिमाच्या बोलण्यात होता. तिनें आपल्या दोषाचें चित्र रेखाटलें तें बरोबर आहे असें विमलला वाटलें.

विमल उत्तर देण्यास कचरते हें पाहून चिमा पुढे बोलूं लागणार इतक्यात अरविंद, पाटील, शेटजी, वगैरे लोक रामगुफेकडे येत असलेले दिसले. अरविंद आलेला पाहून विमलला धीर आला व ती म्हणाली,

“ अशा येत जा बरं इथ कधींतरी ! आज तुमचे उपकार झाले आहेत माझ्यावर. मला कसला तरी भास झाला म्हणून मी भ्याले होते. वेगळं वाटूं देऊं नका बरं ! ”

इतक्यात चिमा अरविंदापुढे गेली. त्या वेळी तो तिला म्हणाला,

“ काहीं काळजी करूं नका भावाची. मी त्याला पाहून आलो आहें. चागलं औषध देईन उद्या ! ”

चिमा गहिवरली. आपण इकडे त्याच्याकरिता आलो, पण आपल्यामागेंच हा देवमाणूस भावाला पाहून आला, त्यामुळें तिचे हृदय भरून आलें.

त्या मडळींत एक पोलिस अमलदार होता. अरविद तेथें आल्याबरोबर त्यानें भय्यासाहेबास हाक मारली. विमल रामाच्या देवळात गेली त्या वेळींच ते भीतभीत आपल्या खोलींत येऊन बसले होते. भय्यासाहेब पुढे आल्याबरोबर अरविंदाने पोलीस अंमलदाराची व त्याची गाठ घालून दिली. पाटील व तो अमलदार भय्यासाहेबाच्या खोलींत शिरले !

भय्यासाहेबाची छाती जोरानें धडधडूं लागली !

---

## प्रकरण सत्ताविसावें.

# नवी नीति !



श्रीपतीस पकडून नेल्यामुळे जिजा अत्यंत दुःखित झाली असली तरी ती हताश झाली नव्हती. श्रीपतीने आततायीपणा केला असे तिला वाटत नव्हते. त्यानें मनात आणलें असतें तर त्या वेळीं अनेकांना तो जायबंदी करता, परंतु आपल्यावरील प्रेमामुळे आपल्याला दिलेलें वचन त्याने पाळलें. अरविंदासारख्या महात्म्यावर जो प्रहार करावयास उठला, त्याचा हात श्रीपतीनें तोडला, हे एकपरी योग्यच झाले. ज्या दुष्ट हाताने गोप्याचा पाय तोडला, बाबा नाहक कैदेत गेले, त्या दुष्ट हाताला श्रीपतीने शासन केले ह्यात त्याचा अपराध कसला ! अशी तिची विचारसरणी झाली होती.

पण कायद्याने तो गुन्हा ठरत होता, म्हणून तर श्रीपतीला पकडून नेले होतें. न्यायासनापुढे चौकशी होऊन तो दोषी किंवा निर्दोषी हे ठरणार होतें. कायद्याचा कीस काढणाऱ्या कायदेपंडिताना ती एक नामी संधि प्राप्त झाली होती. अशा वेळीं गरीब बिचारे पक्षकार त्यांच्या घरीं पैशाच्या राशी ओतीत असतात. त्यांच्या जवळचे असेल नसेल, ते तर खलास होतेच, शिवाय सावकारी बोजा बेसुमार वाढून पुढे त्याची अन्नान्न दशा होते. हे कायदेपंडित मात्र आपल्या धंद्यावर मिळणाऱ्या ह्या पैशाने चैन भोगीत असतात. खेड्यापाड्यातील जनतेच्या संपत्तीला ओहोटी लागणाऱ्या अनेक कारणापैकीं हे एक मोठें कारण आहे.

अशा वेळीं श्रीपतीच्या बाजूनें खटपट करावयास त्याचे असे कोण होते ! जी काय जिवाची तडफड होई ती सखारामाची. पण तो आता इतका थकला होता की, त्याला चार पावलें उचलणें कठिण पडत होतें.

जिजाच्या मनाची तळमळ कितीही होत असली, तरी ती बिचारी काय कर-णार ! तिचा सारा भरंवसा परमेश्वरावर व त्याच्याच कृपेनें लाभलेल्या अरविंददादावर.

त्या दिवशीं एक पोलिस अमलदार त्या गुन्ह्याची जास्त चौकशी करण्या-करिता आला होता. त्याला शेटजींनीं आपल्या घरीं आग्रहानें नेले होतें. त्या ठिकाणीं पाटील व शेटजी यानीं त्याची सरबराई चालविली होती. तो अंमलदार कच्च्या दिलाचा नव्हता. त्याला गुन्ह्याचा खराखुरा तपास करावयाचा होता. म्हणून सर्व बाजूंनीं तो माहिती मिळवीत होता. गुन्ह्याची जागा प्रत्यक्ष पाहण्यास तो गेला. गुन्ह्याच्या वेळीं तेथें जिजा होती हें त्याला समजले, म्हणून तिची जबानी घेण्याचा त्याचा विचार होता. त्याप्रमाणे त्याने सखारामास सांगितलें, आणि इतर बारीक सारीक चौकशी करून गुन्ह्याच्या जागेचा नकाशा तयार करण्यात तो गढून गेला. इतक्यात जिजा तेथून निसटली व ती थेट रामगुंफेकडे गेली. पोलीस अंमलदारास संशयास जागा मिळूं नये म्हणून अरविंद ताबडतोब तिच्याबरोबर गेला, हे भय्या-साहेबानीं पाहिलें होतें. त्यानंतर गडीमाणसाना बाहेर धाडून ते विमलकडे गेले होते. अरविंद तेथें आल्याबरोबर त्या पोलीस अंमलदारालाही समाधान वाटलें व तो म्हणाला,

" तुम्हीच का अरविंद ! आपली भेट झाली हें बरं झालं. गुन्ह्याचा तपास करण्याच्या कामीं तुमची मदत आम्हाला मिळेल ना ! "

हा अमलदार अरविंदाशीं सौम्यपणें बोलत असल्याचें पाहून पाटलांना नवल वाटलें.

" आपण ह्या मुलीची जबानी घेणार असं कळल्यामुळं मी आपल्याकडे आलों आहें. न्यायाच्या कामीं कोणीही नागरिक मदत करीलच कीं ! "

अरविंदाच्या म्हणण्यातील आशय पोलीस अमलदारानें ओळखिला. त्यानें पाटील वगैरेंना दूर लावून दिले व आपल्यास जी काय माहिती पाहिजे होती, ती त्याने त्याला विचारून घेतली. नंतर तो अरविंदाला म्हणाला,

" चला आपण गावातच जाऊं. चावडींतच जबान्या घेणं बरं. काम आटोपून मला तुमच्याबरोबर रामाच्या दर्शनाला यायचं आहे. तेथें भय्यासाहेब आहेत ना ! "

अरविंद व तो पोलीस अंमलदार पुढें चालू लागले. पाटील व शेटजी मागें रेंगाळले व ते सखारामजवळ गेले. त्या वेळीं जिजा घरात निघून गेली. पाटलानीं सखारामाविषयीं पुष्कळ सहानुभूति दाखविली. नंतर ते उठून जाऊं लागले, इतक्यात काहीं आठवलेंसें करून सखारामापुढें एक कसलासा कागद त्यानीं ठेविला. निशाणी आगठा उठविण्याचे सामान झटकन् बाहेर काढले आणि कागदावर काहीं तरी लिहून ते चटकन् म्हणाले,

" बाबा, तुम्हाला जाबजबानीची दगदग होणार नाहीं. करा या कागदावर आगठा ! 'मला चावडींत येण्याची ताकद नाहीं', असं यात लिहिलंय मीं ! घेतोंच आहे पुष्कळाच्या जबान्या तो ! आणखी तुमची कशाला पाहिजे ? पुन्हा नको त्रास त्या पोलीस अंमलदाराचा ! "

पाटलानीं त्याचा डावा हात धरला. तो थरथर कापत होता. शेटजी जवळच होते. त्यानींही पाटलाच्या म्हणण्यास संमतिदर्शक मान डोलावली.

सखारामाला पाटलाचा जरी विश्वास वाटत नव्हता, तरी त्याच वेळीं पोलीस अंमलदार येऊन गेलेला होता, त्याची चौकशी चालू होती; अनेकाच्या जाबजबान्या तो गावात घेणार आहे, हे त्याना कळले होतें, आपल्यास तिकडे जाता येणें शक्य नाहीं, हेंही त्याला समजत होते, त्यामुळें पाटील व शेटजी म्हणतात तें खरे आहे, अशी भोळ्या सखारामाची समजूत झाली. पाटलानीं त्याला विचार करावयास वेळ तरी कोठे दिला ? झटकन् आगठा घेतला आणि तो आगठा त्याच्याच जमिनीच्या लिलावाची नोटीस मिळाल्याबद्दलचा होता ! असें फसवून आगठे घेण्याची ही कितवी वेळ हें एक तो पाटीलच जाणे ! त्यानंतर पुन्हा तेच कळकळ दाखवून म्हणाले, " नको आता तुम्हाला म्हातारपणीं त्रास ! जिजालाही कचेरींत जायला नको. सुटेल शिरप्या. मुबईची माणसं खटपट करताहेत त्याच्या-

साठीं. आता भाडणाचा मला आलाय कटाळा. देतों मी आपली बबी बच्याला व भाडणाचं मूळच काढून टाकतो ! ”

पाटील एवढें बोलून उठले. सखारामाला त्याच्या त्या बोलण्याने बरें वाटलें. तो मनात म्हणूं लागला, “ पाटलाला रामान चागली बुद् दिली. बच्च्याचा हात तुटला तरी पाटील आपली लेक देतोय त्येला. शिरप्या सुटल म्हणतोय. रामाला काळजी त्येची. एकदा जिजाच लगीन झालेलं डोळ्यानं पाहावस वाटतंया. पन देवाचं देव करनार ! ”

मनाला वाटलेलं समाधान जिजाला सागावे म्हणून त्यानीं तिला हाक मारली व सर्व हकिकत सागितली. त्याबरोबर ती सतापून म्हणाली,

“ कशावर आगठा उठवून दिलात तुम्हीं ! मला कागद वाचायला बोलवायचं कीं नाहीं ! ह्या आगठ्यानीच घात होतोय जिकडे तिकडे. मेल्यानीं कशावर आगटा घेतलाय समजत नाहीं मला. बाबा, तीं माणसं चागलीं नाहींत, हे अद्यापही तुम्हाला कळूं नये ना ! ”

“ उगी बस. जे व्हायचं ते होईल. शेटजी व्हता जवळ म्हनून तुला बोलावलं नाई मी ! आता भाडनाचं मूळच नाहींस करतुया पाटील ! ”

नंतर सखारामाने तिला पाटलांनीं सागितलेली हकिकत सागितली, तरी तिचा संशय गेला नाहीं.

बच्याला घरीं आणलेला आहे, हें कळल्यामुळें अरविंद त्याची प्रकृति पाहून त्या पोलीस अंमलदाराबरोबर परत फिरला. वाटेनें जाताना वर्तमान-पत्राचे कापलेले तुकडे त्या अंमलदाराने त्याच्या हातीं दिले व तो अंमल-दार म्हणाला, “ ह्या वर्तमानपत्राचे खास बातमीदार कोण बरं असावेत !” अरविंदानें उत्तर दिलें नाहीं. ते दोघे मुकाट्यानेच पुढे चालले. त्या अंमलदारानेही जास्त विचारपूस केली नाहीं.

भय्यासाहेबाची भेट होताच त्या अंमलदाराने त्याच्या खोलीची कसून झडती घेतली. पत्रें, पुस्तकें, वगैरे जप्त केलीं. भय्यासाहेब अत्यंत घाबरलेले होते. त्याना पुस्तके जप्त झाल्याची तितकीशी फिकीर वाटत नव्हती. पण

त्या दिवशीं विलायतेहून आलेलें पत्र त्या अंमदाराच्या हातीं पडूं नये, अशी त्याची इच्छा होती. त्यांच्यावर भाषणबंदीची नोटीस बजावून तो पोलीस अंमलदार निघून गेला !

\+ + + +

मध्यरात्र उलटून गेली, तरी विमलचा डोळा लागलेला नव्हता. त्या दिवशीं घडलेल्या अनेक प्रसंगाचीं चित्रे तिच्या डोळ्यापुढें नाचत होतीं ! अरविंदाचे प्रेम संपादन झाल्याचें मोहक चित्र तिच्या डोळ्यापुढे येई, व तिच्या मनाला समाधान वाटे. पण लगेच भय्यासाहेबाच्या आततायीपणाच्या वर्तनाचे दुसरें चित्र डोळ्यापुढे आल्याबरोबर तिच्या मनाच्या चिंधड्या चिंधडया उडत ! चिमाचा धीटपणा व स्पष्टवक्तेपणा लक्षात आल्याबरोबर तिला आपल्या मनाच्या व देहाच्या कमकुवतपणाची जाणीव होई. एकपरी तिला वाटे, " आपल्यास जें शिक्षण मिळाल त्याचाच हा परिणाम नाही का ? " परंतु ती पुन्हा आपल्याशीं म्हणे, " ज्यानं मन सुसंस्कृत होत नाहीं तें खरं शिक्षण तरी कसलं ? " आपल्या दोषाचें खापर कोणावर तरी फोडण्याचा मनुष्यस्वभाव असतो. विमल तें खापर तिला मिळालेल्या शिक्षणावर फोडीत होती.

पण पुन्हा ती मनात म्हणे, " तसलच शिक्षण अरविंदाला मिळालं नाहीं का ? मग त्याचं चारित्र्य इतकं शुद्ध कस ? आपण आपलेच मूळ दोष पाहिले पाहिजेत. शिक्षणालाच सर्वस्वी दोष देण्यांत अर्थ कोणता ? " अशा प्रकारच्या विचाराचा गोंधळ तिच्या मनात चालू असल्यामुळे तिला काहीं केल्या झोंप येईना. भय्यासाहेबाची आपल्यामागची कटकट कशी सुटावी ह्याची काळजी तिला चैन पडू देत नव्हती. झालेल्या गोष्टीचा बभ्रा करावा, तर आपल्यालाच तें बाधक होणार; न करावा तर ही कटकट बंद कशी पडावी ? काहीं केल्या त्यातून सुटण्याचा योग्य मार्ग तिला सुचेना. ती अंथरुणावर पडे, डोळे मिटी, ह्यामुळें तिच्या शरिराची हालचाल बंद पडे, पण मस्तकात उडालेला हलकल्लोळ मुळीं देखील कमी होत नसे !

त्या वेळीं एकदम तिला चिमास सापडलेल्या भय्यासाहेबाच्या पत्राची आठवण झाली. प्रथम तिला वाटलें, 'दुसऱ्याचं पत्र पाहून आपल्याला काय करावयाच आहे!' पण तो विचार थोडक्याच वेळात मावळला. तिनें उठून दिवा मोठा केला व तें पत्र ती वाचूं लागली.

पत्र वाचीत असता तिच्या मुद्रेवर हास्य चमकूं लागले!

त्याच वेळीं खिडकींतून कोणीतरी डोकावून पाहात असल्याचा तिला संशय आला. पण तिनें खिडकीकडे पाहिले तों तिला कोणी दिसलें नाहीं. अर्थात् आपल्याला नुसता भास झाला, असे तिला वाटलें. तिनें तें पत्र पुन्हा वाचलें.

त्यानंतर ती मनात म्हणाली, 'काय बाई, ही मडम काय लिहिते, काडीमोड करायची झाली तर वीस हजार रुपये दिले पाहिजेत! नाहींतर मी येणारच मुळीं तुझ्याकडे! आरभींच मी म्हणत होतें, हिंदी लोक भामटे असतात! पण तुम्ही मला वेगळे दिसलांत! तुम्हीं मजवर प्रेम केलंत, मींही तुमच्यावर केलं! मला जहागीरदारीण म्हणून मिरविण्याची हौस भारी. म्हणून मला तुम्ही केव्हा बोलावता याची वाट मी पाहात राहिलें, पण आता मला तर असं कळतं कीं, तुम्ही खरोखरीच भामटे आहात! तुम्ही जहागीरदार नाहींतच मुळीं!'

ह्यापुढें तिनें काय लिहिले, हे मनात आणणेंदेखील विमलला योग्य वाटेना. मात्र भय्यासाहेबांच्या कटकटींतून सुटण्याचा मार्ग या पत्रानें सांपडला असें तिला वाटले.

ती पुन्हा मनात म्हणूं लागली, "काय उलट्या काळजाचा माणूस हा! माझ्यावर प्रेम आहे म्हणतो, आणि अगोदरच हा एकीच्या पाशात अडकून पडलेला! नाहीं बाई, कोणा माणसाचं मन कसं आहे, ह्याचा थाग लागणं भारी कठीण!"

ती अंथरुणावर पडली. आता तिला डोळा लागेलसा वाटूं लागला. पण मागील बाजूच्या खिडकींतून पुन्हा कोणीं पाहात असावें, असें तिला

वाटलें. ती उठली. तिनें ती खिडकीच लावून घेतली व ती पुन्हा अंथरुणावर पडली. खिडकीवर कट कट असा आवाज सुरू झाला. ती उठून बसणार, इतक्यात एक चिठ्ठी त्या खिडकींतून खालीं पडली!

ती कोणीं टाकली असावी, हें तिच्या लक्षात आले. पण तिकडे ढुंकून पाहूच नये इतका त्या व्यक्तीचा तिला वीट आला होता. पुन्हा कट कट आवाज आहेच. आता मात्र तें तिला असह्नीय झालें. कोणाला तरी हाक मारावी, असें तिला वाटलें. पण इतक्या भयंकर रात्रीं हाक मारली तर त्याचा काय परिणाम होईल, ह्याचा ती विचार करूं लागली. तसें करण्यापूर्वी एक वेळ चिठ्ठी तरी पाहावी असे तिला वाटलें. तिनें ती भीत भीत उचलली. तिचा हात थरथर कापत होता. तिच्यातील मजकूर वाचूं नये असें तिला प्रथम वाटलें. पण पुन्हा नुसते वाचून पाहिले तर काय होतें एवढें, असें वाटून तिनें ती चिठ्ठी उघडली. तिच्यातील मजकूर कापऱ्या हातानें घाईनें लिहिलेला होता. तो ती वाचूं लागली. त्या वेळीं एक हास्याची लकेर तिच्या मुखावर उमटून गेली! पुन्हा तो मजकूर शातपणे तिनें वाचला. तो असा होता:—

"प्रिय विमल,

मी सायंकाळीं तुझ्याशीं जो अक्षम्य असभ्यपणा दाखविला, त्याबद्दल मला अत्यंत पश्चात्ताप होत आहे. तो कोणत्या शब्दानीं प्रदर्शित करावा हेंच मला समजत नाही. कोणत्या का कारणानीं होईना, माझ्या मनात त्या वेळीं सैतानाने धुमाकूळ घातलेला होता! झालेल्या प्रकाराबद्दल मी क्षमेची याचना तुझ्यापाशीं करीत आहे. माझ्या दुष्ट कृत्याच्या इंगळ्याच्या वेदना माझ्या मनाला असह्य होऊ लागल्या, म्हणून मी अशा भयंकर रात्रीं तुझ्याकडे क्षमा मागण्यास आलों आहें. तूं क्षमा करशील ना!

माझें पूर्वीचें चरित्र तुला कळलेलें नाहीं. माझ्या महत्त्वाकाक्षेची कल्पना तुला नाहीं. मी कोणत्या निराशेने पछाडलों आहें, हेही तुला माहीत नाहीं. आज माझें मस्तक भ्रमण्यास काय कारण झालें, हेंही तुला ठाऊक नाहीं.

हें जर तुला कळतें, तर माझ्या आततताईपणाची मीमासा तुला करता आली असती. तशी करता आली नाहीं तरी तुझें मनच मोठे, हे मला तुझ्या वागणुकीनें कळलें. चिमाला तूं माझें नाव सागतीस, तर ती जहाबाज बया माझी धिंड काढती ! अरविंदाला तू ही हकिकत कळवितीस तर माझ्या कृतघ्नपणानें तो शात महात्माही खवळता !

तेव्हा आता 'क्षमा केली' एवढे दोनच शब्द तूं म्हटलेस, कीं माझे मन ठिकाणावर येईल. माझ्या पापाचें प्रायश्चित्त घेण्याचें मीं आपल्या मनाशीं ठरविले आहे. माझ्याच मूर्खपणामुळें आज भाषणबंदीची नोटीस माझ्यावर बजावण्यात आली आहे. माझ्या खोट्या भरमसाट लिहिण्याचा तो परिणाम होय. तेव्हा मी आता ती नोटीस मोडून भाषण करणार व कारागृहवास पत्करणार !

तुझ्यावरचे माझें प्रेम मात्र अढळ राहील.

पश्चात्तापदग्ध तुझा,

भय्या."

विमलनें ती चिठी फेकून दिली व ती स्वस्थ बिछान्यावर पडली.

भय्यासाहेब खिडकीबाहेर उभे होते. ते तिच्या उत्तराची अपेक्षा करीत होते. बाहेर दाट काळोख होता. रातकिड्याचा किरकीर आवाज त्या काळोखात भेसूरपणा आणीत होता. दूरदूरच्या वन्य पशूंच्या आरोळ्यानी भय्यासाहेबाच्या आगाचा थरकाप होत होता !

मधून मधून इतस्ततः उडणारे काजवेच काय ते किंचितसा आशेचा किरण त्याच्या हृदयात उत्पन्न करीत !

बराच वेळ विमलकडून उत्तर आले नाही, त्यामुळे भय्यासाहेब अत्यत अधीर झाले ! तेथील माणसें गाढ निद्रेचे सुख अनुभवीत होतीं. सर्वत्र अगदीं स्तब्धता पसरली होती. त्यामुळें दोन शब्द बोलून काय तो सोक्ष-मोक्ष करून घ्यावा, म्हणून त्यानीं खिडकी हळूच उघडली. विमलने तिकडे पाहिलें. भय्यासाहेबाचें मुख काळवंडले होतें. त्याच्या मस्तकावरील केस

इतस्ततः भ्रमण करीत होते. खिडकीचे गज त्यानीं ज्या हातानीं धरले होते, ते हात थरथर कापत होते !

" मला क्षमा केलीस ना ? " भय्यासाहेब खोल गेलेल्या आवाजात नम्रपणें म्हणाले.

विमल कांहीं बोलेना. पुन्हा त्यानीं अत्यंत मृदु आवाजात तेच शब्द उच्चारले. तेव्हा विमलचें अंतःकरण द्रवलें व ती म्हणाली,

" केली. पण एका अटीवर ! "

" कोणती अट ? साग मला. " भय्यासाहेब कातरपणें पण अत्यत नम्रपणें म्हणाले. "कसलंही विष मला आता प्राशन करणं भाग आहे. मात्र कैदेंत जाण्याच्या माझ्या निश्चयापासून मला परावृत्त करूं नये तुम्हीं ! "

" तें तुमचं तुम्ही ठरवा. " विमल गंभीरपणें म्हणाली. " पण माझी अट तुम्हाला पाळलीच पाहिजे."

" कोणती अट ती ? सागा ना ? उदारहृदयी माणसं मेलेल्याना मारीत नसतात." भय्यासाहेब निर्वाणीच्या स्वरात म्हणाले.

" मी कुठं मारतें तुम्हाला ? तुम्हींच माझा जीव कासावीस करून टाकलात ! " विमल धीटपणे म्हणाली. " तुम्ही पत्रात लिहिता 'माझ तुझ्यावरील प्रेम अढळ राहील.' हे शब्द माझ्या मनाला घरं पाडीत आहेत. म्हणून अजिबात त्याचा त्याग करा. हीच माझी अट ! "

" ही अट ! फार भयकर अट ही ! " भय्यासाहेब पूर्ण निराशेच्या स्वरात बोलूं लागले, " ती अट मीं कशी पाळावी ? तोंडान बोललों तरी तुमची मूर्ति मीं हृदयातून कशी ढकलून द्यावी ? कठिणात कठिण वाटतं मला हें ! "

" अद्यापही काय साग चालविलेंत तुम्हीं !" विमल हेटाळणीच्या स्वरात बोलूं लागली. " म्हणे माझी मूर्ति अंतःकरणातून दूर कशी ढकलावी ! त्या कुसुमेची मूर्ति तुमच्या अंतःकरणात होती ना ? ती कशी दूर ढकललीत ? अहो, तुम्हाला मन तरी आहे कीं नाहीं कोणाला ठाऊक ! तुमच्या वाग-

ण्यात, बोलण्यात, किंवा लिहिण्यात, सच्चेपणाचा भाग कितीसा आहे! तुमचं त्या मडमेच पत्र माझ्या हातीं पडलं. समजल तुमचं सगळं काळंबेरं! उगीच वटवट करू नका तुम्ही!"

"काय! तुझ्या हाती तें पत्र पडलं!" भय्यासाहेबाना आश्चर्य वाटून ते म्हणाले, "एकपरी बरंच झालं ते माझ्या झडतींत गेलं नाहीं तें! नाहीं तर माझ्याबरोबर अनेकाना त्रास होता! पण मी म्हणतों, तिची मूर्ति पूर्वी माझ्या मनात होती, आता ती मीं काढून टाकली! तिची जागा तुझ्या मूर्तीनें घेतली यात वावगं तें काय झाल!"

"काय तुमच्या नीतिकल्पना! दिवे ओवाळा त्या कल्पने वरून!" विमल हात हालवीत मानेला झटका देऊन म्हणाली.

"तुम्हीं नवीन शिक्षण मिळवलत तें फुकटच गेल म्हणावयाच!" भय्यासाहेब ओढून ताणून आत्मसमर्थन करू लागले. "अहो, नव्या नीतिच्या कल्पना सर्वत्र फैलावूं लागल्या आहेत! कसली तुमची जुनी नीति! नीति ही छत्रीप्रमाणं नाहीं का? सूर्याचा ताप निवारण करण्याकरिता ती निरनिराळ्या बाजूंस फिरवावी लागत नाहीं का? त्याप्रमाणंच मनस्ताप नाहींसा करण्याकरिता नीतीच्या कल्पनाही बदलावयास नकोत का? ही नवीं मतं आम्ही आचरणात आणतो, म्हणजे नीतीनेच वागतों. पाहिजे तर जुन्या नीतीचा भग आम्ही केला, असें म्हणा तुम्ही तुमच्या समाधानाकरता! जसा कायदेभग अरविंदाला न्याय्य वाटला, तसा निरुपयोगी झालेल्या जुन्या व बुरसलेल्या नीतिनियमाचाही भंग न्याय्यच नाहीं का?"

"पुरे झाली वटवट तुमची!" विमल संतापानें म्हणाली, "तुम्हाला निश्चित ध्येय नाहीं व खऱ्या नीतिनियमाची पर्वाच नाहीं मुळीं! कायदेभंग, मर्यादाभंग, नीतिभंग सारे भंग करून तुम्ही आपल्याच काय, पण आपल्या समाजाच्या चिंधड्या उडविणार! खुशाल कैदेंत जा तुम्ही. तुमच्यासारख्याची समाजाला जरुरी नाहीं. मीही पण तुमच्या मडमेचं पत्र प्रसिद्ध करतें व तुमचीं सारीं बिंगं आणतें चव्हाट्यावर! तुमच्या बडबडीचा मला वीट

आला. करा आपलं ताड काळं येथून ! ''

" तेवढं मात्र करूं नकोस ! " भय्यासाहेब घाबरेपणानें म्हणाले.

त्या वेळीं विमलला अत्यंत त्वेष आलेला होता. ती झटकन् उठली व तिनें झपाट्याने खिडकीचीं दारें लाविलीं व कडी घातली. तसें करताना भय्यासाहेबाचीं बोटे चेंगरल्याचें तिला कळलेंही नाहीं. त्यानीं कशींतरी बोटें काढून घेतलीं.

त्याचे मस्तक त्या वेळीं अत्यंत भडकले होते. ते बेभान झाले होते व पाय आपटीत ते कसे तरी जाऊन आपल्या बिछान्यावर पडले ! तो आवाज तिच्या कानीं आला. त्या वेळींच आपल्या दारावरून कोणी तरी गेल्याचा तिला भास झाला. तिच्या मनाला अत्यंत त्रास झाला होता, तथापि आपण बोलण्यात तरी चागला सूड उगविला, ह्या कल्पनेने तिला बरें वाटले. त्यामुळें तिच्या मेंदूवर पडलेला ताण कमी झाला व थोड्याच वेळात तिचा डोळा लागला.

भय्यासाहेबाच्या मेंदूवर मात्र भयंकर परिणाम झाला होता व त्यामुळें त्याना सणसणून ताप भरला.

रात्रीचा तिसरा प्रहर उलटला. सर्व सृष्टींत नवसंचाराचे वारे खेळूं लागण्याची वेळ नजीक आली. पण भय्यासाहेबाच्या खोलींत काहीं निराळाच प्रकार चालला होता ! त्याच्या दारास बाहेरून कोणीं तरी कडी लावून घेतली होती. आत ते मोठमोठ्याने ओरडत होते !

" चला, सोडा मला ! मी कैदेत जाणार ! सोडा मला ! करा पत्र प्रसिद्ध ! होऊ द्या काय व्हायचं तें ! "

ते दारावर जोराने लाथाही मारू लागले. सर्व जण जागे झाले. अरविंद गडबडीनें तिकडे गेला. भय्यासाहेबास आवरणें त्याला फार कठिण पडूं लागलें, इतका जोराचा वात त्याना झाला होता !

---

## प्रकरण अठ्ठाविसावें.

# हृदयभेदी किंकाळी.

अरविंदानें भय्यासाहेबाना उपचार करण्याचे अगदीं शिकस्तीनें प्रयत्न चालविले होते. ते कांहीं वेळ स्वस्थ पडत, पण एकदम मध्येच ओरडूं लागत. एकदम उठून धावण्याचा प्रयत्नही ते करीत. " मी कैदेंत जाणारच. होऊं द्या तें पत्र प्रसिद्ध !" असें पुन्हा पुन्हा बडबडत !

अरविंदाला त्याच्या प्रकृतीची अत्यत धास्ती वाटूं लागली. त्याना निजविलेल्या खाटेला त्यानें त्याचे हातपाय बाधून टाकले. पुन्हा जेव्हा ते धडपडून उठूं लागले, त्या वेळीं " तुम्ही कैदेतच पडलेले आहात, तुमचे हातपाय साखळदंडानीं जखडले आहेत, तुम्हाला हालचाल करिता उपयोगाची नाहीं, " असें त्याने त्याना बजावलें. चमत्कार असा कीं, त्यानीं हातापायाना एक दोन झटके दिले व ते जखडले आहेत अशी त्या लहरींत आपली खात्री करून घेतली. मग मात्र ते स्वस्थ पडले. ते पाहून थोड्या वेळानें तेथें एका माणसास बसवून अरविंद त्या खोलींतून बाहेर पडला.

त्या वेळीं सूर्याचे कोमल किरण सर्वत्र फाकले होते व अखिल चराचर सृष्टींत अनुपम सौंदर्य प्रतीत होत होतें. विमल गाढ निद्रेतून नुकतीच जागी झाली होती व खोलीबाहेर पडून ती सूर्यनारायणास नमस्कार करीत होती. एकादें जाडजूड ओझें डोक्यावरून खालीं उतरल्याने ज्या प्रकारचें समाधान वाटते, तशा प्रकारचे समाधान तिच्या मुद्रेवर उमटलें होतें.

त्याच वेळीं अरविंद तिच्यापुढून चालला होता. त्याने मधुर स्मिताने तिचें स्वागत केलें; पण खालीं मान घालून तो झटकन् पुढें निघून गेला ! तसलें मधुर हास्य त्याच्या मुखावर तिनें कित्येक दिवसात पाहिलें

नव्हतें. त्यामुळें तिच्या अंतःकरणात आनंदाचे तरंग उठूं लागले.

पण असे गोड स्वागत करून तो एकही शब्द न उच्चारता पुढें का निघून गेला असावा, ह्याचा ती विचार करू लागली. तिनें तपास केला, तेव्हा तिला भय्यासाहेबाच्या भीतिदायक आजाराची हकिकत कळली. तेव्हा त्याच्याविषयींच्या तिच्या कठोर हृदयातही करुणेनें प्रवेश केला.

अरविंद परत भय्यासाहेबाच्या खोलीकडे चाललेला पाहून ती त्याला म्हणाली, " मी येऊं का मदतीला ! एकटाच किती त्रास घेणार ! "

" तुझ्या मदतीची जरुरी लागली तर मी बोलावीन कीं ! पण आजार कोणता आहे, ह्याचा जर विचार केला तर तूं तिकडे न फिरकलेलंच बरं. " अरविंदाने हसत हसत उत्तर दिलें.

" होय का ! चागला सल्ला दिलास मला. पण त्या आजाराची बाधा तुला होऊ नये, अशी काळजी घ्यायला जवळ नको का कुणी ! " एवढें बोलून विमल हसली पण तें हसणें स्वाभाविक नव्हतें.

" समजलों हो, मी ! " अरविंद म्हणाला, " तुझ्या बोलण्याचा रोख कळला मला. तसला आजार मला होईल, असा संशयही घेऊं नकोस विमल ! रात्रीचा प्रकार ऐकला आहे मीं ! पण ते बोलणं नको आता. मला माझ्या मित्राकडे गेलं पाहिजे लवकर." असें बोलून तो निघूनही गेला. ती मनात म्हणूं लागली, "अरविंदाने रात्रीचा सर्व प्रकार ऐकला म्हणावयाचा ! तरी मला वाटलंच होतं, त्या वेळीं दारावरून कोणी तरी जात असावं. भय्यासाहेबाच्या दाराला बाहेरून कडी लावणारा तोच असावा. "

आपले रहस्य समजल्याने त्याच्या मनावर कोणता परिणाम झाला असेल, ह्याचा ती विचार करूं लागली. त्या वेळीं तिला अरविंदाच्या प्रसन्न हास्याची आठवण झाली. इतक्या त्रासातही तसें तो हसला, हाच आपल्या निर्दोषीपणाचा व त्याच्या खऱ्या प्रेमाचा पुरावा आहे, असें तिला वाटलें.

इतक्यात तेथें चिमा आली. ती बचाला औषध नेण्याकरिता आली होती. तिला भय्यासाहेबाच्या आजाराची हकिकत कळली. पण तिच्या

मनानें तो आजार नव्हता. तर ते पापाचें प्रायश्चित्त होतें. ती विमलजवळ येऊन म्हणाली,

" बग, बाई, आमचा राम कसा है त्यो ! काल ह्याच मेल्यानं तुला तरास दिला असल, म्हनूनशान रामानं आज त्येला उताना पाडलाया ! पन, बाई, लगीनाला येळ लावूं नगस बरं ! "

चिमा आणखी पुढे बोलणार होती, परंतु अरविंदानें तिला हाक मारली व औषध दिलें. त्यामुळे ती लगेच निघून गेली. पण तिनें गावभर भय्यासाहेबाच्या आजाराचा बोभाटा केलाच !

शेटजी व पाटील ह्याना भय्यासाहेबाच्या आजारामुळे फारसें वाईट वाटलें नाहीं. भर सभेंत त्या दोघाना उद्देशून त्यानीं काढलेले उद्गार त्याच्या वर्मी लागले होते. शेटजींनीं पाटलाना भय्यासाहेबाच्या भाषणाचा वडा-वाकडा रिपोर्ट करावयास लाविला होता, त्याचा व भय्यासाहेबानीं खास बातमीदार म्हणून प्रसिद्ध केलेल्या मजकुराचा परिणाम त्याच्यावर बजावण्यात आलेल्या भाषणबंदीच्या नोटिशींत झाला होता !

× × ×

मुंबईची मंडळी सोनगावात कायमची राहिली तर आपणास त्रास होईल, असें शेटजी व पाटील याना वाटत होतें. गावात चाललेल्या लटपटी-खटपटींत बाहेरच्या मंडळींनीं यत्किंचितही लक्ष घालूं नये, असेंही त्याना साहजिकच वाटत होतें. भय्यासाहेबाच्या आजारामुळें अरविंदाला आता दुसऱ्या कोणत्याही कार्याकडे लक्ष देता येत नव्हतें. मधुकरही मुंबईस गेला होता. त्यामुळें ह्या बाहेरच्या मंडळींचा त्रास त्याना होईल, अशी स्थिति गेला महिना दीड महिना नव्हती. पाटलाचा गावातील शत्रु श्रीपती हा अद्याप कच्च्या कैदेंतच खितपत पडला होता. त्यामुळें पाटील पुष्कळसे निर्धास्त झाले होते !

खरें पाहिलें तर शेटजी काय किंवा पाटील काय, मूळ अंतःकरणानें दुष्टच होते असें नव्हे. पण शेटजींना धनाची व पाटलाना जमिनीची

हाव विलक्षण होती. ती साधण्याकरिता भलेबुरे मार्ग दोघेही योजीत असत. त्यामुळें शेटजींजवळ जसें धन वाढत होते, तशी पाटलाच्या पदरातही जमीन पडत होती. सोसायटीचे पैसे हातात खेळूं लागल्यानें पाटलानीं त्याचा स्वार्थाकरिता वाटेल तसा उपयोग केला होता व निशाणी आगठेवाल्या कित्येक लोकाच्या गळ्यास त्यानीं घट्ट पाश लावून ठेविला होता. सखारामाच्या गळ्याभोंवतीं तसा पाश पाटलानीं अगदीं गच्च आवळला होता, हें त्या बिचाऱ्यास कळलेंही नव्हत ! तो पाश ओढून त्याचा पुरा घात करण्याची वेळ अगदीं नजीक येऊन ठेपलेली होती.

तालुक्याच्या ठिकाणापासून सोनगाव पुष्कळ दूर असल्याने मामलेदाराची फेरी तिकडे क्वचितच होई. पाटील नम्रपणानें वागून कोणत्याही मामलेदाराचें प्रेम संपादन करीत. त्याकरिता वाटेल ती झीज ते सोशीत. त्यामुळें कोणत्याही मामलेदाराशीं त्याचा लोभ जमण्यास हरकत पडत नसे.

नवीन आलेले मामलेदार अद्यापि सोनगावीं येऊन गेले नव्हते. ते लवकरच तेथे येणार होते. त्या वेळींच पुष्कळ दिवस मनात धरलेला डाव पाटलाना साधून घ्यावयाचा होता.

दसरा झाल्यानंतर पाच सहा दिवसानीं सोनगावीं मामलेदार येण्याचा दिवस एकदाचा ठरला. पाटील व शेटजी याची मोठी धादल उडून गेली. गावचे रस्ते झाडूनझुडून अगदीं स्वच्छ ठेवण्यात आले. मामलेदाराच्या सरबराईची अगदीं जय्यत तयारी पाटलानीं केली. बरोबरच्या कारकुनाची मिजास कशी साभाळावयाची हेंही त्यानीं ठरवून टाकले !

त्या दिवशी साहेब आता येणार, मग येणार, अशा बातम्या गावात वरचेवर येत. मारामारी झालेली जागाही ते पाहणार असल्यामुळें श्रीपतीची मित्रमंडळी भितीनें आपापल्या शेतात निघून गेली ! पाटलानीं आपल्या बाजूचे दहा पाच लोक योग्य त्या सूचना देऊन चावडींत बसवून ठेविले होते !

मामलेदार तिसरे प्रहरीं आले. वाट खराब असल्यामुळें ते अगदीं थकले होते. तशात भर उन्हाचे आल्यामुळे ते अगदीं घामाघूम होऊन

गेले होते. पण तेथील काम उरकून त्याच दिवशीं परत जाणें त्याना जरुरीचें असल्यामुळें त्यानीं कामाची घाई चालविली.

आरंभीं सखारामाच्या शेताच्या लिलावाचें काम निघालें. त्यास पुकारलें; पण तो हजर नव्हता. पण त्याना काय वाटलें असेल तें असो, त्यानींच स्वतः तो गावीं आहे कीं नाहीं याचा तपास चालविला. ‘ तो अत्यंत थकला असून, त्याला येथें येण्याची ताकद नाही, तो आपल्या शेतावरच असतो,’ असें कोणसे म्हणालें.

मामलेदारानीं गावचा नकाशा पाहिला. मारामारीची जागा सखारामाच्या शेताजवळच आहे, हें त्यानीं जाणलें व तेच म्हणाले, “ चला, तेथेंच लिलाव उरकून घेऊ. म्हणजे दोन्ही कामें लवकर आटपतील ! ”

मडळी सखारामाच्या झोपडीपुढील आवारात आली. त्या वेळीं तो बाहेरील बाजूसच होता. त्याच्या हातात लहानशी कुऱ्हाड होती. बसल्या बसल्या तो जिजानें सरपणाकरिता जमा करून आणलेल्या काट्याकुट्याचे लहान लहान तुकडे करीत होता. त्याला काठीच्या आधाराशिवाय उभेंही राहता येत नसे, इतका तो थकलेला होता. राधाबाईची स्थितिही तशाच प्रकारची होती. थोडयाशा श्रमानेही ती अत्यत कासावीस होई.

त्या वेळीं जिजा आपल्या शेतात होती. तिन मोलमजुरीनें पेरणी करून घेतली होती. बागाईत जमिनींत जोंधळाच पेरावा लागला होता. त्या खरिपाच्या जोमदार पिकास पाहून तिला फार आनंद होत असे. कोणाही शेतकऱ्यास हेवा वाटेल असा तो जोंधळा फोफावला होता. श्रीपतीचें चिंतन करीत त्यातील तण काढण्यात जिजा रंगून जात असे. त्या वेळींही ती तोच उद्योग करीत होती. तें पीक उंच वाढल्यामुळें तण काढीत असता झोपडीच्या बाजूस काय चाललें आहे, हे कळण्यास मार्ग नव्हता.

मामलेदार व कारकून तेथें येण्यापूर्वी त्याच्याकरिता खुर्ची आणण्याची, जाजम आथरण्याची व्यवस्था झाली होती. सखारामाला त्याचे आश्चर्य वाटत होतें ! इतक्यात तेथें मामलेदार येऊन दाखल झालेही ! तावडतोब

लिलावाच्या कामास सुरुवात झाली व सखारामाला पट्टेवाल्यानें पुकारलें.

तो हात जोडून काठी टेकीत कसाबसा उभा राहिला.

त्याचें अंग थरथरत होतें ! भीतीने त्याची बोबडीच वळली होती !

मामलेदारांनीं हातात कागद घेतला व ते जोरात म्हणाले, "दहाशें सोळा रुपये तीन आणे तीन पै तुझ्याकडे सोसायटीची बाकी निघते. सखाराम तू भरण्यास तयार आहेस का? नाहीं तर आता मला तुझ्या शताचा लिलाव केला पाहिजे. सोसायटयाचं देणं काढता व इतक्या बाक्या फुगविता ? तगाद्यावर तगादे केले तरी पैची पोंच नाहीं. लवादापुढं मुळी तूं हजरच राहिला नाहींस. किती बेगुमानपणाची वागणूक ही ! "

आपल्या शेताचा लिलाव होणार असल्याचे शब्द कानीं पडताच सखाराम मटकन् खालींच बसला. त्याचे डोळे पाढरे होण्याची वेळ आली !

"आता वाईट वाटून काय उपयोग, सखाराम !" मामलेदाराना त्याची स्थिति पाहून करुणा आली व ते सौम्यपणे म्हणाले. " बाकी थकली, आज लिलावाची तारीख उजाडली, तरी तूं काहीं तजवीज केली नाहींस. आम्हाला आता तुझ्या शेताचा लिलाव करण्याशिवाय गत्यंतर नाहीं. आम्ही कायद्यानं बाधलों आहोत. बोल, तूं आता तरी ह्या देण्याची काहीं तजवीज करतोस का ? "

" साएब, " मामलेदाराच्या सौम्य शब्दामुळें सखाराम भानावर येऊन खोल गेलेल्या आवाजात म्हणाला, " माला सुसायटीचं देनं नाई ! माला लवाद का फवादबी ठावा नाई. मी गरीब मानूस आपल्या मरनानं मरतुया. माज्या डोसक्यावर धोंडा घालताया हा ! मारू नगा माला गरिबाला ! "

त्याला पुढें बोलवेना. त्याचा कंठ दाटून आला.

ते शब्द ऐकून ह्या कामात काहीं घोटाळा झाला असावा, असें मामलेदाराना वाटलें. त्यानीं कागद पाहिले. प्रत्येक कागदावर सखारामाचा निशाणी आंगठा होता. कागदोपत्रीं काम अगदीं बरोबर आहे, अशी त्यांची खातरी झाली. सखारामाच्या बोलण्यामुळें पाटीलही भिऊन गेले होते.

परंतु मामलेदाराची खातरी झाल्याचे पाहून त्यानाही जोर चढला.

मामलेदारानीं आणखी थोडा विचार केला. सर्व कागदावरील आंगठ्याची त्यानीं तुलना केली. ते आंगठे एकाच माणसाचे आहेत असें त्याना दिसलें. पण हे सखारामाचेच आहेत कीं काय, ह्याचा त्याना संशय आला. म्हणून त्यानीं एक कागद पुढे करून त्यास म्हटलें,

"सखाराम, ह्या कागदावर तुझा एक आगठा उठीव पाहूं !"

सखाराम इकडे तिकडे पाहू लागला. जिजानें आपल्याला कागद दाखविल्याशिवाय आगठे देऊ नका, असें त्याला सागितल होतें, म्हणून त्याची आगठा उठविण्याविषयीं चुळबूळ सुरू झाली. हें पाहून मामलेदार त्याच्यावर खेकसले, "बहिरा आहेस काय रे तूं ? कागदावर दिलेले आगठे बरोबर आहेत कीं नाहींत हें पाहण्याकरिता मी आगठा दे म्हणतों. पण तू स्वस्थच !"

ह्या वेळीं पाटील मामलेदाराच्या कानात कुजबुजले,

"बघा, कसा पक्का आहे म्हातारा हा !"

त्या वेळीं सखारामानें नाखुषीने त्याच्यापुढे ठेविलेल्या कागदावर आपल्या डाव्या हाताचा आगठा उठविला.

तो आगठा व सखारामाच्या लिलावाच्या प्रकरणातील कागदावरील आंगठे मामलेदारानीं बारकाइन पाहिले. सर्व आगठे सखारामाचेच आहेत, अशी त्याची खातरी झाली. त्या वेळीं ते उसळून म्हणाले,

"सखाराम, प्रत्येक कागदावर तुझेच आगठे आहेत, आणि तूं सोसायटीचं देणं काढल नाहींस असं खुशाल सागतोस. म्हातारपणामुळ तुला आठवत नसेल ! बोल, आता तरी ह्या देण्याची काहीं तजवीज करतोस, का लिलाव करावयाचा ? आम्हाला वेळ नाहीं. लवकर बाल. नाहीं तर लिलाव होत आहेच."

"साएब, माला सुसायटीचं देनं नाई म्हनतुया ना मी !" सखाराम धिटाइनें म्हणाला. "म्या चार इसा रुपय माज्या हिरीच्या कामाकरता काडल व्हत सुसायटीचं ! पन त्याच सालीं चार इसा आन याजाच बा

म्या दिल ह्या पाटलाजवळ ! इचारा त्येला ! मी खाटं बोलत नाई, आन कवाच बोललों नाई, साएब ! ”

मामलेदारानीं पाटलाकडे पाहिलें. त्या वेळीं ते अत्यंत नम्रपणें म्हणाले, “ रावसाहेब, असं कधीं होईल का ? ती दिसते ती विहीर बघा त्याची. तिच्या बांधलेल्या एका वेळ्याला तरी ऐशीं पुरतील का ? तो रुपये मजजवळ दिले म्हणतो, तर विचारा पावती आहे का त्याच्याजवळ ! म्हातारा गरीब दिसतो, पण फार लुच्चा आहे हा ! मी व रायबा जामीन आहोंत ह्याला. उगीच फंदात पडलों ह्याला जामीन राहून ! आम्हा-लाच बुडविण्याचा ह्याचा विचार. पण कायदा कळतोय कुठं याला ! रावसाहेब, तुम्ही लिलावच करा. त्याशिवाय ही कटकट थांबायची नाहीं. ह्याचं बघून सारं असंच म्हणूं लागतील. अगोदर वसूलच होत नाहीं मुळींसुद्धा ह्या सोसायटीचा. ”

मामलेदार विचारात पडले. इतक्यात सखाराम चवताळून म्हणाला, “ साएब, ह्यो बळ्या साफ खाटं बोलतुया ! मी रामाची आन घेऊन-शान सांगतुया तुमाला ! म्या माज्या पैशानं हीर बांदली. ह्येला बगवत नाई माजी हीर ! म्या चक्क वाजवूनशान दिलं रुपय सुसायटीचं रायबा-देकत ! पावती ह्येनं दिली नाई ! ह्योच लबाड है ! माजा गळा कापूं नगा ह्येच्या बोलन्यावरन ! इचारा रायबाला ! ”

मामलेदाराना सखारामाच्या बोलण्यात काहींसा प्रामाणिकपणा असावा, असें वाटत असलें तरी कायद्याप्रमाणे लिलाव करून मोकळें व्हावें, असेंही वाटत होतें. पण पाटलानींच रायबाला आपल्या बचावा-करिता पुढें केलें. रायबाला खोटें बोलणें जिवावर आलें होते. परंतु सखारामावर पाटलाने काढलेली खोटी बाकी त्यानें न भरली, तर आप-ल्याला चट्टा बसेल, अशी त्याची समजूत करून देण्यात आली होती. शिवाय पाटलानीं आपली मुलगी बच्चास देण्याचें ठरविल्यामुळें त्याला त्याच्या म्हणण्याप्रमाणे बोलणें भाग होतें.

तरीही रायबा आपणहून बोलण्यास घुटमळूं लागला. तेव्हा मामलेदार रागानें बोलले, " बोल खरं काय तें ! "

" साएब, " रायबा कापऱ्या स्वरात म्हणाला, " पाटील म्हनत्याती त्येंच खर है ! "

" साएब, " पुन्हा सखाराम म्हणाला, " साफ ख्वाटं बोलतुया ह्योबी. पाटलानं ह्येला मतिवलय ! "

" ए सखाराम, " मामलेदार त्रासिक स्वरात म्हणाले, " सारे लबाड व तूंच खरा वाटतं ! चकचकित निशाणी आगठे आहेत तुझे प्रत्येक कागदावर. पण अन्याय होऊं नये म्हणून मीं चवकशी केली. "

" साएब, " सखाराम म्हणाला, " म्या माजी पोरगी रायबाच्या पोरग्याला दिली न्हाई म्हनुशानी ख्वाटं बोलतुया ह्यो ! बळयाचा व माजा उबा दावा ! लेकानं कायबी सागूनशान माज आगटं घेतल्याती ! रामा रे रामा, काय दीस आनलास ह्यो माला ! तुला बगवतया तरी कसं ह्यें ! "

सखाराम डोक्यावर हात बडवून घेऊं लागला.

" रावसाहेब, " पाटील मामलेदाराची जास्त खात्री पटावी म्हणून म्हणाले, " काय सोंग करतोय म्हातारा पाहा. साऱ्यानाच लबाड म्हणतो. हाच डाबीस आहे, साहेब ! नुकताच सहा वर्षांच्या कैदेंतून सुटून आलाय ! "

" काय रे सखाराम, सोंग चालवूं नको असं ! " मामलेदार अधिकारवाणीनें म्हणाले. " किती वर्षांच्या कैदेंत होतास तू ! किती कांगावा चालविला आहेस ! लिलावाचं काम सुरू करतों मी ! "

" साएब, " सखाराम तारवटलेल्या स्वरात म्हणाला, " फोडा माज डोसक ह्या कुराडीनं ! बळ्यानंच मला कैदेमदीं घातल ! कसला न्याव है ह्या जगात ! माजी हाय जिमीन ! लिलाव कोन करनार तिचा ! सर्गामंदीं जाब द्यावा लागल सर्वांना ! "

सखाराम थरथर कापू लागला. त्याच्या तोंडातून पुढें शब्द निघेनात. मामलेदारानीं त्याच्याकडे दुर्लक्ष करून लिलावाच्या कामास सुरुवात केली.

त्या वेळीं जिजा गवताचा भारा घेऊन आवारात शिरली. ती आपल्याच आनंदात होती. तोंडानें ती काहींतरी गुणगुणत होती. आत पाय टाकल्या-बरोबर तिनें माणसाचा घोळका पाहिला. गवताचा भारा खालीं फेकून देऊन, पदर सावरून ती घरात जाऊ लागली.

काय प्रकार चालला आहे, हें तिच्या लक्षात येईना. मामलेदारानीं लिलाव चालू केलेला होता. पाटलानीं सुचविल्याप्रमाणें मधून मधून रायबा व ठकोजी लिलावाची रक्कम बोलत होते. शेटजीही एकदा दोनदा बोलले. सखारामाकडील आपलीही बाकी वसूल होईल, इतकी लिलावाची रक्कम चढावी, असा त्याचा हेतु होता. शेवटीं पाटलानीं तो लिलाव घेतला. आपली फार दिवसाची महत्त्वाकांक्षा पूर्ण झाली, असें त्याना वाटले.

एक वार, दोन वार असे शब्द शिपाई मोठ्याने बोलला.

जिजा घाबरेपणाने तें सर्व पाहात होती. मामलेदार कामात गर्क झालेले होते. शेवटीं ‘ तीन वार ’ म्हणून सखारामाची जमीन लिलाव झाली !

“ माजी जिमीन ! माजी जिमीन ! कोन तिचा लिलाव करनार ? ती कोन घेनार ? माज्या जिमिनींत कोन पाय घालतुया बगूं ! ” सखाराम बेफामपणें ओरडूं लागला.

“ तोंड आवर, सखाराम,” मामलेदार संतापले व म्हणाले, “ प्रत्येक कागदावर निशाणी आंगठा आहे तुझा. कायदेशीर लिलाव झाला आहे. एका महिन्यात रक्कम भर म्हणजे लिलाव रद्द होईल.”

मामलेदार उठूं लागले. सखारामाने निशाणी आंगठा हे शब्द ऐकले. पुढचे शब्द त्यानें ऐकण्याच्या अगोदरच तो जिजाकडे पाहून ओरडला,

“ पोरगी म्हनत व्हती, निशानी आंगठ्यान घात होतुया. पन माला तवा कळलं नाई. आता त्या आंगठ्यालाच हात दावतो मी ! ”

त्याच्या अंगात विलक्षण जोर चढला. त्याची मुद्रा भयंकर दिसूं लागली. त्याचें सर्व शरीर कापत होतें. तो दातओठ खात होता.

क्षणार्धात त्या जोरासरशीं त्यानें आपल्याजवळची कुऱ्हाड उचलली व

तिचा घाव आपल्या डाव्या हाताच्या आगठ्यावर घातला! तो आगठा खालीं तुटून पडलाच, पण त्याजवळचीं दोन बोटेंही त्या घावानें लोंबूं लागलीं व रक्ताची धार लागली. त्यानतर अंगांत आलेला जोर कोठल्या कोठें निघून गेला व सखाराम जमिनीवर धप्‌कन् आदळला! त्याचे डोळे पाढरे फटफटीत झाले. हातपाय गार पडूं लागले. छातीचे ठोके मंद झाले. त्या बिचाऱ्याचा प्राणच ह्या अन्यायी जगास कंटाळून त्याला सोडून जाऊं लागला.

डोळ्याचें पातें लवतें न लवते इतक्यात हा सर्व प्रकार घडला.

जिजानें ते पाहिल्याबरोबर तिच्या डोळ्यापुढे एकदम अंधारी आली. तिनें जवळ जाऊन " बाबा, बाबा, हें काय केलंत, मला सोडून कसे चाललात! " इत्यादि शब्दांनीं तिने आकात आरभला.

मामलेदारही हा सर्व प्रकार पाहून चकित झाले. जिजाच्या आकातानें तर त्याचें हृदय अगदीं भरून आले.

कारकून, शिपाई वगैरे मडळी सखारामाकडे धावली.

इतक्यात झोपडींतून हृदयभेदी किंकाळी ऐकू आली व राधाबाई तीरासारखी बाहेर आली. तिच्या तोंडून पुढील शब्द बाहेर पडले,

"तुमी माला सोडूनशान एकटंच कुट चाललाया! मी तुमासंगच येनार!"

एवढे शोकपूर्ण शब्द तिच्या तोंडून निघतात न निघतात तोंच तिनें आपला देह पतीच्या अंगावर धाड्‌दिशीं फेकला. त्यासरशीं तिची प्राणज्योत निघून गेली!



## प्रकरण एकूणतिसावें.

# निशाणी आंगठा.



हा भयंकर प्रकार पाहताक्षणींच तेथें जवळच असलेल्या गोप्याच्या डोळ्यातून एकसारखे अश्रु वाहूं लागले. ता तथून चटकन् बाहेर पडला व लागलाच रामगुफेकडे धावत निघाला.

त्या वेळीं रामगुफेत एकच धादल उडून गेली होती. मधुकरास येऊन थोडा वेळ झाला होता. त्याच्याबरोबर आईसाहेब व दुसरी एक वृद्ध बाई आली होती. आईसाहेब आल्यामुळे अरविंद व विमल ह्याच्यात आनंदी-आनंद पसरलेला होता.

इतक्यात गोप्या तेथें आला. त्याच्या डोळ्यातून अद्यापही एकसारखे अश्रु गळत होते. त्याला पाहून काहींतरी अत्यत दु:खदायक प्रकार घडून आला असावा, असें सर्वांना वाटले.

गोप्याने इत्थंभूत हकिकत थोडक्यात सागितली. ती ऐकून सर्वांचे डोळे भरून आले. अरविंद, मधुकर व विमल गोप्यासह मोटारीने लागलीच सखारामाच्या घराकडे निघालीं.

मामलेदाराच्या डोळ्यादेखत घडलेल्या त्या प्रकारामुळें त्याचेंही हृदय पिळवटून निघाले होते. काय करावें हे त्याना सुचत नव्हते. म्हणून ते बाहेर रस्त्यावर येऊन सचिंत उभे राहिले होते.

इतक्यात ही मंडळी तेथें आली.

त्याना पाहून मामलेदार आश्चर्यचकित झाल ! ही बोलण्याची वेळ नव्हे, असें जाणून अरविंद व विमल सखारामाच्या आवारात शिरलीं.

मधुकराचा हात हातात घेऊन मामलेदार आश्चर्यानें म्हणाले,

" तूं रे कसा इकडे ! मला कल्पनाही नाहीं, इथं तूं असशील ही ! "

" हा अरविंद इथं ठाणं देऊन बसलाय ना ! त्यामुळंच यावं लागलं मला इथं, बाळासाहेब ! " मधुकर म्हणाला.

मधुकर, अरविंद व बाळासाहेब ह्या तिघा मराठा तरुणाचा कॉलेजांत असताना फार स्नेह होता. त्याच्या त्या विद्यार्थीदशेच्या काळात देशाच्या उन्नतीविषयीं त्याचे मोठे कडाक्याचे वादविवाद चालत ! मागासलेल्या समाजाची हेळसाड जाणत्या लोकार्नी केल्यामुळेंच राष्ट्राला अशी अवनत स्थिति प्राप्त झाली आहे, असे बाळासाहेब जोराजोरानें प्रतिपादीत. ह्या सर्वांनीं आपापल्या मताप्रमाणें देशसेवा करण्याच्या प्रतिज्ञाही त्या वेळी केल्या होत्या. बाळासाहेबाचा त्या वेळचा आवेश पाहून सर्व चकित होत असत !

पण पदवी संपादन केल्यानंतर बाळासाहेबाच्या विचाराचे तारूं मात्र निराळ्या मार्गाकडे झुकलें ! स्वल्प प्रयत्नाने थोड्याच दिवसात त्यान मामलेदारी मिळाली. नुकतीच त्याची नेमणूक त्या तालुक्यात झाली होती.

त्या ठिकाणीं बाळासाहेब व मधुकर हे मित्रत्वानें बोलत असलेले पाहून पाटील जास्तच भयभीत झाले. आपल्या लबाडीमुळें हा सारा अनर्थ ओढवला आहे, आणि जर मामलेदाराना खरी स्थिति कळली, तर आपली धडगत नाहीं, हें ते पुरें जाणून होते.

थोड्या वेळानें गोप्या गडबडीने बाहेर आला व म्हणाला, " सकाराम-बाबानं ड्वाळ उघाडल्याती ! दादासाब त्येचा जीव परत आनल्याती वाटतं!"

हें ऐकून बाळासाहेब व मधुकर तिकडे घाईनें गेले.

तेथील देखावा अत्यंत करुणास्पद होता. राधाबाईचा प्राण अगोदरच निघून गेला असल्यामुळे अरविंदानें तिचें प्रेत एका बाजूस सारावयास लाविले होते. आईच्या अंगाशीं मिठी मारून जिजा शोक करीत होती. विमल तिचें सांत्वन करीत होती. सखारामाच्या अंगात थोडी धुगधुगी आहे असें वाटल्यामुळें अरविंदाने अनेक उपाययोजना चालविली. त्यामुळें थोड्या वेळानें त्यानें आपले डोळे उघडले. त्याबरोबर जिजा शोक

आवरून पुढें आली. तिला त्यानें डोळे भरून पाहिलें व कपाळाला कसाबसा हात लाविला. त्याच एका हातानें अरविंदास त्यानें नमस्कार केला व तो खोल गेलेल्या स्वरात म्हणाला,

" दादासाब, जिजा तुमच्या पदरात घालतुया. या तुमच्या भनीला तुमी साबाळा. मी जातुया देवाच्या दारीं ! "

त्याला पुढें बोलवेना.

" कांहीं काळजी करूं नका तुम्ही बाबा ह्या माझ्या बहिणीची." अरविंद दुःखपूर्ण स्वरात म्हणाला. " देवाच नाव घ्या तुम्ही आता ! "

सखाराम तोंडानें राम राम म्हणूं लागला. त्या वेळीं त्याची मान एका बाजूस झाली, त्यामुळें त्याचा तुटलेला डाव्या हाताचा आगठा त्याच्या दृष्टीस पडला. तो पाहून मोठ्या कष्टानें अरविंदाकडे पाहात पाहात एक एक शब्द अस्पष्ट अस्पष्ट सखारामाच्या तोंडून निघू लागला,

" दादा...मी देवाकड ... चाललुयाच ! ... पन...मी...पदार... पसरतु...तुमापुड...निशानी आगटयानंच ... माला मारलं !...तवा... दादा...संमद्याचा...निशानी आगटा...घालवा तुमी ऽऽऽ—"

सखारामाची वाचा बंद झाली व थोड्या वेळाने त्याचा आत्मा परमात्म्यात विलीन झाला.

ही सर्व वार्ता गावात तेव्हाच पसरली. साध्वी राधाबाईच्या सतीच्या वाणानें तर आबालवृद्ध आश्चर्यचकित झाले ! त्या पतिपत्नींच्या अंत्य दर्शनाकरिता लोकाची रीघ लागून गेली.

अरविंद, बाळासाहेब, वगैरेही प्रेतयात्रेत सामील झाले. बाळासाहेबाना त्या दुर्दैवी प्रसगाबद्दल अत्यंत वाईट वाटत होतें. अरविंदाच्या मनातील निश्चय जास्त खंभीर होत होता.

सखारामाच्या झोपडीच्या मागील बाजूस मोकळ्या मैदानांतच चिता धडधड पेटली. पुण्यात्मा सखाराम व साध्वी राधाबाई याचा पार्थिव अंश जळून खाक होऊं लागला.

त्याच्या अंत्यदर्शनाकरिता जमलेला अफाट लोकसमुदाय खिन्न अंतःकरणानें सभोंवार इळहळत बसला होता.

त्या पुण्यात्म्याच्या स्वर्गाच्या मार्गातील प्रवास सुखकर व्हावा म्हणूनच कीं काय, मद मद वारा वाहूं लागला. आकाशातील तारका त्या पुण्यात्म्याचें स्वागत करूं लागल्या. निशानाथ घाईघाईनें उदयाचलावर येऊन, त्या पुण्यशील पतिपत्नींचा मार्ग प्रकाशित करून, त्याच्यावर अमृताच्या धाराचा वर्षाव करूं लागला !

अरविंद, मधुकर व बाळासाहेब हे पावसानें स्वच्छ धुऊन निघालेल्या जवळच्या एका खडकावर बसले होते. निशाणी आगठ्यानें उडविलेल्या ह्या कहराची हकिकत अरविंदाने बाळासाहेबास सागितली. ती ऐकल्यानतर थोडा वेळ ते सर्वच स्तब्ध होते.

त्या स्तब्धतेचा भंग प्रथम बाळासाहेबानीं केला, व ते म्हणाले, "तुमच्यासारख्यानीं आमच्या कानावर जर खरी हकिकत पूर्वींच घातली असती, तर आजचा भयंकर प्रसंग टळला नसता का अरविंद ?"

" तुम्ही इथं येणार हें कळल होत तरी कोणाला ? " अरविंद शातपणें म्हणाला." तुम्हीं कागदपत्र पाहिले म्हणता ना ? तुम्हाला लबाडीचा संशय देखील आला होता, मग लिलाव कसा करूं लागलात ? "

" लबाडी आहे अशी खात्री झाली, तरी तोडी पुराव्यावरून व कागदपत्रावरून काम कायदेशीर होतं," बाळासाहेब गंभीरपणे म्हणाले. " मग आम्हाला तरी काय करिता येणार ? शिवाय झपाझप कामं उरकल्याशिवाय आमचं तरी चालणार कस ! आता उद्याच मला येथून वीस मैलावर दुसरं महत्त्वाचं काम आहे."

"मग खरी हकिकत समजली असती, तरी काय दिवे लावणार होतास तू, बाळासाहेब ?" मधुकर बाळासाहेबाकडे पाहात बोलू लागला, " अरविंदाला उगीच बोलतोस झालं ! मी जर तिथं असतो, तर लिलावाची रक्कम भरून त्या प्रामाणिक म्हाताऱ्याचा गळा मोकळा केला असता ! "

" किती जणाचे गळे मोकळे करणार तूं, मधुकर ? " अरविंद म्हणाला, " श्रीमंत असलास, तरी किती जणाना पुरा पडणार तूं ? "

" साऱ्या जगाची काळजी तूंच करावीस, अरविंद," मधुकरानें उत्तर दिले. " मी आपला सखारामापुरतं बोललों. कारागृहात असताना त्यानं आमच्याकरिता घेतलेल्या कष्टाची आठवण होते मला. आमचं सारं काम तोच उरकी. आणि किती आनंदानं ते ! अशा सद्गुणी माणसाला संकट-काळीं आपल्याला मदत करण्याची संधि मिळाली नाहीं, ह्याचंच वाईट वाटतं मला. "

" तूं मदत करतास, तरी त्यानं ती घेतली असती कीं नाहीं याचीच शंका आहे मला." अरविंद गंभीरपणें बोलू लागला. " अरे, मी किती-तरी वेळा तसा प्रयत्न केला. पण तो कुठला ऐकायला ? आपल्या कष्टाचं तेंच आपलं, असं तो सतत म्हणे. इतकच नव्हे, तर मदत करण्याची गोष्ट काढली कीं, त्याला अत्यंत दुःख होई ! दान घेण्यापेक्षा मरण बरं, असं त्याला वाटे. खरोखर त्याची ती साधुवृत्ति पाहून त्याच्या पायावर मस्तक ठेवावं, असं मला वाटे. "

" अरेरे, अशा साधुवृत्तीच्या माणसाचा छळ ग्रामकंटकानीं करावा अं ! " बाळासाहेब दुःखपूर्ण स्वरात म्हणाले, " किती दुष्ट अंतःकरणाचे लोक हे ! अशाच्या पापाला वाचा कशी फुटत नाहीं ? "

" सत्तेच काहींसं पाठबळ असल्यावर त्याच्या पापाला वाचा कशी फुटणार, बाळासाहेब ? " अरविंद म्हणाला.

मधुकराचे हे शब्द बाळासाहेबाना रुचले नाहींत, व तेही टोंचक स्वरात म्हणाले, " तुमच्यासारख्या लोकाची नेहमींच ओरड आहे ही ! अशा ग्रामकंटकाना आमच पाठबळ असत, असली विचारसरणी तुम्ही सोडावी हें बर. "

बाळासाहेबाचीं पूर्वीची मते कशींही असलीं, तरी आता त्याच्या हातीं थोडी का होईना, पण सत्ता नाचत होती. कळत न कळत का होईना, पण

त्या सत्तेचा स्वाभाविक मद त्याच्या ठिकाणीं उत्पन्न झाला होता हें जाणून अरविंद म्हणाला, " बाळासाहेब, माझं म्हणणं तुम्हाला चागलं कळलं का याचा विचार करा आधीं. मी सागतो तुम्हाला, ग्रामकंटकाना सत्तेचं पाठबळ कसं मिळतं तें ! कोणत्याही खेड्यात गेलात, तर तुमचा जादा सत्कार कोण करतात ? तुमच्या कानाशीं कोण लागतात ? तालुक्याचे गावीं येऊन विनाकारण तुम्हाला वरचेवर कोण भेटतात ? त्याना पटो वा न पटो तुम्ही म्हणाल त्या गोष्टीला होकार कोण देतात ? ह्या पुढं पुढं करणाऱ्या लोकांतच ग्रामकटकाचा बराच भरणा असतो. तुमच्यासारख्याची सलगी हें एक त्याचं गोरगरिबाना वचक बसविण्याच साधन असतं. मग अप्रत्यक्ष का होईना, पण त्याना सत्तेचं पाठबळ असतं, असं जर म्हटलं तर त्यात तुम्हाला लागण्यासारखं काय आहे ? "

" आमच्याकडे येणाऱ्यापैकीं गुंड कोण असावेत, हें आम्हाला कळत नाहीं वाटतं, अरविंद ? " बाळासाहेब म्हणाले. " त्याच्यावर तक्रारींचे अर्ज झाले, तर आम्ही त्याची गय करतों थोडीच ? "

" हेही खरं असेल, नाहीं कोण म्हणतो ? " अरविंद बोलू लागला, "पण तक्रार करावयास जावं दहावीस मैल चालून तुमच्याकडे ! अर्ज लिहिणारापासून तों वकिलापर्यंत सर्वांची तुंबडी भरावी ! पुराव्याकरिता अनेकाचे पाय धरावे ! इतका व्याप करण्याइतका अर्धपोटीं राहणाऱ्या सालस गोरगरिबाजवळ पैसा आहे कुठं ? शिवाय हे ग्रामकटक आपल्या कामात चागलेच कसलेले असल्यानं त्याना पेचात धरणं कठिण असत. पुन्हा रोज त्यांचच तोंड पाहण्याचा ह्या गोरगरिबाना प्रसंग. हे गुंड केव्हा काय करतील याचा नेम नसतो, बाळासाहेब ! "

"आमच्यापुढं तक्रार आल्याशिवाय आम्हाला काहीं करिता येत नाहीं." बाळासाहेब शातपणे म्हणाले, " आणि तीत जर प्रत्यक्ष लबाडीच आमच्या प्रत्ययाला आली, तर मात्र आम्ही कोणाचा मुलाजा ठेवीत नाहीं. पण लोकातील भित्रेपणा व निरक्षरता यापुढं हात टेकावे लागतात आम्हाला ! '

"बरोबर म्हणता, बाळासाहेब, तुम्ही!" अरविंद म्हणाला, "पण लोकातील भित्रेपणाचं कारण कोणतं ? त्याना कशाची भीति वाटते ? ती कशी नाहींशी होईल ? मी तर म्हणतों लोक साक्षर असतील व त्याना थोडाबहुत कायदा कळेल तर निरक्षरतेमुळं तरी होणाऱ्या गुंडाच्या चाळ्यांस बराचसा आळा पडेल."

"हें अगदीं खरं आहे," बाळासाहेब म्हणाले, "सर्वच लोक साक्षर झाले तर निशाणी आंगठा कुठंच दिसणार नाहीं; मग तूं म्हणतोस तेच काय पण दुसरे अनंत फायदे होतील. पण हें कार्य व्हाव कसं ?"

इतक्यात सखारामाच्या झोपडींतून जिजाचा अत्यंत करुणास्पद शोकस्वर ऐकूं येऊं लागला. तिला घेऊन विमल मोटारीकडे येत होती. तिचें सांत्वन करण्याचा ती कमालीचा प्रयत्न करीत होती.

त्या वेळीं एकदम बाळासाहेब म्हणाले, "ह्या तरुण मुलीची काळजी कोण बरं घेणार ? साराच प्रकार विलक्षण घडून आला ! अरविंद, तुझे विचार ऐकण्यास पुन्हा केव्हा तरी येईन मी इकडे. पण मला आधीं सांग, त्या मुलीकरिता मी काय करूं ते !"

"बाळासाहेब," अरविंद शांतपणें म्हणाला, "तिची काळजी नको तुम्हाला. माझी ती बहीण आहे. सखारामानं अंतकालीं माझ्या पदरात तिला घातलं आहे. मी तिच्याविषयींचं माझं सर्व कर्तव्य पार पाडीन."

बाळासाहेब स्तब्ध बसले. त्याच्या मनात काहीं निराळेच विचार त्या वेळीं आले होते. पण ते बोलून दाखविण्याची ती वेळ नव्हती.



## प्रकरण तिसावें.

# त्यागी अरविंद.



भय्यासाहेबाची प्रकृति अद्याप पूर्ववत् ताळ्यावर आली नव्हती. ती केव्हा येईल हेंही सागता येण्यासारखें नव्हतें. ते काहींसे शुद्धीवर येत, त्या वेळीं पूर्वीप्रमाणें बोलत असत. पण काहीं थोडें का त्याच्या मनाविरुद्ध घडलें कीं, त्याचें मस्तक लागलींच भ्रमे. जवळ जवळ गेले दोन महिने ते आथरुणावर पडूनच होते. खोलीबाहेर पडण्याइतकीही त्याच्या अंगीं शक्ति नव्हती.

अद्याप त्याना भेटण्याची अरविंदानें कोणालाही परवानगी दिली नव्हती. विमलला तर तिकडे फिरकण्याची त्यानें अगदीं सक्त मनाई केली होती. आईसाहेब आल्यापासून त्या मायलेकींचा काळ आनंदात जात असे. मुंबई-च्या कोंदट वातावरणातून त्या रम्य जागीं राहिल्यानें आईसाहेबाच्या मनाला प्रसन्नता वाटत होती.

निकट सहवासामुळें जिजाच्या थोर गुणाची ओळख विमलला जास्त जास्त होऊं लागली. जिजा दुःखानें होरपळली होती, पण अरविंदासारखा अत्यंत प्रेमळ बंधु तिला परमेश्वरकृपेनें लाभला होता, त्यामुळे व विमलच्याही प्रेमळपणामुळें अलीकडे ती उल्हसित दिसूं लागली होती. रानावनात उन्हानें करपून जात असलेली जाईची वेल एकाद्या सुंदर उपवनात नेऊन लाविली, तर ती लवकरच टवटवीत दिसूं नाहीं का लागणार !

त्या कार्तिक महिन्यातील एके दिवशीं तिसरे प्रहरीं विमल व जिजा त्या राममंदिराकडे चालल्या होत्या. त्याना रामकुडातून वाहणारा शुभ्र जल-प्रवाह मोठा मनोहर दिसत होता. तेथून मागील बाजूच्या उंच टेकडीकडे

पाहिले कीं, ती हिरवागार शालू नेसली असून तिच्या गळ्यात नाना प्रकारच्या फुलाचे हार विलसत आहेत, असे वाटत होतें. तो रमणीय देखावा पाहात पाहात राममंदिराच्या मागील बाजूस त्या खुल्या दिलानें बोलत बसल्या. तेथें किती वेळ गेला, हे त्याचें त्यानाच कळलें नाहीं, इतक्या त्या हास्यविनोदात रंगून गेल्या होत्या. पण सायंकाळच्या सुमारास रामाच्या देवळात कोणीतरी स्फुदत असल्याचें त्याना ऐकू आलें, त्यामुळें त्याचें लक्ष तिकडे गेलें. त्या वेळीं पुढील करुण शब्द त्याच्या कानीं आले.

" रामा, किती रे अंत पाहणार माझा तूं ! दोन तपं माझी झालेली तपश्चर्या वायाच जाणार का ! "

त्यानतर कांहीं वेळ स्तब्धता पसरली. नंतर पुन्हा दुःखाचे हुंदके ऐकूं येऊं लागले. विमल व जिजा ह्याना आतां तेथें बसवेना. तेथून त्या देवळाच्या पुढील बाजूस आल्या. त्या दोघींना देवळात येत असलेल्या पाहून आतील म्हातारीने आपले डोळे पुसले, व तिने आपलें मस्तक रामाच्या पायावर ठेविलें.

ती म्हातारी विमलच्या आईबरोबर मुंबईहून तेथें आली होती. ती आपली चुलत मावशी आहे, हें विमलला तिच्या आईकडून कळले होतें. त्या म्हातारीचें मुख नेहमीं एकाद्या तापसीप्रमाणें तेजस्वी दिसे. त्या दोघींना पाहिल्याबरोबर आपलें दुःख गिळण्याचा तिने मनस्वी प्रयत्न केला. पण डोळयात तरंगणारे अश्रु तिला आवरता येईनात. त्या वेळीं मावशीबरोबर बोलून तिच्या दुःखाचा उलगडा करून घ्यावा, असें विमलला वाटले. पण इतक्यात विमलची आईच तेथे आली. त्यामुळें त्या दोघी तेथून घराकडे वळल्या.

विमल भय्यासाहेबाच्या खोलीवरून सहसा जात नसे. पण आताच पाहिलेल्या त्या करुण देखाव्यामुळें तिचें मन अस्वस्थ झालें होतें, व मावशीच्या दुःखाचें कारण शोधण्यातही ती अगदीं व्यग्र झाली होती. त्यामुळें पाय उचलीत आपण कोणत्या वाटेनें चाललों आहोंत, ह्याचेंही तिला भान नव्हतें.

त्याच वेळीं भय्यासाहेबाच्या खोलीचें दार उघडें होतें. भय्यासाहेबांची प्रकृति पाहून औषधें आणण्याकरिता अरविंद तेथून नुकताच आपल्या खोली-कडे गेला होता. भय्यासाहेब दारातच आरामखुर्चीवर पडले होते. समोरील वृक्षावर चारा घेऊन आलेल्या आईला तिचीं पिलें किलबिल करीत बिलगत होतीं. त्या पिलाच्या हालचालीकडे भय्यासाहेबाची दृष्टि अगदीं खिळून राहिली होती.

इतक्यांत विमल त्या दारावरून चालली. भय्यासाहेबाचें तिच्याकडे एकदम लक्ष गेले व त्याच्या तोंडून पुढील शब्द बाहेर पडले,

" विमल, ये ना इकडे ! मुंबईहून केव्हा आलीस तूं ! चार शब्द बोल ना माझ्याशीं ! मला उठून उभं देखील राहता येत नाहीं. ये अशी ! आई ! आई ! आईग आई !...... "

भय्यासाहेब निश्चल नजरेनें विमलकडे पाहूं लागले. त्याच्या डोळ्यात फिकेपणा आला होता. त्याच्या नजरेत त्या वेळीं एक प्रकारचा सात्त्विक भाव प्रतीत होत होता. त्याचा चेहरा तर अत्यंत सुकून गेलेला असून, त्याना पाहिल्याबरोबर कोणाच्याही हृदयात दया येईल अशी त्याची अवस्था झाली होती. त्याच्या तोंडातून निघालेला प्रत्येक शब्द दयेची याचना करीत आहे, असे वाटत होतें. ते पूर्वीचे भय्यासाहेब व हल्लींचे भय्यासाहेब ह्याच्यांत जमीनअस्मानाचे अंतर पडलें होतें ! त्याच्या उद्गारावरून मध्यंतरीं घडलेल्या गोष्टींचें त्याना भानही नव्हते, असें विमलला दिसून येत होतें.

विमलचें स्त्रीहृदयच तें ! त्याना तशा स्थितींत पाहून तिच्या मनात दया उत्पन्न झाली. त्या वेळीं ती मागचा सारा प्रकार विसरली. खोलींत जाऊन त्याच्याजवळ ती एका खुर्चीवर बसली. भय्यासाहेब इकडे तिकडे हात हालवीत होते. इतक्यात त्यानीं, 'आई ग आई,' असें म्हणून तिचा हात घट्ट पकडला व समाधानीचा सुस्कारा टाकला !

तो हात सोडवून कसा घ्यावा, ह्या विचारात ती पडली. त्यांनीं तो हात बळकट धरिला होता. जास्त ओढाताण करावी, तर त्या वेळींच त्यांचें

मस्तक भडकेल, असें तिला वाटूं लागलें. त्याच्या मनाला समाधान वाटेल, असें बोलूनच आपला हात हळूच सोडवावा, म्हणून ती सहज म्हणाली, " येईल बरं आई तुमची आता ! भेटेल तुम्हाला लवकरच ! मग आपण सगळींच मुंबईस जाऊं ! "

तिच्या तोंडून ते शब्द निघताच भय्यासाहेब तिच्याकडे टक लावून पाहूं लागले. त्यांनीं तिचा हात जास्तच घट्ट धरिला. इतक्यात अरविंद तेथें आला. विमल त्यामुळें अत्यंत गोंधळली. तो आल्याबरोबर भय्यासाहेबच त्याला म्हणाले, "डॉक्टर, माझी आई आली म्हणते विमल ! खरंच का हो आली ! माझ्याकडे घेऊन या ना तिला लवकर ! तीच मला औषध देईल. तुम्ही नका देऊ औषध आता मला ! "

अरविंदाच्या लक्षात सर्व प्रकार आला. विमलची सुटका तेथून कशी करावी ह्या विचारात तो पडला आणि प्रसग जाणून तो अगदी प्रेमळपणें म्हणाला, "आता तुमची आईच येईल इकडे ! तुम्ही भेटणार ना तिला !"

हे शब्द ऐकताच भय्यासाहेबानीं विमलचा हात सोडला. ते अरविंदाच्याच गळ्यास मिठी मारूं लागले. इतक्यात विमल तेथून निसटली. त्याच सधीस विमलची आई व मावशी त्या दारावरून चालल्या होत्या. भय्यासाहेब म्हणत होते, " आई ग आई तूं केव्हा आलीस ! "

ते शब्द त्या दोघींच्या कानांवर पडले. त्यामुळें त्या तेथें थबकल्या. पण आणखी जास्त घोटाळा होऊं नये, म्हणून अरविंदानें तें दारच लावून घेतलें व भय्यासाहेबाना गुंगीचें औषध देऊन त्याने बिछान्यावर निजविलें.

पण ते आपल्या बिछान्यावर गुंगी येईपर्यंत " आई ग आई, तूं केव्हा आलीस ! " असे गुणगुणत होतेच.

दुसऱ्या दिवशीं प्रातःकाळीं अरविंद नेहमींप्रमाणें फिरण्याकरता बाहेर पडला. त्या वेळीं त्यानें मुद्दाम विमललाही बरोबर घेतलें होतें.

अरविंदाबरोबर असा फिरावयास जाण्याचा प्रसंग कित्येक दिवसानीं तिला लाभला होता. त्यामुळें तीही अत्यंत खुलली होती. तीं उभयतां

बोलत बोलत रामगुंफेच्या मागील बाजूची टेकडी चढत होतीं. त्या वेळीं नुकताच सूर्योदय झाला होता. त्याचे किरण त्याच्या मार्गातील लताकुंजावर घुटमळणाऱ्या धुक्याला धुडकावून लावीत होते. त्यामुळे त्या नानाविध वनस्पतींवर अपूर्व तेज विलसत होतें !

टेकडीवरील गवताळ भागातून जात असता मध्येंच लपलेल्या एका लहानशा खड्ड्यात विमलचा पाय पडला. त्याबरोबर तिचा एका बाजूस तोल गेला. तेव्हा लागलींच अरविंदानें तिचा हात पकडला. विमलनें हसत हसत त्याच्याकडे पाहिलें. त्याच्याही मंद स्मिताने तिचे सर्वांग पुलकित झाले. लगेच तिनें खालीं मान घातली, व दुसऱ्या हातानें आपला पदर सावरला. तिनें आपला हात सोडवून घेण्याचा थोडा देखील प्रयत्न न करिता तीच हसत हसत म्हणाली,

" काय बाई, आनंदान डुलणारी ही हिरवळ आपल्या बुडाशीं असलेल्या खड्ड्याचा थागपत्ता सुद्धा लागूं देत नाहीं ! "

विमलच्या तोंडून हे शब्द सहज बाहेर पडले होते. पण अरविंदाला त्या बोलण्यात काहीं खोल अर्थ आहे असें वाटले. आज तो काहींतरी विशेष हेतु मनात धरून विमलला घेऊन आला होता. त्याला त्या वेळच्या आपल्या निश्चयाचा सात्विक आनंदही वाटत होता. विमलनें तो आपला गूढ भाव जाणला कीं काय, असें त्याला वाटलें. तो कसल्या तरी विचारात आहेसें पाहून पुढें पाय उचलीत असता विमलच म्हणाली,

" आतापर्यंत स्वारी एकसारखी बोलत होती, मग आताच्या खड्ड्यानं अडथळा आणला कीं काय बोलण्याला ! "

इतक्यात अरविंदाचा पायही एका निसरडीवरून थोडासा घसरला. त्यामुळें त्याचा तोल विमलच्या अंगावर गेला.

अरविंदाला विमलचा तो स्पर्श अत्यंत सुखदायक वाटला. त्या दोघानीं एकमेकाकडे पाहिलें. दोघाच्याही मुखावर हास्य विलसत होतें. आणि त्याच्या आरक्त मुखमंडळावर दिनराजाच्या कोमल किरणानीं अप्रतिम तेज

ओतले होते. त्या वेळीं झटकन् भानावर येऊन अरविंदानें आपला तोल सावरला व म्हणाला, "काय म्हणत होतीस विमल ? हूं ! आलं माझ्या लक्षात. ह्या सुंदर हिरवळीला जर लाथाडलं तर तिला मुळींच राग येऊं नये, असं का वाटतं तुला ?"

विमलनें त्याच्याकडे डोळे भरून पाहिले. तिला त्याच्या बोलण्यात पुष्कळ गर्भित अर्थ आहे, व आपल्याविषयींची त्याच्या मनातील खळबळ ह्या उद्गारानीं बाहेर पडत आहे, असे वाटून तिला अत्यंत आनंद झाला.

बोलत बोलत त्यानीं टेकडीचा माथा गाठला. त्या वेळीं अखिल चराचर सृष्टींत मूर्तिमंत चैतन्य खेळत असलेलें तेथून दिसत होतें. त्या वेळचा तो अद्भुतरम्य देखावा पाहण्यात दोघांचाही थोडा वेळ गेला. नंतर ती जोडी तेथे बोलत बसली. त्याच्या बोलण्यात सहजच भय्यासाहेबाच्या करुण स्थितीचा विषय निघाला. त्या वेळीं अरविंद म्हणाला,

" भय्यासाहेबासारख्या तडफदार तरुणाची किती केविलवाणी स्थिति झाली आहे पाहा ! बिचारा पूर्वस्थितीवर केव्हा येईल कोण जाणे ! "

" खरंच अरविंद, " विमल म्हणाली, " मला त्याचा पूर्वी भारी राग आला होता. त्याचं तोंड देखील पाहू नये, असं मला वाटत होत ! पण काल त्याचा केविलवाणा स्वर ऐकून मला त्याची कींव आली, व मी जवळ गेलें. अद्याप वेडाची लहर कांहीं गेलेली दिसत नाहीं त्याची. काय होणार आहे त्या बिचाऱ्याची स्थिति हेंच समजत नाहीं. पण अरविंद, त्याचीच काय पण खेड्यापाड्यातील गोरगरिबाची शुश्रूषा आनंदानं तुला कशी करिता येते ह्याचं कोडं मात्र मला अद्याप उलगडत नाहीं. डॉक्टर लोक असे श्रम घेतात, नाहीं असं नाहीं, पण त्यात त्याची मुख्यतः धनप्राप्तीची आशा असते नाहीं ! "

" उलगडता न येण्याइतकं हे कोडं अवघड नाहीं, विमल !" अरविंद म्हणाला, "त्यागवृत्ति अंगीं मुरली म्हणजे तिला पोषक असं कार्य ती शोधीतच असते. तसं कार्य न मिळालं, तर मात्र मनाची अस्वस्थता वाढते."

" तू काय म्हणतोस तें अद्याप चागलं लक्षात येत नाहीं माझ्या, अरविंद ! " विमल म्हणाली, " एकाग्रान त्यागी वृत्तीनं का होईना, पुष्कळसे श्रम केले, तर त्याचा परिणाम त्याच्या शरिरावर व मनावर काहींही होणार नाहीं का ! मग त्याची वृत्ति सतत आनंदी कशी राहू शकेल ! "

" मला वाटतं ही गोष्ट अनुभवानंच कळणार आहे, विमल ! " अरविंद म्हणाला. " आता खेड्यापाड्यात जनसेवा करीत राहण्याची तुझी तयारी झाली आहे ना ! मला परत मुंबईस न्याव, म्हणून तू इकड आलीस, पण माझ्याबरोबर खडयापाडयात राहूं इच्छितेस. म्हणजे शहरी सुखाचा त्याग करण्याची वृत्ति तुझ्यात उत्पन्न झाली नाहीं का ! ह्याच वृत्तीची वाढ होत गेली, म्हणजे तुला त्यागानं मिळणाऱ्या आनंदाची गोडी अनुभवण्यास मिळेल, आणि तुला वाटणाऱ्या कोडयाचा आपोआपच उलगडा होईल. "

" खरंच सागूं का अरविंद ! " विमल म्हणाली, " मी तुझ्याबरोबर खेडयापाडयात राहूं इच्छितें, त्यात माझी त्यागवृत्ति ती कसली ! तुझ्या खऱ्या शुद्ध प्रेमाचा ठेवा माझ्या पदरीं पडतो, म्हणजे मी केवढा मोठा स्वार्थ साधून घेत आहे बर ! "

तिच्या ह्या प्राजल बोलण्याचें अरविंदाला कौतुक वाटलें तो अगदीं मनापासून हसला. त्या वेळीं विमल आनंदानें म्हणाली,

" का ! हसतोससा भारी ! माझा भोळा भाव मी तुला सागितला. मला लपंडाव साधत नाहीं, अरविंद ! "

" बघ, आलीस आपल्या मूळच्या वळणावर ! " अरविंद म्हणाला, " मला हसू एवढ्याकरिताच आलं कीं, ज्याला प्रेम म्हणून तूं म्हणतेस, तें माझ प्रम तुझंच होतं. तूं नवीन असं काय मिळविलस ! तुझ्या प्रेमाचा ठेवा मात्र माझ्यापासून दूर दूर पळत होता, तो पुन्हा माझ्या हातीं आला, ह्यात माझाच स्वार्थ साधला ! तुझा कसला ! "

त्या वेळीं तिला त्यापूर्वी त्याच ठिकाणीं भय्यासाहेबाबरोबर बोलत बसल्याची आठवण झाली. अरविंद म्हणतो तें काहीं खोटे नव्हे, हें तिचें

तिलाच पटूं लागले. ती थोडा वेळ विचारात पडलेली पाहून अरविंदच म्हणाला, "का पटलं ना माझं म्हणण तुला ! माझा तर लपंडाव नव्हता ना !"

" झाल्या गेल्या गोष्टी पुन्हा कशाला काढावयाच्या आता ! " विमल म्हणाली, " इथला शेटजी तो किती किंमतीचा, आणि त्याच्या पत्रान मी इतकी वेडी कशी झालें, ह्याचंच राहून राहून मला आश्चर्य वाटतं, बाई ! "

" हे काय बुवा, शेटजीचं आणखी कसलं पत्र म्हणतेस तूं ! " अरविंद आश्चर्यानें म्हणाला, " ह्याचा तर थागपत्ताच अद्याप मला लागूं दिलास नाहीं मुळीं ! "

" त्याच पत्रानं इतका घोटाळा उडाला, अरविंद ! " विमल खेद-पूर्वक म्हणाली, " खरोखर आम्ही स्त्रिया किती जरी शिकलो, तरी प्रेमात कोणी भागीदार आहे, असा नुसता संशय जरी आम्हाला आला तरी आमच्या मनाचा भडका उडून जातो, हे मात्र खरं ! "

" म्हणजे काय म्हणतेस तूं ! " अरविंद म्हणाला, " गावच्या पैशाच्या उलाढालींत शेटजी पुष्कळाना हात दाखवितो, तसा आपल्या प्रेमाच्या बाबतींतही त्यानं आपल्याला हात दाखविला म्हणतेस ! आणि त्यावर तुझा विश्वास बसला ! "

" अरविंद, " विमल जरा कापऱ्या स्वरात म्हणाली, " झाल खर अस्सं ! जिजाइतकी सुंदर स्त्री लाखात देखील नसेल. तिच्याबरोबर तू ह्या गावीं आलास. मला विसरलास. इतकंच नव्हे, तर मला वचनातून मुक्त केलं म्हणून तूं लिहिलस. नंतर शेटजींचं पत्र अचानक माझ्या हातीं आल. मग स्त्रीस्वभावानुरूप माझा संशय बळावला. मी भाबावून गेलें. ह्याबद्दल तूं मला दोष देणार नाहींस ना ! "

तिच्या मनातील नाजूक भावनेच्या खळबळीचें प्रतिबिंब तिच्या चेहेऱ्या-वर उमटलेलें त्याला दिसत होतें. त्याच्या मनात कसलाच सशय नव्हता. तो तिला कसलाच दोष देत नव्हता. त्यामुळें तो झटकन् म्हणाला,

" विमल, तुला दोष मी काय म्हणून देणार ! पण शेटजींच्या पत्राचा

तूं जो उल्लेख केलास, तो मला कांहीं कळत नाहीं. त्यानं तर माझा पुष्कळच उपयोग करून घेतला. आणि तुमचा गैरसमज होईल, अस पत्र त्यानं लिहिलं म्हणतस ! असल्या लोकाच्या करणीनं अडाणी लोक फसतात, पण तुमच्यासारख्याचीही त्यानं दिशाभूल केली ! मोठंच नवल वाटतं मला ! असल पत्र तरी त्यानं काय लिहिलं बुवा ? ”

मनातील मळमळ केव्हा तरी ओकून टाकावी असें तिला वाटत होते. त्यामुळें ती तें पत्र अरविंदाला प्रसगानुरूप दाखविण्याकरिता आपल्या ब्लाऊजच्या खिशात दोन तीन दिवस ठेवीत होती. ते तिने त्या वेळीं बाहेर काढलें. आपल्या कापऱ्या हाताने ते तिने अरविंदाच्या हातीं दिलें आणि त्याच्या मुखचर्येकडे ती लक्ष देत बसली.

अरविंदाने ते पत्र वाचले व तो मनातल्या मनात हसला आणि विमलला म्हणाला, “ मग ह्या शेटजींच्या पत्रानं मोठी मजा केली म्हणावयाची ! ह्या पत्रामुळच तूं इकड आलीस ना ? माझी कसोटीच पाहण्याचा तुझा विचार होता वाटतं ! तुम्हा बायकाचा काय नियम सागावा ! अद्यापही तुझ्या मनातील संशय गेला कीं नाही, हे तरी कोणीं सागावं ! मधुकराला तरी विचारावयाच होतंस ! किंवा तुम्हा सर्वांचा एकच ग्रह झाला कीं काय न कळे. ग्रामकंटकाचे विषारी काटे चागल्या जाणत्या माणसानाही बोचतात म्हणायचे ! ”

अरविंदाने एक सुस्कारा टाकिला. तो विमलकडे पाहूं लागला. ती मनात अत्यंत खजील झाली होती. जिजाच्या मोठ्या मनाचा व तिच्या पवित्र वर्तनाचा ठसा तिच्या मनावर चागलाच उमटला होता. विमलच्या मनातील सत्प्रवृत्तीची टोचणी तिला त्या वेळीं स्वस्थ बसूं देईना. ती धिटाईनें म्हणाली, “ अरविंद, झाल खर असं ! नुसता माझ्या मनाला संशय येऊन राहिला असता, तर किती तरी बर झालं असतं ! हे पत्र मला अचानक मिळालं, आणि तें इकडे येण्याच्या वेळीं ! दादाला ह्या पत्राचा खुलासा विचारावयासही माझं मन कचरलं ! माझ मनही माझ्या ताब्यात राहिलं

नाहीं. स्वाभिमान खवळला. इथं मी येताच त्याला पोषक असाच देखावा मला दिसला ! आणि काय सांगूं, अरविंद ! माझं मन किंचित्काल चळलं खरं ! तुझ्या त्यागी वृत्तीची, तुझ्या उदार हृदयाची, खरी खरी कल्पना मला इथं आली. काय काय घडलं ते तुझ्यापुढं ओकल्याशिवाय माझ्या मनाला स्वस्थता लाभणार नाहीं. तुझ्या मनाला वेदना होणार नाहींत ना ?"

ती गहिंवरली. तिच्या प्रांजल बोलण्याचा अरविंदाच्या मनावर विलक्षण परिणाम झाला. त्याने तिचा हात धरला, व तो तिला म्हणाला,

"काहीं का असेना, तूं इथ आलीस म्हणून तर तुला माझं जनसेवेच काम पटल ! अज्ञ जनतेची सेवा करण्याची तुझ्या मनाची तयारी झाली ! हा का थोडा थोडका फायदा झाला असल्या पत्रानं ? बोल विमल, काय वाटेल ते सांग आता. मला काहीं त्याचं वाटणार नाहीं ! "

"बघ अ, अरविंद," विमल गभीरतेने म्हणाली, "तुझं मन खबीर राहील ना ? माझ्यावर तुझ खरं खरं प्रेम आहे ना ? माझ्या मानसिक दोषाची क्षमा तूं उदार मनानं करशील ना ? "

"विमल," अरविंद म्हणाला, "सगळं आलं माझ्या लक्षात ! तूं आपल्या समाधानीकरिता खुशाल बोल."

विमलने त्या पत्रामुळे कोणता परिणाम झाला; भय्यासाहेबाच्या मायाजालात क्षणभर का होईना, आपण कसे गुरफटलो, त्यातून सुटण्याचा कसा प्रयत्न केला, इत्यादि, इत्थंभूत वृत्तांत त्याला सांगितला. त्यावर तो काय म्हणतो, हें जाणण्यास आतुरतेने ती त्याच्याकडे पाहूं लागली. थोड्या वेळाने तो म्हणाला, "भय्यासाहेब हे कोण ? कुठले ? मला त्यांची तशी फारशी माहिती नाहीं. तुला तरी आहे का ? बिचारा बुद्धिमान् आहे. त्याच्या ह्या गुणाला जर योग्य वळण मिळेल, तर जनसेवेला त्याचा फार उपयोग होईल. पण आजची त्याची स्थिति मात्र काळजी करण्यासारखी आहे ! "

"तो दादाचा स्नेही आहे एवढंच तुला व मला ठाऊक आहे, अरविंद !" विमल म्हणाली, "त्यानं आम्हाला चित्राच्या कामात आपलेपणानं फार

फार मदत केली. तें काहीं का असेना, पण त्याची प्रकृति काळजी करण्यासारखी आहे म्हणतोस, तर त्याला द्याव एखाद्या दवाखान्यात पाठवून!"

अरविंद काहीं वेळ बोलला नाहीं. तो खालीं मान घालून कसला तरी विचार करीत होता. ती एकसारखी त्याच्याकडे पाहात होती. शेवटीं तिलाच राहवेना म्हणून ती म्हणाली, "कसला विचार करत बसला आहेस ह्या वेळीं? त्याची शुश्रूषा एखाद्या दवाखान्यात चांगली होणार नाहीं का? त्याच्या शुश्रुषेत जाणारा तुझा वेळ तुझ्या आवडत्या लोकसेवेच्या कामास मोकळा होणार नाहीं का? मग जास्त विचार करण्यात काय मतलब आहे, अरविंद?"

"विमल," अरविंद थोडा थांबला. पुढें त्याच्या तोंडातून लवकर शब्द बाहेर निघेनात. शेवटीं निश्चयाने तो म्हणाला, "त्याच्या आजाराचं निदान बरोबर झाल आहे मला; त्याच्या त्या लहरींतील बडबडीवरून तो लहानपणापासून फार दुःखी असावासा दिसतो. मायेचा म्हणा किंवा खऱ्या प्रेमाचा म्हणा, ओलावा त्याला मिळाला तर तो पूर्वस्थितीवर येईल कदाचित्!"

"असंही असेल कदाचित्!" विमल हळुवार स्वरात म्हणाली, "त्या रात्रीच्या प्रसंगावरून तूं म्हणतोस तसं मला देखील वाटतं. पण त्याला काय करणार आपण?"

"तेंच मी आज बोलावं म्हणून इथं तुला घेऊन आलों." अरविंद निश्चयी स्वरात म्हणाला, "मला काय म्हणावयाचं आहे तें माझ्या तोंडातून निघेना. पुष्कळ प्रयत्न करितों, पण तें बोलावं कसं, हेंच मला समजत नाहीं मुळीं!" एवढें बोलून अरविंद थांबला.

दिनराज झपाट्यान मार्गक्रमण करून बराच वर आला होता. त्यामुळे त्याच्या किरणाची प्रखरता भासूं लागली होती.

अरविंदाच्या बोलण्याचा रोख काय आहे, हें विमलच्या लक्षात आलें

नाहीं, त्यामुळें तिचें मन अस्वस्थ झालें. अशा स्थितींत जास्त वेळ न घालविता अरविंदच म्हणाला, "तुला एकाचा उद्धार करण्याची संधि आली आहे, विमल ! माझ्याविषयीं म्हणशील तर मध्यतरींच्या अकल्पित बनावानं तुझ्या प्रेमास मी पारखा झालों, असंच मला वाटत होतं ! त्यामुळं मी माझ्या प्रेमाचा तो ओघ अज्ञ जनतेवर प्रेम करण्याकडे वळविला, त्यातच मला आनंद वाटूं लागला. आता सारा उलगडा झाला असला, तरी त्या प्रेमाच्या त्यागानं एकाद्या कर्तबगार पुरुषाचा पुनर्जन्म होईल, असं मला वाटतं, म्हणून तो त्यागही मी आनंदान करीन !"

तिने त्याला पुढें बोलूच दिलें नाहीं. ती अगदीं निर्वाणीच्या शब्दात एकदम म्हणाली, "मला तुझं बोलणंच ऐकूं येत नाही, मुळीं ! माझं मस्तकच भ्रमूं लागलं आहे ! ह्या तुझ्या शब्दानीं माझी प्राणज्योत माझ्या देहाचा त्याग करून निघून जाईल, असं मला वाटत !"

पुढें तिच्या तोडातून शब्दच बाहेर पडेना. तिनें आपली मान एकदम त्याच्या मांडीवर टाकली. अरविंदही मनात चरकला. तिच्या केसावरून हात फिरवीत फिरवीत तो अत्यंत मृदु स्वरात म्हणाला, "तसं नव्हे, विमल ! मी काहींतरीच बोलून गेलों. मी सर्वस्वी तुझाच आहें बरं !"

इतक्यात जिजा तिकडे धावत येत असलेली दिसली. म्हणून अरविंदानें हळुवार हातानीं विमलची मान उचलली. त्यानें तिला बसविलें. तेवढ्या वेळात जिजा तेथें आलीच. तिला पाहून विमल भानावर आली व तिच्याकडे पाहूं लागली.

जिजाच्या मुखमंडलावर घामाचे बिंदु मोत्याप्रमाणें चकाकत होते. तिचे हास्य उमलत्या गुलाबालाही लाजवीत होतें. ती आल्याबरोबर एकदम म्हणाली, "दादा, भय्यासाहेबाची आई त्याना भेटली. त्यामुळें ते खरे शुद्धीवर आले आहेत. आईसाहेबाना फारच आनंद झाला आहे. चला आता लवकर तिकडे !"

प्रकरण एकतिसावें.

# अरविंदाचा निश्चय !



जिजानें सांगितलेली हकिकत ऐकून अरविंद व विमल याना अत्यंत नवल वाटलें, व तीं लागलींच परत जाण्यास निघालीं. आदले दिवशींच संध्याकाळीं विमलची मावशी भय्यासाहेबाच्या दारावरून जात असतां त्यांच्या तोंडचे 'आई ग आई,' असे शब्द तिच्या कानावर पडले होते. काय असेल तें असो, ते शब्द तिच्या अतःकरणास जाऊन भिडले होते खरे ! आणि त्यामुळें तिच्या अंतःकरणात खळबळ उडून गेली ! तिला रात्रभर कसली ती झोंप आली नाहीं. भय्यासाहेबाजवळ आपण केव्हा जाऊं व त्यांना डोळे भरून केव्हा पाहूं, असे तिला होऊन गेले ! त्याच्या खोलीकडे जाण्याची बंदी अरविंदानें सर्वांनाच केली होती. पण प्रातःकाळीं तो फिरावयास गेला आहे, हें पाहताच ती म्हातारी तडक भय्यासाहेबांच्या खोलीकडे धावली !

तिनें हळूच दार उघडलें. विशेषशी चाहूल लागूं न देता ती भय्या-साहेबाकडे एकसारखी पाहू लागली. ते अथरुणावर उघडेच पडले होते. यांचा तोंडवळा लक्षपूर्वक पाहिल्यानंतर तिच्या मुखावर एकदम टवटवी आली, व लागलींच तिचें अंतःकरण भरून आलें ! लहानपणींचे त्यांच्या पोटावरील डागही तिच्या नजरेस आले. त्याबरोबर तिची खात्रीच झाली. एकदम जाऊन त्याना प्रेमानें कुरवाळावें असेंच तिला वाटूं लागलें. इत-क्यात भय्यासाहेबानीं डोळे उघडले. समोर तिला पाहिल्याबरोबर ते उठून बसले. लागलीच त्या म्हातारीनें "नरसू," अशी हाक मारली. तोंच भय्यासाहेब ताडकन् उठून उभे राहिले, व एकदम "आई, आई, तूं केव्हा

आलीस !" असे म्हणून त्यांनीं तिच्या गळयास मिठीच मारली ! तेव्हा भय्यासाहेब व ती म्हातारी यांच्या नेत्रातून एकसारखे अश्रु वाहूं लागले. त्या अपरंपार वाहिलेल्या अश्रुप्रवाहानें भय्यासाहेबाचें मस्तक ठिकाणावर येऊं लागलें ! किती तरी वर्षांनीं भय्यासाहेबाची आई त्याना भेटली. आपले आईबाप स्वर्गस्थ झाले आहेत, अशीच त्याची समजूत होती. परंतु अचानकपणें मातेचे दर्शन झाल्यामुळें ती स्वर्गांतूनच आली कीं काय, असें त्याना त्या वेळीं वाटलें !

ती हकिकत विमलच्या आईस ताबडतोब कळली व त्याच्या सागण्यावरून जिजा धावत अरविंदाकडे गेली. अरविंद परत येऊन भय्यासाहेबाच्या खोलींत शिरला, त्याबरोबर एकदम ते त्याला म्हणाले,

"डॉक्टर, परमेश्वराचा आशीर्वाद घेऊन माझी आई मजकडे आली. त्याच्याच कृपेनं आजचा दिवस उगवला !"

कॉमरेड भय्यासाहेबाच्या तोंडून परमेश्वर असे श्रद्धेनें निघालेले शब्द अरविंदानें त्या वेळीं प्रथमच ऐकले.

अलीकडे कित्येक दिवसात न मिळालेली खरी गाढ झोंप भय्यासाहेबाना त्या रात्रीं लागली.

ती म्हातारी आईसाहेबाची चुलत बहीण असली, तरी जवळ जवळ पंचवीस वर्षे त्याना एकमेकींना भेटण्याचा प्रसंग आला नव्हता. गेलें वर्षभर ती आपल्या मुलाचा शोध करीत हिंडत होती. त्याचा तपास करण्याकरिताच ती मुबईस आली होती. परतु कोठेच त्याचा थागपत्ता न लागल्यामुळें ती अगदीं हताश होऊन गेली होती !

केवळ योगायोगानेंच तिचा मुलगा तिला भेटला. त्यामुळें त्या म्हातारीस परमानंद झाला. तिच्या दीर्घ काळच्या तपश्चर्येचें फळ तिला मिळालें, म्हणून तिनें भक्तिभावानें देवाला आळविलें.

भय्यासाहेबाना त्याच्यावर मायेची पाखर घालणारी व्यक्ति लाभली तर ते पूर्वस्थितीवर येतील, ही अरविंदाची कल्पना खरी ठरली. त्या

म्हातारीनें आपली गेल्या वीस पंचवीस वर्षांची दुःखद कहाणी कोणा-जवळही अद्याप मनमोकळेपणानें सांगितली नव्हती. सायंकाळच्या वेळीं आईसाहेबांच्या आग्रहावरून आपली हृदयद्रावक कथा ती सांगूं लागली. सर्व मंडळी अत्यंत उत्सुकतेनें ऐकत होती.

म्हातारी सांगू लागली, " माझ्या कर्माची कथा विलक्षणच ! सारा जन्म दुःखाच्या कहाणीन भरलेला ! पण इतक्या वर्षांनीं नरसूची भेट झाली, हाच माझ्या खऱ्या सुखाचा क्षण ! आम्ही निजामहद्दींतील एका गावचे इनामदार. पंचवीस वर्षांपूर्वीची गोष्ट. काय झाल, बाई, मला पुरत कारण ठाऊक नाहीं, पण आमच इनाम गावच जप्त झाले ! इकडच्यानीं त्याकरिता पुष्कळ सरकार दरबार केला. त्यापायीं जवळचं होतं नव्हतं तें सार घालविल, पण गावची जप्ती काहीं उठली नाहीं. त्यामुळं स्वारीच मस्तक फिरलं, व पुढ त्याना खरोखरच वेड लागलं! ते चिंध्यादेखील चिवडूं लागले ! त्यानीं गावही पण सोडलं ! नरसू त्या वेळीं सहा सात वर्षांचा होता. मी त्या वेळीं डोळ्यावर कातडं ओढून पोटच्या गोळ्याला शेजाऱ्याच्या स्वाधीन केल आणि तिकडच्या मागोमागच घराबाहेर पडलें ! "

त्या वेळीं म्हातारीचा कंठ भरून आला. त्यामुळे ती थोडा वेळ थांबली. तिनें पदराने आपले डोळे पुसले. त्या वेळीं सर्वांनाच गहिंवरून आलें. पुढें ती आपली कहाणी सांगूं लागली.

" पहिल्याच दिवशीं रानावनातून ते पांच सहा कोस दूर गेले. पुढ एक गाव सोडून दुसरं, नंतर तिसर, अस मन मानेल तसं ते जात होते. पण त्याची पाठ काहीं मीं सोडली नाहीं. त्याची सेवाचाकरी करीत राहिलें. पहिले चार सहा महिने मला नरसूची हकिकत तरी कळत होती, पण तो तेथून पळूनच गेला ! मी पुष्कळ तळमळलें. इकडे आड आणि तिकडे विहीर अशी माझी स्थिति झाली. देवावर भरंवसा ठेवून तिकडच्याना मी सोडल नाहीं ! तेव्हापासून मात्र नरसूचा पत्ताच लागला नाहीं मला !

मी सारं दुःख गिळून त्याच्या मागंच चालले." आज शुद्धीवर येतील,

उद्या येतील, अशी आशा करीत मी दोन तपं त्याच्या सेवेंत काढलीं. शेवटीं एक वर्षापूर्वी त्यानीं प्रयागला वेडाच्या लहरींत गंगेंत उडी घेतली!"

ह्या वेळीं म्हातारीच्या डोळयातून घळघळ अश्रु वाहू लागले. त्यामुळें सर्वांनाच भडभडून आले. तो आवेग थोडा ओसरल्यावर म्हातारी सागूं लागली,

" झालं ! आता मीं तरी काय करावं ! त्याच्या मागोमाग गंगेंत उडी घ्यावी, असंच मला वाटल ! पण नरसूची आठवण झाली, व माझा जीव कचरला. नरस् कुठं तरी सुखरूप असेल, अस नेहमी माझं मन मला सागे.

पुन्हा कशीबशी गावीं आले. त्या वेळीं गावच्या जमीचा हुकूम फिरला होता असं मला समजल. तो कसा फिरला व काय झाल, हें मला ठाऊक नाहीं ! पण ते कायमचे गेल्याच कळल्याबरोबर हुकूम फिरला म्हणतात ! मुलगा असल्यास गाव व मागचं सार उत्पन्न देण्यास आमचं सरकार तयार झालेलं आहे ! पुन्हा वणवण हिंडत नरसूचा शोध करू लागले. सारीं नाती गोती धुंडाळलीं. शेवटीं मुबईस तुमच्याकडे आले. माझ्या पतीच्या सेवेच फळ मला मिळाल, व माझा नरसू मला इथ भेटला." म्हातारीनें एक समाधानाचा सुस्कारा टाकला.

तिची ती हकिकत ऐकून सर्वानाच अत्यत आश्चर्य वाटले.

भय्यासाहेबाचे मूळचे नाव नरसिंह होते. त्याचा स्वभाव लहानपणापासूनच तापट होता. त्याच्या आईनें त्याना ठेवलेल्या शेजाऱ्याच्या घरीं एकदा त्यानीं हट्ट केल्यामुळे त्याना दोन तडाखे मिळाले. त्याबरोबर त्यानीं तेथून पळ काढला व एका मोठ्या गावची शाळा गाठली. ते अत्यत बुद्धिमान् असल्यामुळें अनेक शिष्यवृत्त्या मिळवून ते एम्. एस्सी. झाले. त्यानीं भय्यासाहेब जहागीरदार असे नाव बदलून स्वावलंबनाच्या जोरावर जगभर प्रवासही केला. त्या नावामुळेंच एका गौरकाय युवतीच्या पाशात ते अडकले. आपली सापत्तिक स्थिति कोणत्या प्रकारची आहे, ह्याची त्याना पुरी जाणीव असल्यामुळें तिला ते इकडे घेऊन आले नाहींत! शिवाय त्या

पाशातून सुटका करून घेण्याचाही विचार अलीकडे त्याच्या मनात घोळत होता. त्या बयेला त्याची तिकडील रहस्ये माहीत असल्यामुळें तीही त्या जोरा-वर त्याच्याकडून धाकानें निघेल तितका पैसा काढण्याच्या विचारात होती !

आता भय्यासाहेबाची प्रकृति झपाट्याने सुधारूं लागली. त्याचें इनाम गांव त्याच्या ताब्यात येणार होतें, व गेल्या पंचवीस वर्षोची त्या गावच्या वसुलाची भली मोठी रक्कम त्याच्या हातीं पडणार होती. म्हणून विलायती मडमेच्या कटकटींतून सुटका करून घेण्याचा त्याचा मार्ग अत्यंत सुलभ झाला होता !

पाटील व शेटजी याच्यामागें मामलेदारानीं चागलाच सिसेमिरा लावला होता. पाटलानीं त्याची मनधरणी करण्याचे शिकस्तीचे प्रयत्न केले; पण त्याचा काहीं उपयोग झाला नाहीं. त्यामुळे त्याची पाचावर धारण बसली !

शेटजींनीं मात्र सर्व परिस्थिति ओळखून अरविंदाची कास धरली ! त्याच्या उपदेशानें त्याना उपरति होऊ लागली ! त्यानीं मुंबईच्या गोडाबे वकिलाना लिहिलेले अरविंदाच्या संबंधानें गैरसमज उत्पन्न करणारे पत्र त्याच्या मनास खात होते. शेटजींनीं त्या वकिलाना पुन्हा पत्र लिहून, पूर्वी लिहिलेली सर्व हकिकत खोटी आहे, अशा अर्थाचें कळविले होतें. तेंही पत्र त्या वकिलांनीं मधुकरला दिलें. त्या वेळीं त्याला पूर्वीच्या पत्राची आठवण झाली. त्यानें तें पुष्कळ शोधलें, पण सापडले नाहीं. आता त्या पत्राची जरुरीही नाहीं, असेंही त्याला वाटले. पण तेंच पत्र विमलच्या हातीं पडल्यामुळें काय घोटाळे उडाले, ह्याची त्याला अद्याप कल्पना नव्हती !

मधुकराचे लक्ष मुंबईच्या व्यापाराकडे असे. मधून मधून सोनगांवींही तो जाई. असाच एके दिवशीं मधुकर आईसाहेबाच्या पत्रावरून तातडीनें सोनगावास आला होता. दुपारच्या वेळीं आईसाहेबाच्या खोलींत आईसाहेब, विमल व मधुकर हीं बोलत बसलीं होतीं. त्या वेळीं सहज मधुकर विमलला खिजविण्याकरिता म्हणाला,

" ताई, अरविंद तुझ्या ताब्यात आता तरी आला ना ? उगीच काळजी

करीत होतीस त्याची. आता तो ग्रामजनसेवक व आपण सेविका. बरी जोडी जमली म्हणायची ! ”

“ दादा, ” विमल मान वेळावून म्हणाली, “ वाहवा रे बंधुराज ! सारा घोटाळा तूंच उडविलास ! चेष्टा करायची झाली, तरी त्याला काहीं मर्यादा असते ! पुन्हा आपला साळसुदासारखा मलाच विचारतोस, नाहीं ?”

त्या वेळीं मधुकर हसूं लागला. तें पाहून विमल थोडी चिडली व म्हणाली,

“ हे बघ, आई, करून सवरून आपणच हसतो हा ! दादान काय केलं तुला ठाऊक आहे का ? ”

“ काहीं केल नाहीं. ” आईसाहेब म्हणाल्या, “ तुझ्याकरिता जिवाच रान मात्र करून घेतल त्यानं ! सारा खुळेपणा अरविंदाचाच ! सोन्या-सारखी मुबई सोडून इथ रानावनात आलाय तो ! आता तुम्ही दोघ मनान एक आहात. कुठं का राहानात ! सुखात असा म्हणजे झालं ! ”

“ आई, तुला कळलं नाहीं मी काय म्हणतें तें ! ” विमल आईकडे पाहात म्हणाली, “ अरविंदाचं मन तसं फिरलंच नव्हत मुळीं ! सारी कारवाई दादाची ! ”

“ ताई, ” मधुकर हसत हसत म्हणाला, “ मीं का अरविंदाला असा बैरागी हो म्हणून सागितलं, आणि तुला बैरागीण होण्याचा आग्रह केला ? मलाच नाव खुशाल ठेव ! अरविंदाला कशाला ठेवशील ? शंकराची स्तुति पार्वती करणारच ! ”

“ पार्वती म्हण, नाहीं तर लंकेची पार्वती म्हण, दादा !” विमल चिडून म्हणाली. “पण तुझ्या त्या पत्रानी माझा घात होणार होता ! तू विस्तवाशीं खेळत होतास बरं !”

“ आई, ” मधुकर बोलू लागला, “ बघ आता कशी बोलते ही ताड-ताड ! अरविंदान कान भरले वाटत हिचे ? मीं सागितल नव्हतं का कीं, मी काहीही करीन पण अरविंदाचं मन वळवीन म्हणून ! आता तो हातात

आला म्हणून माझ्यावरच उलटूं लागली ही ! ”

“ आई,” विमल म्हणाली, “ काहींही असलं तरी असं करायचं का दादानं ? मला किंवा तुला सांगितलं का त्यानं ह्यातलं ? ”

“ अग,” आईसाहेब विमलकडे आश्चर्यानें पाहात म्हणाल्या, “ काय चाललंय तुमच्या बहीणभावाचं भांडण हे ! भांबावून गेले बाई मी, विमल ! आज तूंच जीभ सैल सोडलीस बरं का ! ”

आईच्या ह्या बोलण्याने विमलला वाईट वाटले. तिचे डोळे भरून आले व ती त्रासिक स्वरात म्हणाली, “आई तूही मला असंच म्हणावंस ! दादाची करणी मात्र तुला दिसत नाहीं ! ”

“ बहीणभावंडाच्या बोलण्यात असं चिडायचं असतं का, विमल ? ” आईसाहेब म्हणाल्या. “ काय रे मधु, हिला इतका त्रास काय दिलास तू ?”

“ आई, ” मधुकर हसत हसत बोलूं लागला, “ मीं काहींएक त्रास दिला नाहीं. उगीच कांगावा चालविलाय हिनं ! ”

“ मीच कांगावखोर वाटतं ?” विमल फणकाऱ्याने म्हणाली, “ दादानं गुण पाघळले, म्हणून माझ्या आणि अरविंदाच्याही मनाला इतका त्रास झाला आई ! तू विचार एकदा अरविंदाला ! ”

“ त्या बैराग्याला कसला त्रास होतोय ? ” मधुकर विमलला आणखी चिडविण्याकरिता म्हणाला.

“ पुरे झाली वटवट तुझी, दादा ! ” विमलने उत्तर दिले, “ मला न कळविता काय काय केलंस सांग एकदा आईला ! म्हणजे तिला मी काय म्हणतें हे कळेल तरी ! ”

“ मीं काहीं केलं नाहीं. ” मधुकरानें मान हालवीत उत्तर दिलें.

“ दादानंच अरविंदाला लिहिलेलं पत्र दाखविते अं, मी आई तुला ! त्या भामट्या शेटजींचंही पत्र आणतेच आता मी ! ”

विमल त्या आवेशात उठली. तिनें तीं पत्रें आणलीं, व ती आईला वाचून दाखविलीं. मधुकर हा प्रकार शांत चित्तानें पाहात होता. आईसाहेबांनीं त्या

पत्रातील मजकूर ऐकल्यानंतर त्या मधुकराकडे पाहू लागल्या. त्या वेळीं तो म्हणाला, "आई, पहिलं पत्र अरविंदाला लिहिलं त्याचं कारण त्या पत्रानं तो मुंबईस धावत यावा म्हणून ! पण मला काय ठाऊक कीं, तो इतका निगरगट्ट असेलसा ! पण दुसरं ह्या गावच्या शेटजीनं मुंबईच्या गोडाबे वकिलांना पाठविलेलं पत्र तुला ग कसं मिळालं, विमल ? त्या पत्रानं तू बिथरली असशील हे मला कबूल. इथं आल्यावेळीं एकदम तू अरविंदाला टाकून का बोललीस, हे आता आलं माझ्या लक्षात ! पण तो शेटजी विश्वास ठेवण्यालायक आहे कीं नाही, हे तुला आताही कळलं नाहीं का ? ती त्याची आपली गावगुंडी ! हे बघ दुसरं त्याचंच पत्र ! ह्यात तो लिहितो, पूर्वी लिहिलेलं सारं खोटं म्हणून ! "

इतक्यात त्या ठिकाणी अरविंद आला. मधुकराचे शेवटचे शब्द त्यानं ऐकले होते. म्हणून तो खोलींत पाऊल टाकीत असताना म्हणाला,

"मला येण्याला हरकत नाहीं ना ? माझ्या येण्यानं तुमच्या बोलण्याला व्यत्यय येणार नाही ना ? "

विमल उठून जरा बाजूला झाली. मधुकराने अरविंदाचा हात धरला व त्याला आपल्याजवळ बसवून घेतले. आपण पूर्वी अरविंदाला लिहिलेलें पत्र हातात घेऊन तो म्हणाला,

"माफ करा बुवा ! ह्याच पत्रामुळं तुमची स्वयंसेविका खूप रागावली आहे माझ्यावर ! मला नव्हतं वाटलं, ह्या पत्रानं इतका घोटाळा उडेलसा ! "

मधुकर विमलकडे व अरविंदाकडे पाहूं लागला. इतक्यात दोन्ही पत्रांवरून अरविंदाने नजर फिरविली व तो म्हणाला,

"हीं पत्रं तर आमच्या उभयतांच्या अंतःकरणात शुद्धता आणण्यास कारणीभूत झालीं, मधुकर ! तुझ्या पहिल्या पत्रामुळंच अज्ञ जनसेवेकडे माझं मन जास्त वळलं व रमलं, आणि ह्या दुसऱ्या पत्रानं विमल माझ्या कार्यांत सहभागी झाली. हा ह्या पत्रांनीं मोठाच उपकार केला आहे आमच्यावर ! अर्थात् आम्ही उभयतां ह्याबद्दल तुझेच ऋणी आहोंत, मधुकर !

अरविंद हसू लागला. त्यामुळें विमलही खुलली.

थोड्या वेळानें आईसाहेब म्हणाल्या,

" मग अरविंद, आता मुंबईस जाऊं या. तुम्हा उभयतावर अक्षता पडल्या म्हणजे माझा जीव मोकळा होईल. मधूचा निश्चय तुला ठाऊक आहेच. विमलचं लग्न झाल्याशिवाय तो लग्नाला तयार आहे कुठं ? "

" लग्नाआधींच लीलावहिनीशीं प्रेमाच्या गोष्टी करण्याकरिताच दादा एकटाच मुंबईस राहतो नाहीं, आई ? " विमल मध्येंच म्हणाली.

" तरी खरंच विमल ! " मधुकर म्हणाला. " प्रेमाच्या गोष्टी केल्याशिवाय का अरविंदानं हे पत्र दिलं तुझ्याजवळ ? "

" जाऊं दे रे ! " आईसाहेब म्हणाल्या, " किती चेष्टा चालविलीस मधु, तिची ! मुंबईस केव्हा जायचं ते ठरवाना तुम्ही ? अरविंद, तूं तर अगदीं मुखस्तभासारखा बसलास. काहीं बोलतच नाहीस कीं ! "

" आई, " अरविंद म्हणाला, " मी तुमच्या विचाराबाहेर का आहे ? मधुकराचं मत तेंच माझं मत. त्याचा निश्चय तसाच माझा निश्चय ! "

" म्हणजे ?" मधुकर एकदम म्हणाला, " ह्या म्हणण्याचा अर्थ काय ? आणखीही विचार बदलतोस काय ? इतके दिवस नाक धरूनही तुझ्या मनाची चंचलता गेली नाहींच का ? "

" मधुकर," अरविंद शांतपणें म्हणाला, " बहिणीचं लग्न झाल्यावरच तूं स्वतःचं लग्न करणार आहेस ना ? अगदीं तसाच माझा निश्चय ! ह्यात माझा चंचलपणा तुला रे काय दिसतो ? "

" मग तुझ्या म्हणण्याचा अर्थ तरी काय ? " मधुकर म्हणाला. " का मला उगीचच्या उगीच पेचात धरण्याचा तुझा विचार आहे ? "

" माझी बहीण कोण आहे, हें तुला ठाऊक का नाहीं, मधुकर ? " अरविंद म्हणाला. " उगीच आडरानात शिरतोस झालं ! जिजा ही माझी बहीण नाहीं का ? त्या सखारामबाबानं प्राण सोडतेवेळीं काय म्हटलं, हें तुला आठवत नाहीं का ? तिचं लग्न झालं कीं, मी लग्नाला तयारच आहें !"

त्यावर मधुकर कांहीं बोलण्याच्या बेतात होता, इतक्यात जिजा तेथें आली. तिच्या हातात एक पाकीट होतें. तें एका सरकारी शिपायानें आणलेलें होतें. त्यावरील पत्ता मधुकराचा होता. मधुकरानें तें पाकीट घेतलें व फोडलें. त्यातील मजकूर वाचून त्याला अत्यंत आनंद झाला.

ते पत्र त्यानें अगोदर विमलच्या हातीं दिलें व तो म्हणाला,

" तुझ्याकडेच ही कामगिरी सोपवितों मी. लवकर पार पाड, म्हणजे सारंच सोळा आणे काम होईल ! "

विमलनें तें पत्र हातीं घेतले व ती तें वाचूं लागली. तें पत्र पुढें दिलें आहे.

" प्रिय मधुकर,

लवकरच तुझ्या भेटीस येईन, असें मीं तुला म्हटलें होतें, पण कामाच्या गर्दींतून माझी सुटकाच होत नाहीं मुळीं ! हा तालुका जिल्ह्याच्या ठिकाणापासून फार दूरचा आहे, म्हणून तर मी इतक्या लवकर फर्स्ट क्लास मॅजिस्ट्रेट झालों. पण कामाच्या दगदगीनें अगदीं बेजार होऊन गेलो आहें मी !

त्या तुमच्या श्रीपतीच्या खटल्यात तुमच्या मुंबईच्या वकिलानीं तर फार बहार केली ! तुमच्या श्रीपतीच्या हातीं कोणतेंही हत्यार असल्याचे कोणीं पाहिलें नाहीं, असें उलट तपासणींत त्यानें सिद्ध केले ! पाहा ही तुमच्या वकिलाची करामत ! बच्च्याच्या हातीं कुऱ्हाड होती, असें जो तो साक्षीदार सागतो. खुद्द बचालाही आपल्या हातावर कोणीं घाव मारला हें सागता येऊं नये, हेंही आश्चर्यच ! श्रीपती सुटावा असेंच तेथील गांवगुंडाना वाटूं लागलें आहे कीं काय न कळे ! ह्या खटल्यातील साऱ्या उडालेल्या गमती मला पत्रात लिहिता येत नाहींत. समक्ष भेटींत बोलण्याला मजेचा विषय पाहिजेच कीं नाहीं ? तो श्रीपती मात्र पुराव्याच्या अभावीं सुटणार खास !

एक गोष्ट माझ्या मनाला फार लागून राहिली आहे. ती म्हणजे त्या म्हाताऱ्या निरपराधी सखारामाची. त्या पतिपत्नींचा अंतकालचा तो देखावा माझ्या डोळ्यांसमोर नेहमीं येत असतो. त्या दिवशींच्या दुःखदायक प्रसंगास मी थोडाबहुत कारण झालो, अशीच टोंचणी माझ्या मनाला लागून राहिली

आहे. मीं कायद्याची अंमलबजावणी केली खरी! पण त्या कृत्यात इतका भयंकर अन्याय होत आहे, त्याची मला कल्पनाही नव्हती!

तेव्हा आता मला वाटणारा हा मानसिक ताप नाहींसा होण्याचा उपाय काहींच नाहीं का? त्या कुटुंबासंबंधानें माझ्या समाधानीकरिता तरी मला काहींच करता येणार नाहीं का? मधुकर, तूं व अरविंद यानीं कांहीं उपाय सुचविल्यास मी तो अवश्य करीन.

सखारामाची मुलगी अविवाहित आहे, तिच्याशीं विवाह करून घेण्यानें माझ्या हातून घडलेल्या पातकाचें क्षालन होणार नाहीं का?

मी एक दोन दिवसात समक्ष येत आहेच. तोपर्यंत तूं तेथें असशील, अशी माझी अपेक्षा आहे. विमलाताई व अरविंद तेथे आहेतच. ह्यापेक्षा जास्त मजकूर भेटीअंतीं.

तुझा मित्र
बाळासाहेब."

पत्र वाचून झाल्यावर विमलने जिजाकडे पाहून स्मित केलें. जिजाला त्याचा बोध काहीच होईना. नतर विमलच म्हणाली,

"आईबापाची पुण्याई एका माणसाच्या फळाला आली म्हणायची!"

ह्या तिच्या बोलण्याचे जिजाला आश्चर्य वाटले व ती गोंधळली! अरविंदालाही त्याचा बोध झाला नाहीं. मधुकर मात्र मनातल्या मनात हसूं लागला.

कारण, ही घटना घडवून आणण्यातही त्याचा थोडा हात होता. मध्यंतरीं बाळासाहेबाच्या आग्रहाच्या बोलावण्यावरून तो त्याच्याकडे गेला होता. त्या वेळीं एकंदरींत बाळासाहेब उदास असलेले त्याला दिसले! त्यांची सुशिक्षित पत्नी काहीं महिन्यापूर्वी कालवश झाली होती. बाळासाहेब मामलेदार झाल्यानंतर त्याचा तो विवाह घडून आला होता. त्या पत्नीचें शिक्षण पुष्कळ झालें असले, तरी शरीरप्रकृतीकडे तितकेसें लक्ष न ठेविल्यामुळें पहिलें अपत्य होताक्षणींच ती स्वर्गस्थ झाली व त्या अपत्यानेंही तिच्या

पाठोपाठ तिचाच मार्ग धरला !

पत्नीचे शिक्षण बेताचें असले तरी चालेल, पण तिची शरीरप्रकृति उत्तम असावी, असें बाळासाहेबाचें आता मत झालेलें होतें. हें मधुकराच्या ध्यानीं आल्याबरोबर त्यानें जिजाच्या गुणाची, तिच्या घडधाकटपणाची इतकी स्तुति केली कीं, बाळासाहेबाच्या डोक्यात पूर्वीच घोळूं लागलेल्या विचाराना खूप चालना मिळाली. जिजाच्या सौंदर्यानें त्याच्या मनावर पूर्वीच परिणाम झाला होता. शिवाय श्रीपतीच्या खटल्याच्या निमित्तानें तिला एकदा तालुक्याच्या गावीं घेऊन मधुकर गेला होता, त्या वेळीं ती त्याच्या चागली नजरेस पडली होती. तिला पाहून ते अगदीं मोहितच होऊन गेले होते.

आपल्या मनाप्रमाणे घडून येण्याचा संभव वाटल्यामुळे मधुकराला आनद झाला होता. जिजा सुखांत पडावी, अशा सरळ भावनेने तो वागत होता. सर्व व्यवहाराकडे व्यापारी तत्त्वानुसार पाहण्याची त्याची दृष्टिच बनलेली होती.

---

## प्रकरण बत्तिसावें.

# खरा उद्धार.



ती सकाळची वेळ. आठ एक वाजण्याचा सुमार असेल. लक्ष्मण-कुंडाच्या सभोंवार अरविंदानें लावलेल्या फुलझाडांचीं फुलें जिजा तोडीत होती. एक एक मधुर हसरें फूल तोडून ते ती आपल्या परडींत भरीत होती. ती परडी फुलांनीं गच्च भरली व तिच्यातून फुलें ओसंडून बाहेर पडूं लागलीं, तरीही तिचें फुलें तोडणें चालूच होतें. इतकी ती कसल्या तरी सुखमय तंद्रींत गुंगून गेली होती ! त्या वेळीं ती मधून मधून मान डोलवीत हसत होती, त्यावरून तिच्या मनातील आनंद त्या परडींतील फुलांप्रमाणें ओसंडून बाहेर येत आहे, असें वाटत होतें !

तिच्या जमिनीच्या लिलावाची रक्कम कोणीतरी अज्ञात इसमानें भरल्यामुळें ती तिच्या मालकीची झाली होती ! श्रीपतीचें शेतही त्याच्याच ताब्यात राहावें, अशीही योजना कोणींशी केली होती ! शिवाय श्रीपती लवकरच सुटणार असेंही तिला नुकतेंच कळलें होतें ! त्यामुळें ती इतकी आनंदात होती व तोंडानें ‘ नको वाजवूं श्रीहरी मुरली । तुझ्या मुरलीनें तहानभूक हरली ’ हें तिच्या आवडीचें गाणें गुणगुणत होती.

अगोदर ती मुळचीच सुंदर; शहरी नीटनेटकेपणाही विमलच्या सह-वासामुळें तिला ठेवावा लागलेला; तिच्याच प्रेमाच्या आग्रहामुळें आज ती जरीकाठी पातळ नेसलेली; त्यामुळें त्या वेळीं तिचें लावण्य अत्यंत खुललें होतें.

त्याच वेळीं इकडे तिकडे नजर टाकीत एक व्यक्ति तिकडे येत होती. तिचें लक्ष फुलें तोडीत असलेल्या जिजाकडे गेलें, त्यामुळें मंत्रमुग्ध नागा-

प्रमाणें ती व्यक्ति तेथच थबकली !

थोडा विचार करून त्या व्यक्तीनें आपली मान सहज डोलविली. पुढें त्या व्यक्तीच्या मुखावर स्मित झळकूं लागलें !

ती व्यक्ति तरुण असून नाकाडोळ्यानें नीटस होती. तिचा चेहरा रुबाबदार होता. तिच्या डोक्याला फेटा होता. बाकीचा सारा पेहराव शिकारीचा होता. तिच्या हातात नवी कोरी बंदूक होती. पुढें पुढें तर त्या व्यक्तीची दृष्टि जिजाकडे इतकी खिळून राहिली कीं, जणूं काय इच्छित शिकारच आपल्यापुढें आहे, असें तिला वाटत असावें !

त्याच वेळी जिजाची नजर सहज तिकडे गेली. तत्क्षणीं उभयताची नजरानजर झाली. तिच्या मुखावरील सहजच उमटलेल्या स्मिताचा परिणाम त्या व्यक्तीवर जादूसारखा झाला !

कांहींतरी बोलावे असें त्या व्यक्तीस वाटलें, व ती म्हणाली,

" मुंबईच्या मंडळींची भेट होईल ना ! "

उत्तर द्यावें कीं न द्यावें, ह्या विचारात जिजा क्षणभर पडली. ती कांहीं तशी खेडवळ मुलगी नव्हती, तरीही तोंडातून शब्द काढतेवेळीं तिचें अंतःकरण धडधडूं लागलें ! खालीं मान घालून ती म्हणाली,

" आपण बाळासाहेब ना ! आपलीच ते वाट पाहात असावेत ! "

बाळासाहेबाना तिच्याशीं आणखी बोलावें असें वाटत होतें. पण इतक्यात विमल व मधुकर हीं तिकडे आलीं. बाळासाहेबाना पाहून एकदम मधुकर म्हणाला,

" ओहो ! बाळासाहेब, कसली शिकार शोधीत आहा तुम्ही ! "

मधुकराच्या बोलण्यानें बाळासाहेब गोंधळले. जिजाही कावरीबावरी झाली. विमल त्या उभयताकडे पाहून हसूं लागली.

मधुकरानें बाळासाहेबाचा हात धरला व ते बोलत बोलत तेथून निघून गेले.

विमल जिजाजवळ आली. बाळासाहेबाचा मानस तिनें जिजाला अद्याप सांगितला नव्हता. दोन दिवस ती युक्तियुक्तीनें तशा तऱ्हेचें जिजाजवळ बोलत

होती खरी, परंतु जिजाला त्यातील खरें मर्म आकलन झालें नव्हतें ! आताही मधुकराच्या बोलण्यातील खोंच तिच्या लक्षात चागलीशी आली नाहीं.

त्या दिवशीं त्या मंडळींत आनदीआनंद पसरलेला होता. बाळासाहेब एक दोन दिवसाची रजा घेऊन मुद्दाम तेथें एकटेच आले होते.

तिसरे प्रहरीं अरविंद, मधुकर, वगैरे सर्व मित्रमडळ दूर फिरावयास गेलें आणि सायकाळच्या सुमारास परत येऊन देवळाच्या मागील बाजूच्या जरा खोलातच असलेल्या एका प्रशस्त खडकावर ते सर्व बोलत बसले. त्या वेळीं बाळासाहेब म्हणाले,

" अरविंद, तू निशाणी आगठ्याचे प्रताप सागत होतास, ते अगदीं खरे आहेत. आमच्या कचेरीतही तसले प्रकार दिसून येतात ! अर्ज लिहिणारे काय लिहितात, तें निशाणी आगठे देणाराना चागलं सागता येत नाहीं. पाटील तलाठी जबाब लिहून पाठवतात, पण निशाणी आगठा करणाराना त्यात काय लिहिलं आहे हे ठाऊक नसतं. सोसायट्यामधून तर निशाणी आगठ्याचा धुमाकूळच चाललेला आढळतो ! गोरगरिबाच्या माना सापळ्यात अडकविण्याचं कार्य ग्रामकंटक निशाणी आगठ्याच्या बळावर बिनधोक चालवितात ! एवढंच नव्हे, तर चागल्या मी मी म्हणविणाराची त्रेधा ते त्याच साधनानीं उडवूं शकतात ! मलाही त्याचा नुकताच थोडाबहुत कटु अनुभव आला ! "

" बाळासाहेब, " मधुकर त्याच्याकडे आश्चर्यानें पाहात म्हणाला, " तुम्हालाही अनुभव आला म्हणता ! नवलच आहे हें ! अरविंदाला बनविण्यासाठीं तर हें तुम्ही काहींतरी सागत नाहीं ना ? "

" मी सागतों तें अक्षरशः खरे आहे. " बाळासाहेब जोरानें म्हणाले, " त्या दिवशीं मी तुमच्यात मिसळलों ना ? त्यावरून मी चळवळ्या लोकात मिसळून गोरगरिबावर जुलूम चालविला आहे, असे बरेच अर्ज निशाणी आंगठ्याच्या सह्यानीं आमच्या वरिष्ठाकडे गेले ! त्यामुळं मला त्याच्याकडे खेटे घालावे लागले ! आमच्या वरिष्ठाची समजूत पटली ही गोष्ट निराळी;

पण मला त्रास झालाच कीं नाहीं ? ह्या अर्जाच्या मुळाशीं कोण कोण आहेत, हे तेव्हाच माझ्या लक्षात आलं. तुमचा पाटील, पुष्कळ दिवसाची एरवड्याची हवा खाण्यास जाणार खास ! सोसायटींतील घोटाळ्यानीं आपल्या हातानं त्यानं आपल्यावर संकट ओढून घेतलं आहेच ! तो शेटजी मात्र कायद्याच्या कचाटींत अद्याप कुठ सापडत नाहीं, पण सापडेल तो ! जातो कुठ ? "

" बाळासाहेब, " अरविंद म्हणाला, " माझं जनसेवेचं कार्य तुम्हाला पसंत आहे ना ? मग माझ ऐकाल तुम्ही ! "

" तुझ्यासारख्या त्यागी माणसाच कोण बर ऐकणार नाहीं ! " बाळासाहेब म्हणाले. " खेड्यापाड्यातील लोकास प्रथम लिहिता वाचता आल पाहिजे, हे आता तुम्हाआम्हालाच काय, पण सर्वांनाच पटल आहे. त्यात तुझी साक्षरतेचा प्रसार करीत लोकसेवा करण्याची पद्धति इतकी निर्दोष आहे की, त्यात कोणालाच शंका येणार नाहीं मुळीं ! "

" मग तर माझं म्हणण ऐकाच बाळासाहेब ! " अरविंद कळवळ्यानें म्हणाला. " त्या पाटलाला किंवा शेटजीला तुम्ही खड्डयात घालूं नका. कारण आमच्यामुळ त्याना त्रास झाला, असा प्रवाद चोहोकडे पसरेल. त्यामुळ प्रत्येक खेड्याचे पुढारी किंवा ग्रामकटक आमच्यापासून दूर दूर राहूं लागतील. हे अडाणी लोक मेंढराप्रमाणं असतात व सध्या तरी त्याचे मेंढपाळ ह्या पाटलासारखेच लोक असतात ! म्हणून तेच लोक आमचं साक्षरता-प्रसाराचं साध कार्यही अशक्य करून टाकतील ! शिवाय त्या पाटलाला आता पश्चात्ताप झालेला आहे. तो आपला जमीनजुमला विकून लबाडीन निर्माण केलेल सोसायटीचं देण देऊन टाकीत आहे ! तो शेटजी निपुत्रिक आहे. दत्तक मुलाला निम्मी जिंदगी देऊन आमच्या कार्याला बाकीचा सर्व भाग तो देत आहे, इतका तो आमच्या उपदेशामुळ वळला आहे ! म्हणूनच ह्यापुढं आम्ही आमच्या मोठ्या कार्यास सुरुवात करणार आहोंत. "

" तो पाटील देणं देऊन टाकील, कारण त्याशिवाय त्याला गत्यंतरच

नाहीं." बाळासाहब म्हणाले, "पण ता शेटजी कसा वळला ह्याचं नवल वाटत मला! तुम्हीं कोणत मोठं कार्य करण्याच योजल आहे, तें सागता का आम्हाला? आम्हीही शक्य ती मदत तुम्हाला करूंच कीं!"

"साक्षरताप्रसाराचच कार्य आम्ही मोठ्या प्रमाणात सुरू करावयाच योजल आहे." अरविंद म्हणाला, "त्याकरिता आम्हाला त्यागी स्वयं-सेवक पाहिजेत. लोकाचे आचारविचार, त्याच्या भावना, त्याची सामाजिक व आर्थिक परिस्थिति याची त्याना पूर्णपणें माहिती असली पाहिजे. लोकातील उत्साह सतत कायम ठेवून अगीकारलेलं कार्य पार पाडण्याचं कौशल्य त्याच्या आगीं असलं पाहिजे. ह्या कामीं ज्याचा ज्याचा उपयोग होऊं शकेल, त्याच्याशीं सहकार्य कसं कराव हे त्याना समजलं पाहिजे. लोकाचा बुद्धि-भेद किंवा ह्या कार्याची हानि ज्या चळवळीमुळं होईल, तीपासून त्याना अलिप्त राहता आल पाहिजे. लोकांची आस्तिक्यबुद्धि कायम ठेवून तिचा उपयोग ज्ञानप्रसाराच्या कामीं त्याना करून घेता आला पाहिजे. खेड्या-पाड्यातील राहणी त्याच्या आगवळणी पडली पाहिजे. वीस ते चाळीस वर्षांच्या स्त्रीपुरुषाना एका वर्षात साक्षर करण्याच्या नवीन नवीन पद्धतींची त्याना पूर्ण माहिती असली पाहिजे. त्याना वैद्यकीय उपचाराची माहिती असून त्याचा उपयोग कसा करावयाचा हें त्याना कळलं पाहिजे. व्यवहारोपयोगी कायद्याचीही त्याना माहिती असली पाहिजे. इत्यादि उपयुक्त ज्ञान त्याना मिळावं, ते कार्यक्षम व्हावेत, म्हणून त्याना शिक्षण देण्याकरिता सखारामाच्या झोंपडीसभोवतालच्या पटागणात त्याचंच स्मारक म्हणून आम्ही एक आश्रम स्थापन करणार आहोंत. आरंभीं, शेटजी देत असलेल्या देणगीवर ह्या आश्रमाची उभारणी करून, ह्या तालुक्यात ज्या गावी शाळादेखील नाहीं, तेथील प्रौढ स्त्रीपुरुषाना एका वर्षात साक्षर करण्याचा आम्हीं निश्चय केलेला आहे!"

"अरविंद," बाळासाहेब म्हणाले, "खेड्यातील प्रौढ स्त्रियानाही साक्षर करणार म्हणता तुम्ही? ज्या स्त्रिया पुरुष दृष्टीस पडला कीं लाजून पळून

जातात, त्या स्त्रियाना तुम्ही साक्षर करणार कसं ? शिवाय तुम्ही अगदीं लहान खेडयापासून सुरुवात करण्यापेक्षा निदान शाळा असलेल्या खेड्या-पासून सुरवात करा, म्हणजे तुमचं काम पुष्कळ हलकं होईल. तुमचा उत्साहभंग करावा असा माझा हेतु नाहीं, पण ज्या अडचणी दिसतात त्या सागितल्या तुम्हाला. "

" बरोबर सागता, बाळासाहेब ! " अरविंद उत्साहाने म्हणाला. " अडचणी नाहींत अस नाहीं. तस पाहिल, तर अडचणींचे डोंगर डोळ्या-पुढं उभे राहतात. पण ह्या अडचणींना तोंड दिल्याशिवाय त्यातून आपली सुटका कशी होणार ! ज्या खेडयात शिक्षणाची मुळींच सोय नाहीं, तिकडे कोणाचंच लक्ष जात नाहीं. शिवाय तशा ठिकाणीं जागृति दिसली, म्हणजे त्यापेक्षा मोठमोठ्या गावीं लाजेकाजेनं का होईना, कार्य करण्याची प्रवृत्ति बळावेल ! म्हणून अगदीं लहान खेडींच कार्याच्या दृष्टीनं मी पसंत करितों. खेडयातील स्त्रीसमाजाचीही कल्पना मला बरीच आलेली आहे. पुष्कळ स्त्रिया तुम्ही म्हणता त्याप्रमाणं भित्र्या असतात खऱ्या; पण काहीं काहीं स्त्रिया इतक्या धीट आढळतात कीं, त्या धीटपणात पुरुषानाही लाजवितील ! त्याचीच मदत घेऊन स्त्रियात साक्षरतेचा प्रसार व्हावा; त्याना बाळंत-पणासारख्या अडीअडचणींच्या प्रसंगीं योग्य अशी मदत व्हावी; भुतंखेतं, देवदेवस्की, जादुटोणे, इत्यादि त्याच्या खुळचट कल्पनातील फोलपणा युक्ति-युक्तीनं त्याच्या लक्षात आणून द्यावा; इत्यादि कारणाकरिता आम्ही स्त्री-स्वयंसेविकाचीच योजना करणार आहोत. पुरुष स्वयंसेवकाच्या चारित्र्यावर शिंतोडे उडविण्याकरिता कित्येक बकध्यानी ठक टपलेलेच असतात. त्याच्याही तोंडास खीळ बसावी, म्हणून आमचा स्वयंसेवक विवाहित असला पाहिजे, त्याच्या पत्नीनेंच स्त्रीस्वयंसेविकेचें काम केलं पाहिजे, अशीच योजना आम्ही करणार आहोंत. "

" योजना तर फार उत्तम आहे ! काढणाराही चतुर आहे ! " भय्या-साहेब म्हणाले. " पण 'मला तर असं दिसतं कीं, हे सारे हवेंतलेच किल्ले

होत! इतका त्याग करणारे कार्यक्षम स्वयसेवक मिळणार कसे ! त्याच्या पोटापाण्याची सोय तुम्ही करणार कशी! शिवाय भाडवलशाही तुमचं हें साधंसुधही जनसेवेचं काम तुम्हाला सुखानं करूं देणार कशी! तुम्हीं आमच्या विमलाताईची तरी समति घेतली का, अरविद ! " भय्यासाहेब अरविंदाकडे पाहून हसूं लागले ! तेव्हा त्याच्याकडे पाहात अरविंद म्हणाला,

" भय्यासाहेब, मग काय तुमच्यासारख्याची गोरगरिबाविषयींची कळकळ पोकळच म्हणावयाची ! गोरगरिबाच्या कल्याणाकरिता तुमची त्याग करण्याची तयारी नाहीं, तुम्हाला आपल्या सुखात व्यत्यय आणू द्यावयाचा नाहीं, अज्ञ व दुःखी जनतेत समरस होऊन कार्य करण्याची तुम्हाला आवड नाहीं, मग त्याचा उद्धार तुम्ही करणार कसा ! विमलची माझ्या कार्याला पूर्ण समति आहे, हे मी सागतो. कळल ना आता तुम्हाला ! "

" भय्या म्हणतो, त्यातही अर्थ नाही का ! " मधुकर शातपणे म्हणाला. " तुझ्यासारखे त्यागी लोक मिळण मलाही कठिणच दिसतं ! बरं, असे मिळाले, तर ते काहीं वारा खाऊन जगणार नाहींत ! त्याच्या चरितार्थाची सोय करायला नको का ? फार तर तूं म्हणशील, मजजवळ आहे ते सर्व मी खर्च करीन ! पण ते राष्ट्राच्या गरजेच्या मानानं अत्यंत अल्प आहे, हे तुलाही पटेल. ह्याचा विचार काय केला आहेस, हे आम्हाला साग तरी ! "

" त्याची चर्चा करूं या की ! " अरविंद शातपणे म्हणाला, " पण नुसत्या बडबडीनं खऱ्या कार्याचा गाडा पुढं ढकलत नसतो. त्यामुळं प्रसिद्धि मिळते, थोडा लौकिकही पदरात पडतो, हें खरं. पण कोट्यवधि जनतेला जागृत करून तिला कार्यक्षम करण्याच कार्य खऱ्या त्यागाशिवाय होणार नाहीं. माझ्या बरोबरीच्या खऱ्या कळकळीच्या देशसेवकाना माझी कल्पना पटली आहे. त्यापैकीं पंचवीस तीस विवाहित तरुण ह्या माझ्या आश्रमात आज येण्यास तयार आहेत. एक वर्षभर आम्ही खर्च करूं. त्या मुदतींत स्वावलंबनानं आमचा स्वतःचा चरितार्थ चालविण्याची आमची योजनाही आम्ही यशस्वी करूं, व ह्या तालुक्यातील खेडींपाडीं साक्षर करूं,

असं सध्या म्हणतों आहें मी."

"शिक्षण सक्तीचं झालं, म्हणजे हा प्रश्न तेव्हाच सुटेल." बाळासाहेब म्हणाले. "आता लवकरच हातीं येणाऱ्या सत्तेनं हें कार्य सुलभ होईल. प्रत्येक गावीं शाळा निघाली कीं, प्रौढाच्या शिक्षणाची सोय त्याच शिक्षकाकडून सुलभपणं होऊंही शकेल."

"तसं असतं तर शाळा असणारीं खेडीं आज साक्षर झालीं नसतीं का ?" मधुकर म्हणाला. "सक्तीच्या शिक्षणाचा प्रश्नही तुम्हाला वाटतो तितका सुलभ नाहीं, बाळासाहेब ! प्राताच्या जमाखर्चाची तोडमिळवणी करिता करिताच नाकीं नऊ येतील ! सध्याच्या चौपट खर्च शिक्षणावर करावा लागेल, तेव्हा सर्वत्र प्राथमिक शिक्षण सक्तीचं करिता येईल ! हा पैसा निर्माण होणार कसा ?"

"उत्पन्न वाढविण्याचीं साधनं काय थोडीं आहेत ?" भय्यासाहेब म्हणाले, "असे कर बसवावे कीं, ते गोरगरिबाना जाचक होणार नाहींत. शेतसाऱ्यावर लोकल सेस घेतात, तसा प्राप्तीच्या करावर घ्यावा. मोठमोठ्या श्रीमंत लोकांवर बसेल, असा वारसाहक्कावर कर बसवावा. आणखीही दुसरे भाडवलवाल्यावरील कर सुधविता येतील ! मग तुमची पैशाची अडचण निवारण होणार नाहीं का ?"

"श्रीमंतावर कर बसला, तरी त्याचा बोजा थोडाबहुत का होईना, अप्रत्यक्षपणे गोरगरिबावरही पडणार नाहीं का ?" मधुकर म्हणाला. "कारण आमच्या बहुतेक लोकांची संपत्ति गोरगरिबानीं केलेल्या उत्पादनावरच अवलबून असते !"

"म्हणजेच ते श्रम करणाऱ्या गोरगरिबाच्या उत्पन्नावरच निव्वळ चरतात, असंच नव्हे का ?" भय्यासाहेब म्हणाले.

"अगदीं कबूल !" अरविंद म्हणाला. "खेड्यातील गरीब शेतकरी रक्ताचं पाणी पाणी होईल, इतके श्रम करतात. पण त्याच्या अज्ञानामुळं किंवा नाइलाजामुळं त्याच्या त्या संपत्तीच्या उत्पादनास एकसारख्या अनेक

जळवा लागलेल्या असतात, हे खेड्यापाड्यात घडणाऱ्या व्यवहाराच वर-वर निरीक्षण केलं तरी दिसून येत! आता ह्या लोकात मुळीं त्राणच राहिला नाहीं! त्याच्याजवळ होतं नव्हतं ते खलास होत आलं आहे! कर्जाच्या डोंगराच्या भाराखालीं ते दडपून गेले आहेत! त्याच्याकडून श्रीमंताकडे जाणारा पैशाचा प्रवाहच थोड्या दिवसात संपुष्टात येईल! ह्या गोरगरिबाच्या मिळकतीची उत्पादनशक्ति वाढली पाहिजे, अज्ञानामुळं होणारी त्याची फसगत टळली पाहिजे, ते जिवंत राहिले पाहिजेत, म्हणून श्रीमंताकडे गेलेल्या पैशाचा ओघ थोडाबहुत का होईना, परत त्याच्याकडे वळला पाहिजे, असं मलाही वाटतं, भय्यासाहेब!"

"श्रीमताचे खर्चच भागण सध्या कठिण होऊन बसल आहे," मधुकर म्हणाला, "अशा स्थितींत त्यानीं काय करावं म्हणता?"

"त्यानीं आपल्या गरजा कमी कराव्या." अरविद चटकन् म्हणाला. "धार्मिक खर्च बेताचा करावा. चैनीस फाटा द्यावा. काटकसर करावी. व अशा प्रकारे वाचलेला पैसा त्यानीं विश्वासानं आमच्यासारख्याच्या स्वाधीन केला तर आम्ही त्याचा उपयोग गोरगरिबाच्या उन्नतीकरिता करू. असं जर झालं तर श्रीमंत व गरीब याचे सबध प्रेमाचे राहणार नाहींत का?"

"अगदीं बरोबर," भय्यासाहेब म्हणाले. "त्यानीं आपल्या चैनीस आळा तर घालावाच, कारखानदारानीं मजुराना त्याचा योग्य वाटा द्यावा; मोठमोठ्या लक्षाधीशानीं कर्जबाजारी शेतकऱ्याची उडालेली दैना थाबविण्यास हातभार लावावा, असं जर ते आपण होऊन करूं लागतील, तर वर्गकलहाचं बीज ह्या भूमींत कदाचित् रुजणारही नाहीं!"

"बरोबर आहे तुमचं म्हणणं, भय्यासाहेब!" बाळासाहेब म्हणाले. "पण तुम्ही म्हणता त्याप्रमाण अज्ञ जनता स्वतःच बोलूं लागली, तर तिकडे श्रीमंताचं लक्ष तेव्हाच वेधेल. म्हणून मला वाटत, अरविंदाची आजची याजना खरोखरच यशस्वी झाली, तर अज्ञ समाज जागृत होईल व त्याला आपल्या हक्काची खरीखुरी जाणीव होऊ लागेल! तुम्ही काय

किंवा दुसरे पुढारी म्हणून म्हणविणारे काय, ह्यांची दृष्टि आपल्या सभोंव-तालच्या विशिष्ट जनसमूहाबाहेर फारशी पोहोंचू शकत नाहीं. असं पहा कीं, इंग्रजी अगर देशी भाषेतून मांडले जाणारे विचार शेंकडा दोन तीन लोकांच्या तरी पूर्णपणं कानावर जात असतील का? शिवाय त्यांचं खरं स्वरूप जाणणारे फारच थोडे! आणि त्यांतील भिन्न भिन्न मतांच्या गलब-ल्यांतील चोथ्यांतून कळत न कळत गळणारा सुविचाराचा रस चाखणारे तर अगदींच थोडे! अशीच स्थिति सध्या तरी नाहीं का?"

"तुम्ही म्हणतां त्यांत बरंचसं तथ्य आहे, बाळासाहेब!" अरविंद गंभीरपणें म्हणाला. "म्हणूनच तर साक्षरताप्रसाराचा कार्यक्रम प्रथम हातीं घेतला, म्हणजे कळकळीच्या कार्यकर्त्यांचं म्हणणं तरी अज्ञ समा-जाला कळणं सुलभ होईल. सेवा करणारावर लोकांची श्रद्धा तेव्हांच बसते. खेड्यांपाड्यांतून गोरगरिबांना औषधोपचार करणारे व त्यांच्या हरघडीं उपयोगी पडणारे एक लाख त्यागी स्वयंसेवक आर्यावर्तातील सात लाख खेड्यांत जर साक्षरताप्रसाराचं काम एकदम करूं लागतील, तर पांच वर्षांत तरी प्रौढ लोकांस खात्रीनं लिहितां वाचतां येईल! सध्याच्या गतीनं हें कार्य पन्नास वर्षांतही होईल कीं नाहीं, कोण जाणे! प्रौढांना लिहितां वाचतां येऊं लागलं, तर आपल्या मुलांबाळांना शिक्षण मिळालंच पाहिजे असं त्यांना खात्रीनं वाटेल, व ती त्यांची मागणी कोणत्याही राज्यसंस्थेलाँ वाटेल ते उपाय करून पुरवावीच लागेल! शिवाय हे एक लाख त्यागी लोक आपल्या चारित्र्यानं व कार्यकुशलतेनं अज्ञ समाजांत चैतन्य उत्पन्न करणार नाहींत का? व त्यामुळं सर्व समाज संघटित करण्याचं कार्य सुकर होणार नाहीं का? आणि मग धार्मिक काय, सामाजिक काय, किंवा आर्थिक काय, सर्व प्रश्न यथायोग्य रीतीनं सोडविण्याचं सामर्थ्य अखिल राष्ट्रांत जोमानं उत्पन्न होणार नाहीं का? म्हणूनच मला वाटतं, नव्हे, माझी अशी पूर्ण श्रद्धा आहे कीं, राष्ट्राचा खरा उद्धार ह्या मार्गानंच होईल."

अरविंदाचें हें बोलणें सर्वच लक्ष देऊन ऐकत होते. त्यावर शका,

उपशका काढण्याचे कोणाच्याच मनात येत नव्हतं. त्यामुळे ते सर्व अगदी स्तब्ध होते. त्या वेळीं चंद्रमाही आकाशातून दिव्य सुधाधाराचा वर्षाव करीत होता. सर्व वातावरण अगदीं शात व प्रसन्न होते. रामाच्या देवालयाच्या बाजूकडून मधून मधून येणाऱ्या वायूच्या झुळकेने त्या प्रसन्नतेंत भरच पडत होती !

त्याच वेळी त्या देवालयाकडे सहज बाळासाहेबाची नजर गेली. तेथील शिलातलावर जिजा व विमल ह्या नुकत्याच येऊन बसल्या होत्या. सकाळी आल्याबरोबर बाळासाहेबाची व जिजाची जी नजरानजर झाली, तिचा ठसा त्याच्या मनावर कायमचे ठाणे देऊन बसला होता. तिच्या लावण्याने बाळासाहेब अगदी मोहित होऊन गेले होते ! तिच्याशीं विवाहबद्ध होण्याचा आपला विचार अगदी यथायोग्य आहे, असे त्याना वाटू लागले होते. इतकेंच नव्हे, तर ही तरुणी आपलीशी व्हावी, म्हणून शिकस्तीचे प्रयत्न करण्याची आता त्याच्या मनाची तयारीही झाली होती ! विमलच्या मध्यस्तीने ती आपल्याशीं विवाह करील, अशी आशाही मधुकराच्या बोलण्यावरून त्याच्या मनात उत्पन्न झाली होती !

पुरुष मडळी तेथे जवळच असतील, अशी त्या दोघीनाही कल्पना नव्हती. त्या तेथे आल्या त्या वेळी त्या मडळीचे बोलणे थाबलें होते. त्या शांत स्थानीं त्या दोघी मनमोकळेपणाने बोलू लागल्या. त्या वेळी साहजिकपणे सर्वांचे लक्ष त्याच्या बोलण्याकडे गेले. पुढे पुढे तर ही मडळी त्या दोघींचे संभाषण अत्यत उत्सुकतेने ऐकू लागली.

त्या वेळी विमल जिजाच्या खाद्यावर हात ठेवून म्हणाली, “ मला बाई तुझ्याबरोबर कसं बोलाव, हेच कळत नाहीं, जिजा ! पण तुजवर बाळासाहेब मोहित झाले आहेत, हें खचित ! मलाही पण वाटत तू आमच्या साऱ्याच ऐकावंस असं ! ”

“ दादादेखील असच म्हणतात, ताईसाहेब ? ” जिजा आश्चर्यचकित होऊन म्हणाली.

" त्याच माझ बोलण झाल नाहीं," विमल म्हणाली. "पण आमचा दादा, आई, सगळींच्या सगळीं माणस म्हणतात, तुझ्या आईबापाचं पुण्य फळाला आलं म्हणून ! का नाहीं त्यानीं तसं म्हणावं ? असं बघ, बाळासाहेबासारखा एवढा मोठा माणूस आपण होऊन तुझ्यावरील प्रेमामुळंच इथ धावत आला ना ? तो तरुण आहे, रूपवान् आहे, श्रीमंत आहे व मोठा अधिकारीही आहे. मला वाटतं, तूं मामलेदारीण झालीस, म्हणजे त्या वैभवात रंगून जाशिल व कदाचित् आम्हाला देखील विसरशील ! "

ह्या वेळीं विमल खुदकन् हसली. पण जिजाच्या मुखावर हास्य विलसलें नाहीं. ती जास्तच गंभीर झाली. तिच्या तोंडून शब्द निघतील अशा अपेक्षेने विमल थोडा वेळ थाबली. पण ती बोलेचना. तेव्हा तिला हलवीत हलवीत विमलच म्हणाली,

" पटलं ना माझं म्हणण ? मग मी आता सागू ना दादाला, कीं, जिजाची समति आहे म्हणून ? अगदीं उघड बोलण्यासारख्या ह्या गोष्टी नसतातच मुळीं ! "

" ताईसाहेब, " जिजा गभीरपणे म्हणाली, " मी अगदीं गोंधळून गेलें आहें तुमच्या ह्या बोलण्यान ! तुम्ही अस सागाल, अशी कल्पनाही नव्हती मला. मी पण तुम्हाला विचारूंच का ? राग नाहीं ना येणार तुम्हाला ? मी अगदीं खर खरंच विचारते हो ! मुंबई सोडून तुम्ही आमच्या ह्या खेड्यात का बर आलात ? दादाच्यावरील खऱ्याखुऱ्या प्रेमानचं ना ? "

जिजाला आणखीही बोलावयाचे होते, पण तिने आपली जीभ आवरली. विमलला तिच्या बोलण्यातील भाव चागला कळला. तथापि तिला प्रामाणिकपणे वाटत होते कीं, बाळासाहेबाशीं विवाह होण्यात जिजाचें कल्याण आहे. ती त्या वेळीं व्यावहारिक दृष्टीनें विचार करीत होती, म्हणून ती युक्तीनें हसत हसत म्हणाली,

" तुला ते ठाऊक आहेच, जिजा ! मग मला का बर विचारतेस ? तसंच पाहिलं, तर बाळासाहेबही तुझ्यावरील प्रेमामुळंच इकड आले नाहींत का ?

मोठमोठ्या लोकांच्या किती तरी मुली त्याच्यासारख्याच्या गळ्यात माळ घालण्यास उत्सुक असणार नाहींत का? पण ते उदारहृदयी आहेत, म्हणूनच तुझ्यावर प्रेम करतात ना? हें प्रेम तुझ्या सौंदर्यावर मोहित होऊन करूं लागले, असंही नाहीं. नको बाई त्या दिवसाची आठवण! पण त्या भयंकर आपत्तींतही त्याचं मन तुझ्याकड गेलं, हें ते मनाचे थोर म्हणूनच ना? आणि आणखी पाहा कीं, ह्या माणसानंच तुझ्या शेताच्या लिलावाची रक्कम भरण्याची तजवीज केली नाहीं का? माणसाच्या मनाचा मोठेपणा त्याच्या कृतीवरून अजमावयाचा असतो, जिजा!"

"मी तरी तेंच म्हणते," जिजा खुलेपणानें म्हणाली. "त्यांनींच शेताच्या लिलावाची रक्कम भरली, हें नव्हतं मला ठाऊक! पण, खरं सागूं, ताईसाहेब, मला तें कसंसंच वाटतं! त्यांनीं का बरं रक्कम भरावी? जरी तें शेत गेलं, तरी श्रीपती व मी निढळाच्या घामानं आपलं पोट भरूं कीं! त्यांनीं रक्कम भरण्यात मनाचा मोठेपणा दाखविला, अस केव्हा म्हणायचं? त्यांनीं जर मला मागणी घातली नसती तर!"

"चागल्या हेतूचा असा विपर्यास करूं नये, जिजा." विमल म्हणाली. "तुझ्यावरील ईश्वरी आपत्तीला आपण थोडे बहुत कारण झालो, असं त्याना वाटत म्हणून ते तुझं पाणिग्रहण करण्यास तयार आहेत ना! हा त्याच्या मनाचा मोठेपणा नव्हे का? आणि खर म्हटल, तर तूं तेव्हाच संमति देशील, असच मला वाटल होत. पण तुझं आपलं काहींबाहींच बोलणं!"

त्या वेळीं जिजाच्या हृदयात खळबळ उडाली. तिचें मन तिला आतून धक्के देऊं लागलें. त्यासरशी ती जोराने म्हणाली, "नाहीं! माझं काहीं तरी बोलण नाहीं, ताईसाहेब! माझ्या अतःकरणात श्रीपतीच्या मूर्तीला एकदा स्थान मिळालं आहे ना? ती मूर्ति मी तेथून काढूं कशी? सागा तुम्हीच! ऐहिक वैभवाला भुलून मी आपल्या मनाशीं प्रतारणा करूं कशी? आमच्या उभयताच्या अंतःकरणाची ताटातूट आता होईल तरी कशी?

मला तुम्ही खुळ्या का म्हणानात! श्रीपतीवरील प्रेमाखेरीज मला दुसऱ्या-वर प्रेम करताच येणार नाहीं मुळीं! त्यामुळ कसल्याही सुखदुःखाची मला पर्वा नाहीं! माझ्यासारखीच्या ह्या समजुतीला वेडी समजूत तुम्ही म्हणा पाहिजे तर! पण अशी दृढश्रद्धा म्हणजेच खरा धर्म, असं आम्हा खेडवळाना वाटतं खरं! मी थोडी शिकलें, शहरात वावरले, तुमच्यासारख्यात मिसळले, म्हणून मी बोलून दाखविते हे! पण माझे बोल खेड्यापाड्यातील स्त्रियाच्या भावनाचे पडसाद आहेत, विमलाताई!"

जिजाचें बोलणे थाबले. मधुकराने तिचे मन वळविण्याची कामगिरी विमलकडे सोपविली होती विमल ती अगदी कसोशीने पार पाडीत होती. जिजाचा कोटिक्रम तिला निरुत्तर करीत होता. तिचे बोल अंतःकरणाच्या गाभ्यातून बाहेर पडत होते. त्यामुळें विमलला काय बोलावे, हे सुचेना! तथापि ती अगदीं शेवटचा प्रयत्न करावा, म्हणून म्हणाली,

"पण तुझ्यासारखीच बाळासाहेबाची मनःस्थिति झालेली असली, तर ह्या अडचणींतून मार्ग कसा निघावा, ह्याचाही विचार तूं करणार नाहींस का? त्याच्याही मनाचा विचार कर; मग काय तें उत्तर दे."

"ताईसाहेब," जिजा गंभीरपणे म्हणाली, "मी अनाथ झालें ह्या-मुळंच बाळासाहेबाच मन माझ्याकड ओढ घेतं ना? हा त्याच्या मनाचा मोठेपणा मला देखील समजतो. आज मी सकाळीं त्याना पाहिल ना? अगदीं खरं खरं सागतें तुम्हांला. त्याना पाहण्याबरोबर माझ्या मनात त्याच्याविषयीं पूज्यबुद्धि उत्पन्न झाली, आणि तशाच स्थितींत श्रीपती उभा असता, तर माझ्या प्रेमाला अलोट भरती आली असती. त्या वेळीं बाळा-साहेबाना पाहून मला असही पण वाटलं, देवानं असा जर मला भाऊ दिला असता तर मी किती भाग्यवान् झालें असते! तीच भावना आताही माझ्या मनात आहे. त्याना जर माझ्याविषयीं प्रेम वाटत असलं तर माझ्या-वर त्यानीं बहिणीचं प्रेम करावं, आणि तेंही एक उज्ज्वल प्रेम नव्हे का? दादाचं तशाच प्रकारचं प्रेम माझ्यावर नाहीं का?"

जिजा पुढे बोलणार होती, पण त्या वेळी तिचें अंतःकरण भरून आलें. विमलचा तिच्याविषयींचा आदर अनंत पटीने वाढला. त्याच्या बोलण्याकडे बाळासाहेब आदिकरून सर्वांचेच लक्ष होते. त्या निवात वेळीं त्याचे सर्व शब्द त्याना ऐकूं येत होते. भय्यासाहेबाच्या चंचल मनाला आता राहवेना. ते किंचितशा हेटाळणीच्या स्वरात म्हणाले, "ती जिजाच बोलत आहे, का येथील रामाच्या समोर असलेली सीता बोलत आहे ! तुम्हींच सागा अरविंद ! पुराणातील जुन्या भाकडकथाची ती उजळणीच करीत नाहीं का ! "

हे शब्द त्या दोघींच्या कानी आले. तेथे जवळच पुरुष मंडळी बसली आहेत, हे जाणून त्या दोघीही चपापल्या !

अरविंदाला भय्यासाहेबाचे ते बोलणे रुचले नाहीं. तो जोराने म्हणाला,

" भय्यासाहेब, आपल्या संस्कृतीची थोरवी तुमच्या लक्षात येत नाहीं, त्याला कोण काय करणार ? काही नवशिक्षितात जुन्या सस्कृतीची थट्टा करण्याची लाटच उसळली आहे म्हणा ना ! पाश्चात्य समाज वैभवशिखरावर आरूढ झाला आहे, त्यामुळ त्याच्यात भोगलालसा वाढलेली आहे. नीतीचीं बंधन शिथिल करण्याकडे त्याच्यापैकीं काहीचा उत्साह खर्ची पडत आहे ! त्याचंच उष्ट अनुकरण करण्याची तुम्हा वाचिवीराना स्फूर्ति होत आहे म्हणे ! सध्याच्या जीवनकलहात आपण जगू कस, ह्या विचारात तनमनधन खर्ची घालण्याचं सामर्थ्य तरुणात उत्पन्न करण्याऐवजीं त्याच्या चित्तात गौण विषयानीं बेदिली उत्पन्न करण्याचं कार्य समाजसेवेच्या बुरख्याखालीं काहीं उथळ विचाराचे लोक चालवितात ! त्याच्याच विचारसरणीची छटा तुमच्या बोलण्यात दिसते ! आपल्या सस्कृतीचा विचारपूर्वक अभ्यास तुम्ही करीत नाहींच, आणि पाश्चात्य विचारी पंडितानी केलेलं निरीक्षण व त्यावरून काढलेले सिद्धात ह्याचाही सूक्ष्म अभ्यास होत नाहीं ! पातिव्रत्याची थोरवी ते पडितही सप्रमाण माडीत आहेत. नुकताच एका पाश्चात्य पंडिताचा ग्रंथ माझ्या वाचनात आला. ते पडित एका प्रसिद्ध महाविद्यालयाचे विख्यात अध्यापक आहेत. त्यानीं कित्येक वर्षे परिश्रम

करून, त्याना ज्याची माहिती संशोधिता आली, अशा, जगातील एकोणनव्वद समाजाच्या उदयास्ताच्या सूक्ष्म निरीक्षणानं त्यानीं असा सिद्धात प्रस्थापित केला आहे कीं, ज्या समाजातील स्त्रियात कडक पातिव्रत्य टिकलें नाहीं, ते समाज अधोगतीला गेले.* आपल्या प्राचीन शास्त्राचं तुमच्यासारख्यानींही निर्विकार मनानं सशोधन केल्यास तीच गोष्ट प्रत्ययास येईल. जिजाच्या आताच्या बोलण्यातही आपल्या श्रेष्ठ संस्कृतीचे उत्कृष्ट प्रतिबिंब पडलेलं आहे. आपण ज्याना अडाणी म्हणतो, त्या स्त्रियाच्याही रोमरोमी ह्या कल्पना मुरलेल्या आहेत ! पत्नीची पतीवर व पतीची पत्नीवर दृढ श्रद्धा असलेलीं अगदीं अत्यंत गरीब स्थितीतीलही कुटुंबे तुम्हाला खेड्यापाड्यात वाटेल तितकीं आढळतील ! म्हणूनच मला वाटतं, पातिव्रत्यधर्माच मनानही पालन करण्याची शुद्ध परंपरा समाजात प्रज्वलित ठेवण्यातच समाजाचा खरा उद्धार आहे."

भय्यासाहेब अरविंदाकडे पाहातच राहिले ! बाळासाहेब विचारमग्न झालेले दिसले.

इतक्यात आईसाहेबाकडून भोजनाची तयारी झाल्याची वर्दी आली. त्यामुळे सर्व मंडळी उठली.

दुसरे दिवशी बाळासाहेब निघून गेले.

त्यानंतर आठ दहा दिवसाची गोष्ट. जिजा सकाळीं आठ वाजण्याच्या सुमारास त्याच बागेतील फुले तोडीत होती. त्याच वेळीं डोक्यास फेटा व आगात शिकारीचा पोशाक व हातात बंदूक असलेली एक व्यक्ति मागे बाळासाहेब ज्या ठिकाणीं उभे होते, त्याच ठिकाणीं येऊन उभी राहिली. जिजा फुले तोडण्याच्या नादात होती. त्या व्यक्तीची तिच्यासन्निध जाण्याची उत्सुकता पराकाष्ठेची वाढलेली होती. पण दिलेल्या सूचनाप्रमाणें तिला वागावयाचे होते ! तथापि त्या व्यक्तीला राहवल नाहींच. तिने बंदूक

---

* Sex Regulations and Human Behaviour by J. D. Unwin M C, Ph D Introduction, Page XI

जमिनीवर आपटून थोडा आवाज केलाच. त्याबरोबर जिजाने तिकडे पाहिलें. प्रथम तिला ते बाळासाहेबच असावेत, असेंही वाटले. पण पुढें ती व्यक्ति अत्यंत अधीर होऊन उद्गारली,

" जिजे, मला ओळखल नाहीस वाटत ? "

" श्रीपती!" एवढे शब्द तिच्या तोंडातून बाहेर पडले. लगेच तिला आपल्या मातापित्याची आठवण झाली. तिचा कंठ दाटून आला. तिची त्या वेळची ती अवस्था श्रीपतीच्या लक्षात आल्याबरोबर तो लगेच पुढे धावला व तिचें सात्वन करू लागला. तिने न कळत आपली मान त्याच्या खांद्यावर टाकली !

इतक्यात तो स्वतःच भानावर आला. त्याने तिच्या हातीं बाळासाहेबानीं दिलेला लिफाफा दिला, व तें पत्र अगोदर वाचण्यास तिला विनविलें. ते पत्र तिने कापऱ्या हातानीं फोडले ! त्यातील मजकूर ती वाचूं लागली.

" प्रिय भगिनी जिजास—

अनेक आशीर्वाद वि.

सुटका होताच तुझ्या सर्वस्वाचा ठेवा मी आठ दिवस इकडे ठेवून घेतला, त्याबद्दल मला क्षमा कर. त्या मुदतींत त्याच्या आगच्या थोर गुणाचीही खरीखुरी परीक्षा मला झाली. शिकारीकरिता आम्ही जंगलात एक दोन दिवस गेलो होतो, तेथें माझ्यावर चवताळून आलेल्या वाघाला आपला जीव धोक्यात घालून यमसदनाला पाठविणारा श्रीपतीच होय ! त्याला परवाना देववून बंदूक दिली, त्यात मी काहींच केलें नाहीं. माझें भाग्य थोर म्हणूनच मला वाटतें कीं, विलक्षण योगायोगानं का होईना, मला तुझ्यासारखी भगिनी लाभली ! तुझा बंधु

बाळासाहेब."

पत्र वाचल्यानंतर तिच्या मनात एकदम ज्या भावना उसळल्या, त्याचें चिन्ह म्हणून तिनें एक वार त्या पत्राकडे पाहिलें व नंतर अनिमिष नेत्रांनीं ती श्रीपतीकडे पाहात राहिली !

---